

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५० । अंक ४-५ । जानेवारी-फेब्रुवारी १९९७
मार्गशीर्ष – पौष – माघ, शके १९१८.
किंमत रु. २५/-
**वार्षिक वर्गणी रु. १२०/-**



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील ,अशी काळजी घेतली जाईल.

* **नवभारत**, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
वसंत पळशीकर
कार्यकारी संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका








## लेखक-परिचय

- **मे.पुं. रेगे** : अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ आणि अध्यक्ष, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई; संपादक *नवभारत* आणि *न्यू क्वेस्ट*; **पत्ता** : 'रागिणी', साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.

- **अम्लान दत्त** : अर्थशास्त्राचे नामवंत प्राध्यापक, विश्वभारती विश्वविद्यालयाचे भूतपूर्व कुलगुरु; लोकशाही समाजवाद, आर्थिक विकास, धर्म आणि संस्कृती अशा विविध विषयांवर मौलिक लेखन. **पत्ता** : पूर्व पल्ली (नॉर्थ), शांतिनिकेतन ७३१२३५, प. बंगाल.

- **वेणू पळशीकर** : अर्थशास्त्राच्या माजी प्राध्यापिका; **पत्ता** : १५० गंगापुरी, वाई ४१२ ८०३, (जि. सातारा).

- **रा.ग. जाधव** : प्रसिद्ध समीक्षक, माजी प्राध्यापक, सेवानिवृत्त प्रभारी विभाग संपादक, मराठी विश्वकोश, वाई. **पत्ता** : ५६५ क, शनिवार पेठ, राजीव लॉज, पुणे ४११ ०३०.

- **वंदना शिव** : भौतिक विषयात् एम्.एस्सी. केल्यानंतर विज्ञानाचे तत्त्वज्ञान या विषयांतर्गत ओंटारियो (कॅनडा) विद्यापीठाची डॉक्टरेट; अनेक विद्यापीठे व संस्था यांमध्ये अध्ययन; सध्या डेहराडून (उत्तर प्रदेश) येथील रिसर्च फाऊंडेशन फॉर सायन्स, टेक्नॉलॉजी ॲण्ड नॅचरल सायन्स या संस्थेच्या संचालिका. *स्टेइंग अलाइव्ह : वुईमेन, इकॉलॉजी ॲण्ड सर्व्हायव्हल इन इंडिया, द व्हायोलन्स ऑफ धि ग्रीन रेव्होल्यूशन, इकॉलॉजिकल डिग्रेडेशन ॲण्ड पोलिटिकल कॉन्फ्लिक्ट इन पंजाब*, आदि ग्रंथांच्या कर्त्या. अल्टर्नेटिव्ह नोबेल पीस प्राईज व धि ऑर्डर ऑफ धि गोल्डन आर्क, १९९३, सन्मान प्राप्त. देशी बियाणांचे जतन, संरक्षण व संवर्धन करणाऱ्या चळवळीच्या एक प्रवर्तक. **पत्ता** : रिसर्च फाऊंडेशन फॉर सायन्स, टेक्नॉलॉजी ॲण्ड नॅचरल सायन्स, डेहराडून (उत्तर प्रदेश).

- **अ.ना. ठाकूर** : मराठी विश्वकोश कार्यालयात विज्ञान व तंत्रविद्या विभागाचे संपादक; **पत्ता** : ४५, गंगापुरी, वाई ४१२ ८०३, (जि. सातारा).

- **दत्तात्रय पुंडे** : मराठीचे प्राध्यापक, मॉडर्न महाविद्यालय, पुणे '*वाङ्मयेतिहास – सद्यःस्थिती आणि अपेक्षा*' व '*गांधीवाद आणि आधुनिक मराठी साहित्य*' पुस्तकांचे संपादक; **पत्ता** : ४/९, अर्चनानगर, गणेशनगर जवळ, पुणे ४११ ०३८.

- **दे.अ. दाभोलकर** : अर्थशास्त्राचे ज्येष्ठ निवृत्त प्राध्यापक, भूतपूर्व कुलगुरू, पुणे विद्यापीठ व शिक्षणतज्ज्ञ; **पत्ता** : 'शांतिनिकेतन', ४३ गुरुकृपा हाऊसिंग सोसायटी, गोडोली, सातारा ४१५ ००१.

- **प्रभा श्रीनिवास** : मुंबईच्या 'स्वाधार' केंद्राच्या संचालिका; **पत्ता** : ४६ बी/३, बचानीनगर, मालाड, मुंबई

- **पंडित टापरे** : मराठीचे प्राध्यापक, किसनवीर महाविद्यालय, वाई ४१२ ८०३, (जि. सातारा); **पत्ता** : प्राध्यापक कॉलनी, सिद्धनाथवाडी, वाई ४१२ ८०३.

- **वसंत जोशी** : मराठीचे भूतपूर्व प्राध्याक; '*संशोधन साधना*', '*ज्ञानदेव चिंतन*', '*मद्रासची मराठी हस्तलिखिते*' या ग्रंथांचे संपादक; **पत्ता** : सर्व्हे नं. १६/१०, ३-बी, प्रीतम अपार्टमेन्ट, अंबर हॉल समोर, कोथरुड, पुणे ४११ ०२९.

---

**खुलासा** : *नवभारत*च्या दिवाळी अंकाच्या (नोव्हेंबर-डिसेंबर'९६) मुखपृष्ठावरील चित्र कविवर्य वसंत आवाजी डहाके यांचे आहे. याचा निर्देश अंकात करण्याचे राहून गेले याबद्दल आम्ही दिलगीर आहोत.

अनुक्रमणिका

# नवभारत

## अ नु क्र म






**मुखपृष्ठाविषयी :** जननिक अभियांत्रिकीच्या द्वारे जीवजातीची 'निर्मिती' करून तीवर मालकीहक्क प्रस्थापित करू पाहण्याच्या विरोधातील चळवळीचे प्रतीक म्हणून 'नवधान्य' पारंपरिक संमिश्र-पीक पद्धतीचा पुरस्कार वंदना शिव यांनी आपल्या या अंकातील लेखात केला आहे. ती संकल्पना मुखपृष्ठावर साकार केली आहे.

# सर्वेजनः सुखिनो भवन्तु

# रुपये ३००कोटी ठेवींची पूर्तता

ज्यांच्या सहकार्याने बँक ३०० कोटी रुपयांच्या ठेवी पूर्ण करण्यात यशस्वी ठरली. त्या असंख्य ठेवीदार, खातेदार, सभासद व हितचिंतकांचे विनम्रपूर्वक हार्दिक आभार

जनमानसाचा लाख मोलाचा विश्वास संपादित करुन व ७८ वर्षाच्या अविरत सेवेची शिदोरी पाठीशी घेऊन शतकाकडे वाटचाल

२० व्या शतका अखेरीस रुपये ५००कोटी ठेवींचा संकल्प

**बँकेचे मुदत ठेवीवरील आकर्षक व्याजदर**

| | द.सा.द.शे |
|---|---|
| ● ३० दिवस ते १८० दिवस | १२.००% |
| ● १८१ दिवस ते १वर्ष पर्यंत | १३.००% |
| ● १ वर्ष व त्याहून अधिक कालावधीसाठी | १४.५०% |

*अधिक माहितीसाठी कृपया संपर्क साधा :*

- प्रधान कार्यालय : गोल्डफिंच पेठ, सोलापूर
- सोलापूर जिल्ह्यातील १७७ शाखा कार्यालये



## सोलापूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्यादित, सोलापूर.

मुख्य कार्यालय : २०७/८/९, गोल्डफिंच पेठ, सोलापूर

| ए.जे. भोसले | चां. आ. देशमुख | वि. गु. शिवदारे |
|---|---|---|
| सरव्यवस्थापक | व्हा. चेअरमन | चेअरमन |

पोरे ब्रदर्स

# आशय आणि शैली : श्री. बाळासाहेब ठाकरे यांची भाषा

दै. 'सामना' (१-१२-९६) ह्या वृत्तपत्रात प्रसिद्ध झालेल्या मुलाखतीत श्री. बाळासाहेब ठाकरे यांनी पुढील शब्दप्रयोग केले आहेत. 'काही मतलवी गिधाडांनी (सध्याची परिस्थिती निर्माण केली)'. 'आधी किणी मुडद्याची संधी (मिळाली होती).' 'म्हणजे लघ्वी केल्यानंतर एक असा फेस येतो ना, तो आता खाली बसलाय. ते आता परत मुततील की नाही...' 'तुमचे दाढीवाले कोण ते अशोक जैन...' " 'लोकसत्ते'चे संपादक अरुण टिकेकर जे आहेत... ते फोरास रोडला जातात, तिकडे त्यांची एक रखेलीही आहे, तिथेच ते दारू पिऊन झोपतात..." इ.

ही केवळ रांगडी, रोखठोक भाषा नाही. ती जाणूनबुजून वापरण्यात आलेली अशिष्ट, वाह्यात, काहीशी विकृत अशी भाषा आहे. रमेश किणी ह्या मृत व्यक्तीचा निर्देश ठाकरे 'मुडदा' असा करतात. आपण सर्वच मरणार आहोत आणि सर्वांचेच मुडदे बनणार आहेत हे ठाकरे यांना माहीत नाही काय? काही क्षुद्र माणसे मेल्यावर त्यांचे मुडदे बनतात आणि श्रेष्ठ माणसांची प्रेते किंवा 'पार्थिव' बनते असा तर फरक नाही? एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे. श्री. अरुण टिकेकर यांच्यावरील जे आरोप वर उद्धृत केले आहेत ते श्री. ठाकरे यांनी त्यांच्यावर प्रत्यक्षात केलेले नाहीत. आपल्यावर आणि शिवसेनेवर बिनबुडाचे अनेक आरोप केले जातात हा मुद्दा मांडताना असे आरोप बेछूटपणे कुणावरही करता येतील हे दाखवून देण्यासाठी उदाहरणादाखल त्यांनी ते दिले आहेत. पक्षीय राजकारणाच्या धुमाळीत शिवसेनेवर बिनबुडाचे आरोप करण्यात येत असतीलही. पण शिवसेनेवर किंवा युती सरकारवर करण्यात आलेले सर्व आरोप केवळ निराधार आहेत असे नाही. चौकशी अंती ते खोटे ठरतीलही. पण ज्यांच्या संबंधात निःपक्षपाती चौकशी व्हावी असे ते आरोप आहेत हे तटस्थ माणसे प्रथमदर्शनी मान्य करतील. उदा. रमेश किणी ह्यांच्या अनैसर्गिक मृत्यूच्या बाबतीत नेटाने, व्यवस्थितपणे चौकशी झाली, सर्व शक्यता पडताळून पाहण्यात आल्या असे दिसत नाही. किंवा मायकेल जॅक्सन प्रकरणाच्या संदर्भात कार्यक्रमापासून जो तोटा आला असे सांगण्यात येते तो केवळ कारभाराच्या गलथानपणामुळे झाला की तोटा झालाच नाही, खरे हिशोब दाखविण्यात येतच नाहीत असे आहे ह्या गोष्टी हव्या तितक्या स्पष्ट नाहीत. तेव्हा ठाकरे यांच्यावर किंवा शिवसेनेवर केवळ बेछूटपणे आरोप करण्यात येतात हे खरे नाही. बेछूटपणे आरोप करायचेच तर इतरांवर कोणते आरोप करता येतील ह्यांची उदाहरणे देण्याची संधी विरोधकांनी ठाकरे यांना दिलेली नाही.

ठाकरे अशी भाषा का वापरतात? समाजाच्या काही थरांत शिव्यागाळी माणसांच्या तोंडात बसलेल्या असतात. संबोधने, विशेषणे, क्रियाविशेषणे व क्रियापदे म्हणून त्यांच्या बोलण्यात शिव्या सतत येत असतात. सततच्या वापराने त्या झिजून गुळगुळीत झालेल्या असतात. त्या शिव्या अशा वाटतच नाहीत. तो केवळ त्यांच्या आत्माविष्काराच्या शैलीचा भाग असतो. अशा माणसांवर जेव्हा शिव्या देण्याचा प्रसंग ओढवतो तेव्हा त्यांना खास कल्पकता दाखवावी लागते. त्यांच्या नेहमीच्या बोलण्यातील शिव्या केवळ उत्स्फूर्त असतात. ठाकरे वापरीत असलेली अशिष्ट भाषा अशी उत्स्फूर्त नाही. ती त्यांनी कमावलेली, अंगी बाणवून घेतलेली भाषा आहे; जिचा सार्वजनिक प्रसंगी ते जाणूनबुजून वापर करीत असतात अशी ती भाषा आहे असे दिसते. ह्या भाषेद्वारा ते कोणता संदेश आपल्या अनुयायांना आणि इतरांना देत असतात?

एक संदेश असा की, हे जे माझे विरोधक आहेत, ज्यांच्या संदर्भात मी ही शिवराळ भाषा वापरतो ते क्षुद्र आहेत, क्षुल्लक आहेत, त्यांची मला पर्वा नाही, ते माझ्या खिजगणतीत नाहीत. ज्यांच्याविषयी सभ्य भाषा वापरावी अशा लायकीचे हे लोक नाहीत. मी वाघाला वाघ्या म्हणणारा आहे. दुसरा संदेश असा की, मी सरळ, प्रामाणिक माणूस आहे. माझ्यापाशी आडपडदा नाही. मला जे सत्य वाटते ते मी निर्भीडपणे सांगतो. आत एक आणि बाहेर एक असे माझे नाही. आपण सभ्यपणे बोलतो-वागतो असा दावा जे करतात ते ढोंगी असतात. ते सत्य झाकून ठेवतात. मी तसे करीत नाही. सत्य हे स्वतःच उघडेनागडे असते. सत्य जसे आहे तसे मी सांगतो. म्हणून माझी भाषाही उघडीनागडी असते.

मराठी समाजाच्या एका मोठ्या विभागातील तरुणांना ठाकरे यांची ही भूमिका पटलेली आहे आणि मान्य आहे. पौगंड-वयात अनेकदा मुलांना सभ्यपणा हे ढोंग वाटते. माणसाच्या लैंगिकतेची चाहूल लागलेली असते, तिचा अनेक प्रकारे स्वतःला अनुभव येत असतो. ह्या स्वरूपाच्या व्यवहारात प्रौढ माणसे गुंतलेली असतात; पण आपल्या जीवनाची ही बाजू ते झाकून ठेवतात, जणू काय

अनुक्रमणिका

आपण त्या गावचेच नाही असा आव आणतात असे त्यांचे प्रौढांविरुद्धचे गाऱ्हाणे असते. ह्या ढोंगाचा प्रत्यय त्यांना स्वतःमध्येही येत असतो. लैंगिक जीवनाविषयी असलेली उत्कट आस्था, कुतूहल, ह्या व्यवहारात गुंतण्याची तीव्र इच्छा सभ्यपणाच्या संकेतांच्या दडपणाखाली त्यांना स्वतःलाही झाकून ठेवावी लागते. ह्या कोंडीतून सुटण्याचा एक मार्ग म्हणजे लैंगिकतेला भाषेच्या माध्यमातून वाट मोकळी करणे. एकमेकासोबत रांगड्या, अश्लील इ. शब्दप्रयोगांचा वापर करून बोलण्यातून लैंगिक ऊर्मींचे काही प्रमाणात समाधान होते असा अनुभव तर येतोच; पण असे बोलून आपण प्रौढांच्या दांभिकतेविरुद्ध आणि त्यांनी आपल्या केलेल्या गळचेपीविरुद्ध बंड करीत आहोत असे समाधानही मिळते. मुले वाढतात, जबाबदार सामाजिक व्यवहारात सहभागी होतात, सभ्यतेच्या संकेतांची अनिवार्यता त्यांच्या गळी उतरते आणि हा 'विद्रोह' शमतो. पण काही माणसे जन्मभर पौगंडावस्थेच्या मानसिकतेतून बाहेर येत नाहीत.

सभ्यपणे बोलण्याचे, वागण्याचे जे संकेत समाजात रूढ असतात तो ढोंगाचा प्रकार नसतो. आपण इतरांशी सभ्यपणे वागतो तेव्हा तुमच्या प्रतिष्ठेची कदर मी करतो, तुमच्याशी सामंजस्याने, सुसंवादाने वागावे अशी माझी इच्छा आहे असा संदेश आपण त्यांना देत असतो. दोन माणसे परस्परांशी सभ्यतेने वागत असली तर त्यांच्यांत मतभेद होऊ शकेल, वाद होईल; पण भांडण होणार नाही. भांडताना जाणूनबुजून अपशब्द वापरण्यात येतात. हे शब्द वर्णनपर म्हणून घेतले तर बहुतेकदा ते अयथार्थ ठरतील. पण वर्णन करणे हा त्यांच्या वापरामागील उद्देश नसतोच. आपण भांडण्याच्या पवित्र्यात आहोत, भांडायला सज्ज आहोत हे जाहीर करणे एवढाच त्यांचा हेतू असतो. सभ्यपणाचे संकेत पाळण्यात जी समंजस, संवादी वृत्ती व्यक्त होत असते ती केवळ लोकशाहीलाच नव्हे तर सामाजिक एकतेला, समाज हा समाज म्हणून एकत्र राहायला आधारभूत असते. माणसांच्या शारीरिक बाजूचा, शारीरिक प्रक्रियांचा निर्देश करण्याविषयीचे जे भाषिक संकेत असतात त्यांनाही काही अर्थ आहे. त्यांतून माणसांच्या खाजगीपणाविषयीची कदर व्यक्त होते. माणूस म्हणजे केवळ शारीरिक प्रकियांची व्यवस्था नव्हे, त्याच्या पलीकडे जाणारे मानसिक जीवन जगणारी ती व्यक्ती आहे आणि ह्याच्यात त्याची प्रतिष्ठा आहे हा भावही त्यात अभिप्रेत आहे. ह्यामुळे शिव्या ह्या बहुतेकदा शारीरिक प्रक्रियांच्या वर्णनावर आधारलेल्या असतात. एखाद्याला शिवी देऊन त्याला केवळ एक पशू ह्या पातळीवर आपण आणतो; त्याचे मानवी व्यक्तिमत्त्व हिरावून घेत असतो. ठाकरे हे कितीही प्रांजल, सडेतोड, रोखठोक इ. असले तरी आपल्या घरी आलेल्या पाहुण्याला 'तुला मुतायचे असेल तर पलीकडे सोय आहे' असे म्हणणार नाहीत ही खात्री आपण बाळगू शकतो.

समाजात जेव्हा एखादा वरिष्ठ वर्ग, अभिजन वर्ग असतो तेव्हा त्याचे सदस्य एकमेकाशी वागताना अतिरेकी सभ्यतेचे संकेत पाळताना आढळतात. ह्याची उलट बाजू अशी की, ह्या वर्तुळाबाहेरच्या व्यक्तीशी, कनिष्ठ व्यक्तीशी वागताना ते जाणूनबुजून असभ्य रीतीने वागतात. सामाजिक समतेच्या दिशेने वाटचाल करताना ह्या कृत्रिम सभ्यतेवर आणि कृत्रिम असभ्यतेवर आघात करावेच लागतात. अधिकाधिक व्यक्तींना सभ्यतेच्या परीघात आणावे लागते आणि कृत्रिम सभ्यपणा अधिक सुटसुटीत करावा लागतो. ह्या प्रक्रियेत एकेकाळी असभ्य मानल्या गेलेल्या वागण्याच्या रीती सभ्य म्हणून स्वीकारल्या जातात. पण ह्याचा अर्थ असा नव्हे की, सभ्यतेचा दंडकच झुगारून देण्यात आलेला असतो. समाजातील व्यक्ती एकमेकांची कदर करीत, सामंजस्याने, सुसंवादाने एकत्र राहायची असली तर समाजात सभ्यतेचे दंडक असावेच लागतील. समाजात असे दंडक आहेत ह्याचा अर्थच असा की, समाजातील बहुसंख्य माणसे बहुसंख्य प्रसंगी हे दंडक पाळतात. शिवाय त्याचा अर्थ असा की जबाबदारीने वागणारा माणूस हे दंडक सर्व प्रसंगी पाळण्याचा सतत प्रयत्न करीत असतो.

आपल्या विरोधकांशी वागताना ठाकरे ह्या दंडकांचा जाणूनबुजून भंग करतात. ह्यातून ते आपल्या अनुयायांना असे सांगतात की, आपले विरोधक, म्हणजे जे आपल्या मतांवर, धोरणांवर, कार्यपद्धतीवर टीका करतात, भिन्न मते मांडतात ते सारे आपले शत्रू आहेत; त्यांना नेस्तनाबूद केले पाहिजे; निदान हतवीर्य केले पाहिजे. आणि हे करणे कठीण नाही. ह्या लोकांत दम नाही. मोठ्या संख्येने तरुणात ही वृत्ती फैलावणे हे सामाजिक स्वास्थ्याला तर घातक आहेच; पण ते विशेषेकरून लोकशाहीला घातक आहे. सामाजिक स्वास्थ्याला घातक आहे. कारण त्यातून केवळ गुंडगिरी फैलावेल; एवढेच नव्हे तर तिला राजकीय प्रामाण्य आणि प्रतिष्ठा लाभेल. आजच ही गोष्ट लक्षणीय प्रमाणात घडून आलेली आहे. ती लोकशाहीला घातक आहे हे स्पष्ट आहे; कारण लोकशाही सामंजस्य आणि संवाद ह्यांच्यावर आधारलेली असते. विधिमंडळात ज्या राजकीय पक्षाच्या प्रतिनिधींचे बहुमत असेल त्याच्यावर सरकार बनविण्याची आणि कारभार करण्याची जबाबदारी सोपविण्यात यावी हा लोकशाहीचा केवळ एक व्यावहारिक संकेत आहे. हे लोकशाहीचे सार नव्हे. प्रत्येक व्यक्तीला सारासार विचार करून स्वतःचे मत बनविण्याची शक्ती असते, असे मत बनविण्याचा अधिकार तिला असतो, आपले मत मांडण्याचे स्वातंत्र्य तिला असले पाहिजे, मतदार म्हणून राजकीय प्रक्रियेत तिला इतर

प्रत्येकावरोबर समान स्थान असले पाहिजे, व्यक्ती म्हणून तिला असलेल्या स्वातंत्र्याचा किंवा इतरांशी समानतेने वागविले जाण्याच्या तिच्या हक्काचा योग्य कारणाशिवाय संकोच करणारा कायदा किंवा कृत्य अन्याय्य व अप्रमाण असते इ. तत्त्वे आणि मूल्ये लोकशाहीला प्राणभूत असतात. ह्या मूल्यांनी आणि तत्त्वांनी भारतीय राज्यघटनेला तिचा आशय दिला आहे. आणि सरकारचा कारभार राज्यघटनेने घालून दिलेल्या मर्यादेत चालतो की नाही ह्याचा निर्णय घेण्याचा अधिकार आणि जबाबदारी तिनेच स्वतंत्र अशा न्यायसंस्थेवर सोपविली आहे.

हे सर्व तत्त्वज्ञान ठाकरे यांना नक्कीच माहीत असणार. पण त्यांची राजकीय शैली ह्या तत्त्वज्ञानाला विरोधी आहे. त्यांची भूमिका अशी दिसते की, शिवसेनेला (आणि भाजपला मिळून) बहुमत मिळाले आहे, आपण शिवसेनेचे सर्वश्रेष्ठ किंवा एकमेव नेते आहोत, तेव्हा लोकशाहीच्या तत्त्वाप्रमाणे आपल्या हाती सत्ता आली आहे. प्रत्यक्षात लोकशाहीच्या संकेतांना आणि घटनेला अनुसरून युतीचे सरकार स्थापन झाले आहे आणि एकंदरीत ते घटनेप्रमाणे चाललेही आहे. पण सत्ता आपल्या हाती आहे, आपण नेमलेले, आपल्या आदेशांनुसार चाललेले हे सरकार आहे असा ठाकरे यांचा सार्वजनिक पवित्रा असतो. 'रिमोट कन्ट्रोल'चा ते अनेकदा जो निर्देश करतात त्यात हेच अभिप्रेत असते. लोकांच्याच पाठिंव्यावर विधायक आणि लोककल्याणकारी हुकूमशाही प्रस्थापित करावी आणि त्यातून लोकांचे हित साधावे हे उद्दिष्ट त्यांनी आपल्या अनुयायांपुढे ठेवलेले दिसते. काही प्रमाणात ते साध्य झाले आहे असे ह्या अनुयायांना वाटावे अशी परिस्थिती आहे. पण कितीही चांगल्या उद्दिष्टाने स्थापन झालेली हुकूमशाही विधायक आणि कल्याणकारी राहत नाही आणि ती स्थापन करण्याचे मार्ग विधायक असू शकत नाहीत हा इतिहासाचा दाखला आहे. अनेक शिवसैनिक ध्येयवादाने प्रेरित झाले आहेत यात शंका नाही. त्यांनी अंतर्मुख होऊन आपण कोणत्या मार्गाने कुठे चाललो आहोत ह्याचा विचार करावा.

पण ठाकरे यांच्या बाजूने काही म्हणता येईल. त्यांची शैली ओबडधोबड, रांगडी आहे ह्यात शंका नाही. सार्वजनिक जीवनात सभ्यतेची मर्यादा सांभाळली जावी असा ज्यांचा आग्रह असतो त्यांना ती निश्चितपणे खुपेल. पण इतर प्रतिष्ठित राजकीय नेत्यांविषयी जे म्हणता येणार नाही असे ठाकरे यांच्याविषयी (किंवा ते दुरून नियंत्रित करीत असलेल्या युती राजवटीविषयी) काय म्हणता येईल? युती राजवट ही काँग्रेसच्या अगोदरच्या राजवटीपेक्षा अधिक भ्रष्ट आहे असे म्हणायला काही आधार नाही. सरकारी अधिकाऱ्यांचा भ्रष्टाचार पूर्वी चालत होता, आजही चालू आहे. मंत्र्यांच्या पातळीवर होणारा भ्रष्टाचार पूर्वीही होता आणि आजही असणार असा लोकांचा समज आहे. ह्या वावतीतले सवंध सत्य पुराव्यानिशी कधी बाहेर येणार नाही. आता न्यायालयानेच पुढाकार घेतल्यामुळे देशाचे प्रधान हे स्थान भूषविलेल्या नेत्याने केलेले (कथित) भ्रष्ट व्यवहार बाहेर येत आहेत. असे आरोप झाल्यामुळे एखादा राजकीय नेता सार्वजनिक जीवनातून उठून गेला असे होत नाही. असे आरोप केले जाणे हा राजकीय डावपेचाचाच एक भाग आहे असे त्याच्याकडे पाहिले जाते. ह्या परिस्थितीत ठाकरे किंवा त्यांचे कुटुंबीय ह्यांनी गैर मार्गांनी संपत्ती गोळा केली असे आरोप करण्यात आले तर त्यांच्यांत गांभीर्य राहात नाही. ठाकरे हे एक घटनाबाह्य सत्ताकेंद्र झाले आहे असा आरोप करण्यात येतो. पण मग संजय गांधींचे काय? पण ठाकरे यांच्यावर रास्तपणे टीका करणारे संपादक इंदिरा गांधींच्या कर्तबगारीची जोमदारपणे भलावण करताना आढळतात. ठाकरे लोकशाहीच्या मार्गाने हुकूमशाही आणू पाहतात असा आरोप आहे. पण संसदीय राजकारणात भाग घेणाऱ्या मार्क्सवादी पक्षांचे हे अधिकृत तत्त्वज्ञान आहे. श्रमजीवी वर्गाची हुकूमशाही स्थापन करून क्रांती घडवून आणण्याचे उद्दिष्ट आणि ते साधण्यासाठी श्रमजीवी वर्गावर कम्युनिस्ट पक्षाची एकाधिकारशाही ही कार्यपद्धती त्यांनी सोडून दिली आहे काय? तसेच लोकशाहीवादीही म्हणविणाऱ्या (आणि असणाऱ्या) समाजवाद्यांचे काय? त्यांना ठाकरे यांची शैली आणि कार्यपद्धती पसंत नाही. लल्लूप्रसाद यादव यांची आहे काय? लल्लूप्रसाद यांच्यावर सी.बी.आय. ने भ्रष्टाचाराचे आरोप ठेवल्यावर आपले निरपराधित्व सिद्ध करण्यासाठी त्यांनी 'जनता' रस्त्यावर आणली. शिवाय शिक्षा झाली तरी आपण मुख्यमंत्री म्हणून कारभार पाहात राहू असे जनतेला आश्वासन दिले. हे सर्व 'जनते'च्या, म्हणजे मागास जातींच्या नावाने होत असल्यामुळे समाजवाद्यांना ते खपवून घ्यावे लागते. पण त्यामुळे ठाकरे किंवा शिवसेना यांच्यावर टीका करण्याचा नैतिक अधिकार ते गमावून बसतात. त्यांची टीका पक्षीय राजकारणाचे एक साधन बनते. लोकांना हे सर्व दिसत असल्यामुळे कितीही आवेशाने, धारदार शब्दांत केलेली टीका बोथट बनते. तिच्यामुळे लोकशिक्षणाचे कार्य साधत नाही.

सुदैवाने आपण राज्यघटनेचाच भंग केला तर राजकीय पक्ष म्हणून आपले प्रामाण्यच संपुष्टात येईल आणि आपण केवळ गुंड म्हणून उरू हे जाणण्याइतके व्यावहारिक शहाणपण सर्व पक्षांनी दाखविले आहे. राज्यघटना शाबूत आहे तोपर्यंत लोकशिक्षण करून लोकशाही सकस करायला वाव आहे.

*मे.पुं. रेगे*




अनुक्रमणिका








# अतीतलक्षी मानवतावाद

**अम्लान दत्त**

(अनुवाद : वेणू पळशीकर)

मानवतावादाचे विविध प्रकार आहेत. भूतकाळातील काही प्रमुख आणि प्रभावशाली मतप्रणाल्या आज विपादपूर्णरीत्या बदनाम झालेल्या आहेत, तथापि आपल्या अधिक आदरणीय आदर्शांचे वर्णन करण्यासाठी मानवतावाद हे नामाभिधान सयुक्तिक वाटते म्हणून ते टिकून राहिले आहे. तथापि मानवतावादाचा अर्थ भिन्न लोक भिन्न प्रकारे लावतात, आणि कधीकधी पोकळ आशय असलेला एक आश्वासक शब्द म्हणून त्याचा वापर केला जातो. मानवतावाद ही संज्ञा गंभीरपणे घेऊ इच्छिणाऱ्या कोणत्याही व्यक्तीने आपल्याला अत्यंत स्वीकारार्ह वाटणाऱ्या विशिष्ट प्रकारच्या मानवतावादाचा अर्थ व त्याचे उल्लेखनीय गुणविशेष स्वतःला व इतरांना स्पष्ट करून सांगण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

एखाद्याने आपली पसंती जास्त नेमकेपणे व नेटकेपणे व्यक्त करताच त्याला टीकेला सामोरे जावे लागते, हे खरे आहे. पण ते खरोखरच निरोगीपणाचे लक्षण आहे. टीकेला पात्र नसलेल्या कोणत्याही गोष्टीचे मंडन करण्यात काही हशिल नाही. अतीतलक्षी मानवतावाद (Transcendental Humanism) हा पायाभूत विषय घेऊन आपण आता मांडणी करणार आहोत. या विषयाला काहीशा आडवळणाने भिडण्याचा आपला संकल्प आहे, कारण त्याला थेट भिडण्यामुळे गैरसमज होण्याचा संभव आहे. विशेषतः अतीतलक्षी या शब्दाचा वापर मानवतावादाचे विशेषण म्हणून करणे केवळ गूढगुंजन आहे, भूलभुलैय्यात अडकवणारे आहे असे वाटणाऱ्या मित्रांच्या बाबतीत तसे होणे शक्य आहे.

परस्परविरोधी गोष्टी-प्रवृत्ती, त्यांतून निर्माण होणारा संघर्ष आणि त्यावर मात करण्यासाठी छेडली जाणारी चळवळ असा सनातन नियम मानवी समाजामध्ये व मनुष्यप्रकृतीमध्ये सतत कार्यरत असतो. हा एक पायाभूत असा नियम आहे आणि त्याचा सरळ, बाळबोध उलगडा करण्याचा आपण प्रयत्न करणार आहोत. मानवी प्रकृतीला हा नियम लावून पाहण्यापूर्वी मानवी समाजाच्या संदर्भात ह्या नियमाचा विचार करणे कदाचित अधिक सोपे जाईल. अर्थात मानवी समाज व मनुष्यस्वभाव ह्यांची एकमेकात इतकी, सोडविता येण्यापलीकडची गुंफण आहे की त्यांना पूर्णपणे अलग राखणे शक्य नाही.

आपण जिला मानवी सभ्यता म्हणून संबोधतो ती, आणि तिला जोडून येणारे राजकीय संघटन, ह्यांच्या उदयापूर्वी मानवी समाजाची स्थिती कशी होती, याविषयी बरीच चर्चा झालेली आहे. काही मूलग्राही विचारवंतांनी याविषयी पूर्णपणे भिन्न दृष्टिकोण बाळगलेले आढळतात. हॉब्ज व रूसो यांच्या एतद्विषयक संकल्पनांमधील विरोधाची उदाहरणे देऊन हे सहज स्पष्ट करता येईल. मानवी स्वभावाबद्दलच्या भिन्न संकल्पनांमुळे बव्हंशी ही भिन्नता निर्माण झाली. यांपैकी एक दृष्टिकोण पूर्ण सत्य आणि दुसरा पूर्ण असत्य आहे असे ठरविणे चूक होईल, पण सध्यापुरता या विषयाचा हा पैलू आपण बाजूला ठेवूया.

विवेचनाच्या या टप्प्यावर जास्त अर्थपूर्ण असलेल्या प्रश्नाचे लागेबांधे मार्क्सपर्यंत नेऊन भिडवता येतील. आदिम अवस्थेतील साम्यवादाच्या मार्क्सच्या संकल्पनेनुसार त्या अवस्थेमध्ये खासगी मालमत्तेचा अभाव होता, आणि माणूस माणसाची पिळवणूक करत नव्हता. आता, खासगी मालमत्तेशी किंवा उत्पादनसाधनांवरील मूठभर लोकांच्या नियंत्रणाशी पिळणूक कशी जोडलेली असते हे समजणे सोपे आहे; पण साधनांवरील सर्वकष नियंत्रण कसे उदयाला आले? आदिम अवस्थेतील कोणत्या परिस्थितीमुळे हा उदय शक्य झाला?

आता, अशा प्रकारचे नियंत्रण वेगवेगळ्या मार्गांनी प्राप्त करून घेता येते, आणि या सर्व मार्गांचा अवलंब केला गेला हे सुनिश्चित आहे. तथापि, त्या सर्वांचा विचार आपल्याला इथे प्रस्तुत नाही. किंबहुना आपण त्यांपैकी फक्त एकाचाच विचार करून काही मूलभूत गोष्टी जाणण्याचा प्रयत्न करणार आहोत. शिकार करून किंवा वन्य फळे, कंदमुळे गोळा करून उपजीविका करण्याची अवस्था एकदा कधीतरी ओलांडून एक उत्पादक प्राणी म्हणून माणसाने स्वतःला स्थापित केल्यानंतर आपल्याला हव्या त्या वस्तू संपादन करण्याचे दोन मार्ग स्पष्टपणे त्याच्यापुढे उभे ठाकले. अर्थात निसर्गातून मोफत मिळणाऱ्या देणगीरूप वस्तू आपण सोडून देऊ. त्या कोटीत न पडणाऱ्या, इच्छापूर्तीच्या इतर वस्तू स्वतः उत्पादन करून, किंवा दुसऱ्याचे उत्पादन लुटून, अशा दोन पर्यायी मार्गांनी कोणतीही व्यक्ती संपादन करू शकते. एखादा जनसमूह परस्परसहकार्याने उपयोगी वस्तूंचे उत्पादन

अनुक्रमणिका






करू शकतो, किंवा बळजबरीने इतरांचे उत्पादन तो हिरावून घेऊ शकतो. हे उभय मार्ग मानवी समाजाच्या उत्क्रांतीच्या अगदी प्रारंभीच्या अवस्थेपासूनच उपलब्ध असले पाहिजेत. प्रत्येक टोळीची, तिची स्वतःची अशी संघटित उत्पादनपद्धती होती; पण एखादी भटकी टोळी याच्या भरीला लुटीच्या मोहिमेवर जाऊनही उत्पादन संपादित करू शकत असे. टोळीयुद्धात विजेती टोळी पराजित टोळीला पूर्ण लुटून घेई.

स्वतः उत्पादन करणे आणि दुसऱ्याने उत्पादित केलेल्या वस्तूंची लूटमार करणे यांतील फरक मानवी सभ्यतेच्या सुरुवातीच्या टप्प्यापासूनच फार महत्त्वपूर्ण बनला आणि सामाजिक संघटनेच्या भावी उत्क्रांतीवर त्याचा खोलवर प्रभाव पडला. सुस्थिरपणे वसलेल्या मानवी सभ्यता, घोड्यांवर स्वार होऊन वा अन्य प्रकारे जलदगतीने हालचाल करणाऱ्या योद्ध्या टोळ्यांच्या आकर्षणाचे लक्ष्य बनल्या. भटक्या टोळ्यांकडून वारंवार होणाऱ्या आक्रमणांच्या असंख्य उदाहरणांनी प्राचीन इतिहास खच्चून भरलेला आहे. तथापि, लूटमारीच्या अशा अ-नियतकालिक मोहिमा म्हणजे संपत्ती प्राप्त करण्याचे अकार्यक्षम मार्ग आहेत, असे लवकरच या टोळ्यांना आढळून आले. या मोहिमांची परिणती लूटमार झालेल्या प्रदेशाच्या उत्पादक सामर्थ्याचे वाढत्या प्रमाणात खच्चीकरण व विघटन यांमध्ये होत असे : ज्यायोगे भविष्यकालीन लुटीसाठी उत्तरोत्तर कमी कमी संपत्ती शिल्लक राहत असे. जित टोळीच्या प्रदेशात राज्यकर्ता वर्ग म्हणून वास्तव्य करणे, विविध कर आणि खंडण्या शांततापूर्ण मार्गाने वसूल करण्याची पद्धत संघटित करणे आणि स्थानिक लोकांना भविष्यकालीन इतर लुटारूंपासून संरक्षण देणे, अशा प्रकारचे धोरण बहुधा विजेत्या टोळीसाठी अधिक लाभदायक ठरत असे. पिळवणुकीधिष्ठित अर्थ-राजनीतीच्या उत्कर्षगाथेचा हा नक्कीच अत्यावश्यक भाग आहे.

व्यापार आणि लूटमार यांत फरक आहे. वस्तूंच्या विनिमयामध्ये उभयपक्षांचा काही ना काही लाभ होतो. पण उभयपक्ष तुल्यबल नसण्याची शक्यता असते. म्हणून विनिमयाच्या शर्ती अधिक बलवान पक्षाला अधिक अनुकूल होऊ शकतात. व्यापारापासून होणारा लाभ विषम प्रमाणात विभागला जाणे शक्य असते. पण तो जर व्यापार असेल, बळजबरीचा व्यवहार नसेल तर सामान्यपणे उभयपक्षांचा काहीतरी लाभ हा होतोच. आपल्याला पुरेसा लाभ मिळाला नाही अशी तक्रारीची भावना अधिक दुर्बल पक्षाच्या मनात पैदा होऊ शकेल; पण ती गोष्ट येथे प्रस्तुत नाही.

खरा प्रश्न वेगळाच आहे. बाजारपेठांचा विस्तार करण्याचे, उत्पादनाचे तंत्र प्रगत बनवण्याचे, एवढेच नव्हे तर त्यात क्रांतिकारक बदल घडवून आणण्याचे जबरदस्त सामर्थ्य व्यापारामध्ये दिसून आलेले आहे. ऐतिहासिक दृष्ट्या बोलायचे झाल्यास, व्यापाराच्या शक्यता वाढल्यामुळे औद्योगिक क्रांतीसाठीचा मार्ग सुकर झाला. या औद्योगिक क्रांतीचे परिणाम अतिशय व्यामिश्र स्वरूपाचे आहेत. उद्योगीकरणाची समूळ हकालपट्टी किंवा संपूर्ण त्याग करणे आता शक्य नाही. पण पूर्वी कधीही झाले नव्हते एवढ्या स्पष्ट स्वरूपात एक गोष्ट दिसून येत आहे. मानवजातीचे भवितव्य सुरक्षित राखण्यासाठी तिचे पुन्हा एकदा मूल्यमापन होण्याची गरज आहे. उद्योगीकरणासोबत वरचढ ठरलेल्या 'इंडस्ट्रिॲलिझम' च्या विचार/वादप्रणालीने सनातन पेच पुन्हा एकदा नव्या स्वरूपात व वळणाने आपल्या काळासाठी उभा केला आहे आणि आता त्याकडे अधिक काळ दुर्लक्ष करता येणे शक्य नाही.

हा पेच अनेक स्वरूपांत व्यक्त होतो. एक प्रमुख स्वरूप आपण विचारात घेऊया. आधुनिक व्यापार, उद्योगधंदे आणि दळणवळणाची साधने यांमुळे जगाचे सर्व भाग एकमेकांच्या निकट आले आहेत. जगभरच्या वैज्ञानिक कार्यकर्त्यांचा आधुनिक विज्ञानामधील सहकार हे त्याचे एक प्रमुख उदाहरण आहे. मानवमात्रामधील आध्यात्मिक बंधुभावाची, मानवजात हे एक विशाल कुटुंब असल्याची 'वसुधैव कुटुंबकम्' शिकवण जगभरच्या साधुसंतांनी दोन हजारांपेक्षा अधिक वर्षांपासून दिलेली आहे. एक प्रकारचे प्रेरक आंतरिक दर्शन म्हणून दीर्घकाळापासून ही गोष्ट अस्तित्वात आलेली आहे. आता प्रथमच ते दर्शन इहलोकी मूर्त करण्यासाठी आवश्यक तो भौतिक पाया अस्तित्वात आला आहे असे म्हणता येईल. आपल्या एकतेचे नवे भान जगाला होण्याला कधी नव्हे इतकी अनुकूल अवस्था आता प्राप्त झाली आहे. मानवमात्राच्या एकतेला मान्यता देण्याच्या आवाहनाला प्रतिसाद देण्याचे नाकारणे आजघडीला फक्त संकुचित मानसिकतेच्या टोळीवादाकडूनच घडू शकेल. वर्तमान परिस्थितीची ही एक बाजू आहे.

पण याच्याशी विसंगत अशीही एक बाजू आहे. उद्योगीकरणाच्या प्रचलित घाटामुळे श्रीमंत व गरीब राष्ट्रांमधील विषमता वृद्धिंगत झाली आहे. मूठभर राष्ट्रांच्या हातांमध्ये सत्ता व मत्ता केंद्रित होण्यास ही परिस्थिती कारणीभूत झालेली आहे. गरीब राष्ट्रांमध्ये अशाच प्रकारचे संपत्तीचे मोठ्या शहरांमधून आणि समाजाच्या वरच्या थरांमधून केंद्रीकरण झालेले आहे. शेकडो वर्षांपासून आकार घेत आलेली पिळणुकीची साधने आधुनिक तंत्रविद्येच्या साह्याने नवनवीन प्रकारे आज वापरली जात आहेत. अशा व्यामिश्र परिस्थितीत मानवी एकतेच्या आणि सहकाराच्या आदर्शाप्रत आपण कशी वाटचाल करणार? जागतिक ऐक्य



अनुक्रमणिका

आणि वासाहतिक पिळणुकीचा प्रतिकार यांची सांगड कशी घालता येईल?

गांधी आणि रवींद्रनाथ यांच्यातील सुप्रसिद्ध वाद-विवादामध्ये १९२१ सालीच या पेचाचा प्रतिध्वनी उमटलेला आपल्याला ऐकू येतो. अखिल मानवजातीशी सुसंवाद साधणाऱ्या संस्कृतीच्या निर्मितीचे कार्य करण्यासाठी सर्व जगाला, जगातील उत्तमोत्तम प्रवृत्तीच्या लोकांना एका भारतीय ग्रामामध्ये एकत्रित जमण्याचे खुले निमंत्रण देण्याच्या प्रेरणेतून आकारास आलेल्या टागोरांच्या विश्वभारती विद्यापीठाच्या स्थापनेचे ते वर्ष होते. भारतामधील ब्रिटिश राजवटीच्या विरोधातील इतिहासप्रसिद्ध असहकाराच्या चळवळीचे नेतृत्व याच वर्षी गांधीजी करीत होते. आज त्या गोष्टीला पंचाहत्तर वर्षे लोटली असली तरीसुद्धा तो वादविवाद अजूनही आपले युगप्रवर्तक महत्त्व टिकवून राहिला आहे.

टागोर आणि गांधी यांच्यामधील वाद आत्यंतिक सौजन्याने, परस्परआदरभाव राखून आणि तरीसुद्धा आपापली भूमिका खंबीरपणे मांडण्याला वाव ठेवून झाला. तो वाद धारदार व टोकदार होता. तरीसुद्धा त्यामध्ये खवचटपणा, कडवटपणा नव्हता. सार्वजनिक वादविवादाचे स्वरूप कसे असावे याचा तो एक आदर्श नमुना होता. असहकारासाठीच्या गांधींच्या आवाहनावरील टागोरांची टीका ऑक्टोबर १९२१ च्या 'मॉडर्न रिव्ह्यू'मध्ये प्रकट झाली. त्याच महिन्याच्या 'यंग इंडिया'च्या अंकात गांधींचे त्या टीकेवरील उत्तर प्रसिद्ध झाले.

टागोरांच्या दृष्टीने १९१८ मध्ये संपलेल्या जागतिक महायुद्धाचा सर्व मानवजातीसाठी एक स्पष्ट संदेश होता : राष्ट्रांनी राष्ट्रवादापलीकडे जाऊन परस्परसहकार्य करायला शिकले पाहिजे, नाहीतर ती नष्ट होतील. जागतिक ऐक्यभावनेबद्दलची सजगता ही महायुद्धाची जमेच्या बाजूला नोंदवावी अशी उपलब्धी होती: भारतानेसुद्धा या ऐक्यभावनेचे अनुसरण केले पाहिजे. "भारताची जागृती हा जागतिक जागृतीचा एक भाग आहे," अशी टागोरांची दृष्टी होती. "राष्ट्रे एकमेकांच्या जवळ आलेली होती पण या सान्निध्याचे भान त्यांना झालेले नव्हते. म्हणजे, बाह्य परिस्थिती तशी होती, पण या परिस्थितीने त्यांच्या अंतरंगात प्रवेश केला नव्हता. महायुद्धाच्या हिसक्याबरोबर ही वस्तुस्थिती मानवजातीपुढे प्रकटपणे उभी ठाकली," असे महाकवींनी लिहिले. सुमेळ प्रस्थापित करण्याची निकड प्रतिपादन करीत टागोरांनी भरीला असे लिहिले की, "आता येथून पुढे जे राष्ट्र आपल्या स्वतःच्या देशापुरता स्वार्थी विचार करील ते नव्या युगाच्या धर्माशी विसंगत दिशा अनुसरेल आणि त्याला शांती लाभणार नाही." भारतातील असहकार चळवळीमागील वृत्ती आणि विश्वभारतीमध्ये साकार व्हायला हवी असलेली 'मानवजातीच्या ऐक्याबद्दलची त्यांची (टागोरांची) आशा' यामध्ये स्पष्ट विरोध आहे असे १९२१ मध्ये युद्धोत्तर जर्मनीहून परत आल्यानंतर टागोरांना वाटले.

गांधींचे उत्तर तेवढ्याच चोखपणे आणि तत्परतेने दिले गेले. मानवजातीची सेवा करण्याची त्यांची इच्छा टागोरांएवढीच तीव्र होती. जे जे पाश्चात्त्य त्याच्यात्याच्याशी असहकार, अशी गांधींची भूमिका नव्हती; भौतिक दृष्ट्या अधिक समर्थ अशा एका राष्ट्राने अधिक कमकुवत देशावर लादलेल्या पिळणुकीविरुद्ध त्यांचा असहकार होता. मानवजातीच्या सेवेची वृत्ती आणि अन्यायाचा व पिळणुकीचा अहिंसक प्रतिकार यांमध्ये विसंगती नव्हती. असहकार, अहिंसा आणि स्वदेशीचा संदेश साऱ्या जगासाठी आहे. "आमचा असहकार इंग्रजांविरुद्ध किंवा पाश्चात्त्यांविरुद्ध नाही. इंग्रजांनी स्थापन केलेल्या राज्यपद्धतीशी, भौतिकवादी संस्कृतीशी व तिच्यामध्ये स्वभावतः अंतर्भूत असणाऱ्या लोभाशी, दुर्बलांच्या पिळणुकीशी आमचा असहकार आहे" असे जाहीर करून गांधींनी पुढे अशीही भर घातली की, "मानवतेसाठी मरण पत्करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगण्यापूर्वी भारताला प्रथम सक्षमपणे जगायला शिकले पाहिजे."

वादविवादाच्या आवेशात टागोर व गांधी यांच्या दृष्टिकोणांतील फरक कदाचित अतिशयोक्तिपूर्वक मांडले गेले असतील. आपल्या अननुकरणीय शैलीमध्ये ही गोष्ट मान्य करताना गांधींनी म्हटले, "गुरुदेवांच्या व माझ्या विचारांतील संघर्षस्थळे शोधून काढण्याच्या वृत्तीने मी या लेखाला सुरुवात केली; पण असा कोणताच संघर्ष आमच्या विचारांत नसल्याचा गौरवपूर्ण शोध या लेखाच्या अखेरीस मला लागला." वास्तविक या दोन महामानवांमधील मतभेदांचे वळण संघर्षाऐवजी वैचारिक पूरकतेचे आहे.

वैज्ञानिक तर्कबुद्धी आणि सद्सदविवेकबुद्धी या माणसाच्या ठायी असलेल्या दोन्ही शक्ती सर्व मानवांचा समत्वबुद्धीने विचार करणेच योग्य होय, असे दिग्दर्शन करतात. स्वतःची टोळी-जमात वा राष्ट्र यांच्यावरील निष्ठा ही अंतिम व सर्वोच्च निष्ठा म्हणून स्वीकारणे कदापिही सत्याला धरून होणार नाही याची जाण गांधी व टागोर, दोघांनाही होती. सर्व प्रकारच्या प्रादेशिक व जमात वा राष्ट्र निष्ठा कितीही व्यवहारी वास्तवाला धरून व निकडीच्या असल्या तरी त्यांच्या 'पलीकडे' पोचणे हे आवश्यक राहते. असे असले तरी, या संदर्भातील एका खऱ्याखुऱ्या पेचाची त्यांना जाणीव होती. हा पेच टाळता येत नाही. योग्य प्रकारे त्याची सोडवणूकच करावी लागते, याचेही भान त्यांना होते. या पेचाची योग्य उकल करण्याचे तत्त्व, मार्ग व साधन म्हणून दोघांनीही 'स्वदेशी' हा शब्द उपयोगात आणला. 'स्वदेशी' ने

त्यांना काय अभिप्रेत होते त्याची गांधी व टागोर, दोघांनीही आपापल्या पद्धतीने स्पष्टता केली आहे.

अधिक पायाभूत स्वरूपात आणि जास्त मोठ्या (वाचक) वर्गाला समजेल अशा भाषेत या मुद्द्याची मांडणी करता येणे शक्य आहे. आकाशातील तेजाला पकडू पाहणाऱ्या वृक्षाला ज्या मुळ्यांपासून पोषण मिळते त्या मुळ्या अंधाऱ्या जमिनीत दृष्टिआड गाडलेल्या असतात. सृजनशील जाणिवेचीही गोष्ट अशीच आहे. जाणिवेची पाळेमुळे 'जमिनी'त खोलवर रुजलेली असली तरच मुक्त, वैश्विक 'आकाशा'त तिचा सर्जनशील आविष्कार घडतो. स्थलकालस्वरूपी 'जमिनी'त दृढमूलत्व कायम राखून स्थलकालाच्या पलीकडे जाऊन वैश्विक-सार्विक आविष्कार शक्य करणारे अतीतत्व कसे साध्य करावयाचे हा खरा पेच आहे. व्यक्तींना तसेच सांस्कृतिक दृष्ट्या 'घट्ट विणी'च्या जमातींना या प्रश्नाशी झगडावे लागते. "विनबुडाची बहुढंगी सबगोलंकारिता (कॉस्मॉपॉलिटॅनिझम)" नव्हे तर आपला प्रादेशिक पाया न सोडता अधिक विशाल संघटनेच्या दिशेने उन्नत होत जाण्याचा सततचा प्रयास हा अतीतलक्षी मानवतावादाच्या कसाचा निकष आहे. 'उल्लंघून' जाण्यासाठी कसला 'पाया'च नसेल तर 'अतीतलक्षी' या शब्दाला काही अर्थ उरणार नाही.

"आज वैश्विक मानवतेने आपल्याला आवाहन केले आहे. त्या आवाहनाला आपल्या अंतरातून उमटलेल्या भाषेमध्ये आपण प्रतिसाद देऊ या," असे गुरुदेव उद्गारले. हा प्रतिसाद अस्सल होण्यासाठी तो स्वभाषेतून दिला गेला पाहिजे. यामध्ये एकाच वेळी अनेक गोष्टी अनुस्यूत आहेत, असा याचा खरा अर्थ. व्यक्तीला आपला अनुभव पचवण्याची आंतरिक क्षमता असली पाहिजे. आपली अभिव्यक्ती यथायोग्यपणे कशी करावी हेही तिला माहीत असले पाहिजे. आपल्याला पूर्णपणे अवगत असलेल्या प्रतीकांच्या संचाद्वारे आणि आपल्या स्वभाषेतूनच ती असे करू शकेल असे म्हणता येईल. सांस्कृतिक स्वायत्ततेचा प्रश्न इतर अनेक गोष्टींना भिडतो. त्यामध्ये राजकीय स्वातंत्र्याच्या मुद्द्याचा समावेश होतो, पण त्याच्या पलीकडेही तो पोचतो.

चरख्याच्या माहात्म्याबद्दल गांधींबरोबर मतभेद असूनसुद्धा १९२१ मध्ये उपरोक्त लेखामध्येच टागोरांनी लक्षवेधी शब्दांत लिहिले होते, "सर्व जगाला ग्रासणाऱ्या यंत्राच्या जुलमाविरुद्ध महात्मा गांधींनी जिथे युद्ध पुकारले आहे तिथे आपण सर्वांनी त्यांच्या झेंड्याखाली दाखल झाले पाहिजे." हा त्यांचा केवळ त्या काळापुरता 'अपघाती' अभिप्राय नव्हता. या अभिप्रायाचा विषय झालेला प्रश्न नंतरच्या काळात अधिकाधिक महत्त्व पावलेला आहे. गांधींचा किंवा टागोरांचा यंत्राला यंत्र म्हणून विरोध नव्हता. तरीपण गांधींचे, उघडच, यंत्रांच्या स्वीकाराला अधिक दृढ असे आक्षेप होते. तथापि आधुनिक तंत्रविद्येचे काही परिणाम खोलवर अस्वस्थ करणारे आहेत, आणि गांधींइतक्याच स्पष्टपणे टागोरांच्याही ते ध्यानात आले होते. या विषयाच्या महत्त्वाच्या बाजूंपैकी काही थोड्या बाजूंना आपण थोडक्यात स्पर्श करणार आहोत. वास्तविक या पैलूंचे योग्य विवरण करायचे असेल तर प्रत्येकावर एक संपूर्ण निबंध लिहायला हवा अशा योग्यतेचे ते आहेत.

व्यामिश्र आणि पराकोटीच्या केंद्रित स्वरूपाचा कारभार असलेल्या आधुनिक राज्यसंस्थेचा उदय आधुनिक तंत्रविद्येमुळे सुलभ झाला. पूर्वी कधीच नव्हते एवढे राज्यसंस्थेवरील अवलंबन वाढवून समाज विकृत बनवायला ही गोष्ट कारणीभूत ठरली आहे. आपल्या खऱ्या अर्थापासून भ्रष्ट पावून 'समाजवाद' हा खरोखर जवळपास सर्वस्वी 'राज्यसत्तावाद'च बनला, हे या घडामोडीपासून आपण शिकले पाहिजे. स्पष्ट आणि परखड भाषेत या प्रवृत्तीबद्दल गांधी आणि टागोर यांनी सारखाच खेद व्यक्त केला होता. सत्तेच्या केंद्रीकरणाबरोबर नीतिहीन राजकारणाने आपली पकड जमविली आहे. परिणामी समाजातील नवनिर्मितिक्षम ऊर्जा वाढत्या प्रमाणावर सत्तास्पर्धेच्या कामी खर्ची पडत आहेत. सर्व गोष्टींचे कमालीचे केंद्रीकरण व सत्तेसाठीची नीतिशून्य जीवघेणी स्पर्धा यांनी ढासळणारा समाजाचा तोल, निर्माण होणारी विकृती दुरुस्त करणाऱ्या 'प्रतिरोधक शक्ती' ('काऊंटरव्हेलींग पॉवर्स') समाजव्यवस्थेमध्ये उत्पन्न केल्या, त्या पुरेशा प्रबळ झाल्या तर या संकटांचे निवारण करता येईल इतकी ही आपत्ती आटोक्यातील वा वरवरची नाही. समाजव्यवस्थेमधूनच हे संकट ओढवले असल्याने, अनेक गोष्टींची मुळातून तपासणी व पुनर्घटना करण्याची गरज आहे.

सत्तेच्या समूळ विकेंद्रीकरणावर आधारलेल्या नवीन समाज-व्यवस्थेची गरज आहे. अशा विकेंद्रीकरणाच्या जोडीला या नव्या समाजव्यवस्थेला अनुरूप अशा नवीन प्रकारच्या तंत्रविद्येचा आणि नव्या (संस्कृतीचा) विकास होणेही गरजेचे आहे. या नव्या प्रारूपाची बांधणी खालपासून वर अशी झाली पाहिजे; राज्यकर्त्यांनी ती वरून लादलेली असता कामा नये, असा याचा अर्थ होतो. आपल्या रचनात्मक कार्यक्रमाद्वारे, सर्वोदयाच्या चळवळीमार्फत तसे करण्याचा प्रयत्न गांधीजींनी केला. अधिक मर्यादित प्रमाणावर रवींद्रनाथांनी तशी खटपट श्रीनिकेतन संस्थेची निर्मिती करून त्यांच्या ग्रामीण पुनर्रचना कार्यक्रमाद्वारे केली. प्रतिकूल परिस्थितीच्या विरोधात जाऊन या दिशेने फार वाटचाल ती दोघे करू शकली नाहीत. तथापि त्यांनी खऱ्या नव्या वाटा चोखाळल्या. मानवजातीच्या







अनुक्रमणिका

एकतेसाठीचे मार्गक्रमण करताना सुरुवात खेड्यांपासूनच झाली पाहिजे. खेड्यांपासून सुरुवात करण्याचे कार्य कमालीचे कठीण, परीक्षा पाहणारे भासले तरी त्याला पर्याय नाही, हें त्यांना माहीत होते. आधुनिक तंत्रवैज्ञानिक उद्योगीकरणाची प्रक्रिया प्रादेशिक विविधता पुसून टाकून जो निर्जीव एकछापी एकसारखेपणा निर्माण करण्यास कारणीभूत होते त्यालाच मनुष्यमात्रामधील एकात्मता असे नामभिधान देणे चुकीचे आहे. विविधतेतील एकता हीच खरी जिचा सोहळा साजरा करावा अशी गोष्ट आहे. हे उद्दिष्ट उचलून धरण्याच्या दृष्टीने आपल्या राजकीय आणि सामाजिक संस्थांच्या प्रारूपाचा फेरविचार करायला हवा. ते सोपे नाही, पण आशादायक भवितव्यासाठी तोच एकमेव मार्ग आहे.

सदैव युद्धसज्ज राहण्याचे उद्दिष्ट बाळगून अत्याधुनिक महासंहारक शस्त्रास्त्रांचा साठा वाढविण्यावर व खडे सैन्य जय्यत ठेवण्यावर भर देणारी भूमिका उघड किंवा प्रच्छन्न स्वरूपात जगभर प्रकर्ष पावल्याने हे काम अमाप कठीण झाले आहे. आधुनिक तंत्रविद्येची कामगिरी जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रामध्ये नेत्रदीपक आहेच. पण यातही शस्त्रास्त्रांच्या संभाव्य संहारक शक्तीच्या बाबतीत ती सर्वांत अधिक दिपवून टाकणारी, त्याच वेळी महाभयानक आहे. नैतिक दृष्ट्या न सुधारलेल्या मानवजातीच्या हाती अशी शस्त्रास्त्रे या तंत्रविद्येने सुपूर्द केली आहेत. उद्योगवादाला (इंडस्ट्रिॲलिझम) जे माहात्म्य प्राप्त झाले आहे, प्रत्येक राष्ट्र त्याची जी पूजा बांधत आहे त्याचे कारण या मार्गाने जाऊन जी राष्ट्रे औद्योगिक दृष्ट्या प्रगत बनली आहेत त्यांनी आपले नैतिक श्रेष्ठत्व प्रकट केले आहे हे नाही. ही राष्ट्रे लष्करी दृष्ट्या बलिष्ठ आहेत, त्या महासत्ता आहेत, व याचे श्रेय उद्योगवादाला आहे, म्हणून मुख्यतः उद्योगवादाची पूजा सर्व राष्ट्रांनी चालविली आहे. प्राचीन काळातील अश्वारूढ लुटारू टोळ्यांची जागा आजच्या युगात औद्योगिक दृष्ट्या प्रगत आणि लष्करी दृष्ट्या समर्थ राष्ट्रांनी घेतली आहे. ती राष्ट्रे आपली आक्रमक क्षमता, संरक्षणव्यवस्था मजबूत करण्यासाठी प्रचंड प्रमाणावर पैसा व साधने, मनुष्यबळ खर्ची घालून ती सतत वाढवीत आहेत. याच राष्ट्रांनी आधुनिक तंत्रविद्येच्या क्षेत्रात केलेल्या संशोधनामधून काही विधायक लाभही पदरात पडले आहेत. उदाहरण, सुधारित वैद्यकशास्त्र. याच्या प्रसारामधून काही समस्याही उभ्या राहिल्या आहेत हे खरे. तथापि मानव आणि निसर्ग यांच्या शोषणाची एक संघटित व्यवस्था उभारणे आधुनिक तंत्रविद्येने शक्य केले आहे, आणि त्यामुळे मानवजातीचे व मानवी संस्कृतीचे भवितव्य धोक्यात आले आहे, ही अधिक गंभीर बाब आहे.

उच्चतंत्रविद्येच्या विध्वंसनक्षमतेमुळे मानवी एकतेच्या संकल्पनेला आज एक नवीन भौतिक पाया लाभला आहे. पृथ्वीवरील खंडांचा, देशांचा, सागरांचा शोध, वाहतुकीच्या व दळणवळणाच्या पद्धतींमधील लक्षणीय सुधारणा हे जगाला एकत्रित करणारे घटक आहेत आणि त्यामुळे भौतिक स्वरूपात जागतिक एकतेचा पाया घातला गेला आहे, असे पूर्वीच्या काळी लोक बोलत असत; पण आता जगाचा आण्विक संहार आणि पर्यावरणीय अरिष्ट या जोडगोळीच्या दहशतीमुळे एका नकारात्मक प्रकारे आणि तरीसुद्धा अतिशय जबरदस्तपणे एकतेची अनिवार्यता आपल्या मनावर ठसवली गेली आहे. एकतर संपूर्ण मानवजात तरेल वा संपूर्ण मानवजात विनाश पावेल; अन्य समाज नष्ट होतील पण माझा समाज टिकून राहील हे इतःपर शक्य नाही हे सत्य आपल्या मनावर बिंबले आहे. आजच्या घटकेला एखाद्या टोळीची, वंशाची किंवा राष्ट्राची भरभराट साधण्यासाठी इतरांचा उच्छेद करावा असा विचार आणि अशी कृती म्हणजे भावी काळासंबंधीच्या धोकादायक अदूरदृष्टीचे द्योतक ठरेल.

आपण आधीच पाहिल्याप्रमाणे, १९१८ मध्ये संपलेल्या महायुद्धानंतर टागोरांनी या मुद्द्यावर भर दिला होताच. १९४५ नंतर हा मुद्दा जबरदस्त ताकदीचा ठरत आहे. मानवतावाद आणि मानवी अस्तित्वाचा प्रश्न या दोन गोष्टी आज परस्परावलंबी बनल्या आहेत.

तथापि, केवळ भीती मानवी एकतेसाठी पुरेशी आणि टिकाऊ बैठक पुरवू शकत नाही. तिला जोड देण्यासाठी आणि बळकटी आणण्यासाठी एका विधायक जीवनदर्शनाची, जीवन ही जतन करण्यासारखी अशी गोष्ट आहे याची आंतरिक जाणीव आवश्यक आहे. मानवी स्वभावात अतिशय खोलवर रुजलेली विजिगीषा मानवतेचा बचाव करायला पुरेशी आहे असे वाटू शकेल. पण हा याविषयीचा फारच वरपांगी दृष्टिकोण झाला. लोक मरण्यासाठीही तयार असतात. व्यक्तिगत आणि सामूहिक पातळीवरसुद्धा आत्महत्या करायलाही तयार असतात. मरण उदात्त असू शकते आणि कधीकधी ते विवेकी कृत्यही असू शकते. व्यक्तिगत पातळीवरील मरणामुळे मानवी जीवन नष्ट होत नाही. मानवजात टिकवून ठेवण्यासाठी आपल्याला मानवी जीवनासंबंधीच्या पुरेशा उदात्त दर्शनाची गरज आहे. असे दर्शन जीमधून प्रकट होईल अशी गोष्ट मानवी स्वभावाच्या गाभ्याशी आहे का?

जीवनसंघर्षामध्ये यशस्वी होण्यास साह्यकारी अशा काही निषेधात्मक भावना आणि चेतनांची देणगी मानवी स्वभावाला मिळालेली आहे. भीती आणि द्वेष यांचा उल्लेख उदाहरणादाखल







करता येईल. लोभ ही एक हीन भावना आहे हे खरे. पण वस्तूंच्या सेवनापासून मिळणाऱ्या सुखाच्या मर्यादेत राहणारी वासना ही जीवनपोषक आहे. जीवनधारणेसाठी आवश्यक व उपकारक ही मर्यादा ओलांडून त्या वासनेचा अतिरेक होतो, ती मर्यादा ओलांडून हाताबाहेर जाते तेव्हा तिला 'लोभ' हे विकृत व घातक रूप प्राप्त होते. सर्व हीन भावनांपासून होणारी अडचण अशी की, आपले स्वतःचे हितसंबंध इतरांच्या हितसंबंधांच्या विरोधात असल्याचे चित्र त्या मनात उभे करतात. हीन भावनांच्या निषेधार्थ केलेल्या युक्तिवादाचे दोन भाग पडतात. एक भाग स्पष्टपणे भौतिक आहे. या भागातील युक्तिवाद साधा असला तरी व्यवहारात तो नेहमीच प्रभावी ठरत नाही. लोभ, भीती आणि राग यांचा अतिरेक झाला तर इतरांना दुखावण्याबरोबरच संबंधित व्यक्तीच्या स्वतःच्या भौतिक हितसंबंधांनाही त्यामुळे नुकसान पोचू शकते हा तो युक्तिवाद होय. पण हे प्रकरण एवढ्यावरच थांबत नाही. या युक्तिवादाचा दुसरा एक भाग आहे. भौतिक हितसंबंधांचा समावेश करणारा आणि तरीही त्यांच्यापलीकडे जाणारा असा तो भाग आहे.

मनुष्यप्राण्यांमध्ये कल्पकता, सहानुभूती आणि प्रेमभावना यांचा आविष्कार करण्याच्या नैसर्गिक क्षमता आहेत. त्यांच्यामुळेसुद्धा काही भौतिक उद्दिष्टे साध्य होतात. पण या मर्यादित उद्दिष्टांपलीकडील अनुभूतीच्या, आनंदाच्या एका वेगळ्याच विश्वात प्रवेश करण्यासाठी या क्षमता मदतरूप ठरतात. ही अनुभूती परमेश्वरी कृपाप्रसादामुळे वाटणाऱ्या धन्यतेची वा, भारतीय दार्शनिक परंपरेतील अर्थाने, 'आनंदा'ची असते असे धार्मिक परिभाषेत म्हणता येईल. हे एक वेगळ्याच प्रकारचे अतीतत्व असते. स्वामित्व-भावनेने जखडलेल्या व्यक्तीचे सर्वात मोठे नुकसान म्हणजे त्या अतीतत्वाचा मार्ग तिला बंद होतो. मानवी अस्तित्वाच्या माहात्म्याचे अधिक सखोल आकलन होण्याचा मार्ग तिला बंद होतो. आपल्याला जे काही माहीत आहे त्यानुसार, माणूस विवेकशक्तीच्या बाबतीतच नव्हे तर आध्यात्मिक अतीतत्वाच्या ह्या शक्तीमुळेही इतर प्राण्यांपासून भिन्न ठरतो.

ह्या गोष्टीकडे दुर्लक्ष करणे म्हणजे भौतिक व आध्यात्मिक, उभय प्रकारे, आपले जीवन कंगाल बनवणे होय. अलीकडच्या काही वर्षांत जगाला ज्या संभाव्य पर्यावरणीय अरिष्टाची वाढती जाणीव होत आहे त्यामुळे जास्त जोरदारपणे आपल्या मनावर हे सत्य ठसवले जात आहे. निसर्गाचे शोषण करून माणसाच्या निसर्गावरील स्वामित्वाचा अभिमान बाळगणे श्रेयस्कर नाही. इतर प्राण्यांहून आपण श्रेष्ठ आहोत, निसर्गावर आपण विजय मिळविला आहे अशा प्रकारचा, मानवी जमातीला गर्विष्ठ बनविणारा उद्घोष एके काळी सुपरिचित असलेल्या मानवतावादाचा बीजभूत भाग होता. आजच्या घडीला अतिशय तीव्रतेने ज्याची गरज भासत आहे ती ही गोष्ट नव्हे. उलटपक्षी अतीतलक्षी मानवतावाद प्रेममय मीलनामधून साधल्या जाणाऱ्या अतीतत्वावर भर देतो.

# शतकांच्या संधिकालातील साहित्यधर्म*

रा. ग. जाधव

आपण सर्वांनी या संमेलनाच्या अध्यक्षपदी माझी निवड करून पात्रतेचा नव्हे, तर प्रेमाचा निकष महत्त्वाचा मानला, याची मला जाणीव आहे. आपल्या सर्वांविषयी याबद्दल मनःपूर्वक कृतज्ञता व्यक्त करून मी या पदाचा नम्रपणे स्वीकार करीत आहे.

'अस्मितादर्श', दलित साहित्य व साहित्यिक यांच्याशी माझे नाते एक सहप्रवासी, एक सहयात्रिक म्हणून आहे. मी साहित्य निर्माण केलेले नाही. मी साहित्याचा सोबती आहे; खरे तर व खऱ्या अर्थाने साहित्य हेच माझी सोबत करीत आले आहे.

डॉ. पानतावणे व 'अस्मितादर्श' यांनी दलित साहित्याच्या एका महत्त्वाच्या ऐतिहासिक पर्वाची निष्ठापूर्वक जडणघडण केली आहे, हे आपण जाणतोच. या जडणघडणीत सिंहाचा वाटा आणि खारीचा वाटा यांना सारखेच महत्त्व आहे. माझा वाटा चिमुकल्या खारोटीचा आहे; पण माझा त्याबद्दलचा अभिमान मात्र सिंहासारखाच आहे. हाही एक महत्त्वाचा विवेक आहे व तो माणसाला छोटे नव्हे, तर मोठेच करणारा आहे, हे आपण लक्षात घेतले पाहिजे.

### मनुष्याची मृण्मयता व साहित्यधर्म

साहित्य संमेलनाचा अध्यक्ष होणे व अध्यक्ष म्हणून बोलणे माझ्या प्रकृतीला रुचत नाही. एक साहित्यप्रेमी म्हणून व त्या प्रेमाच्या कर्तव्याची व हक्कांची जाणीव ठेवून मला साहित्याबद्दल काहीबाही बोलता येते. साहित्याच्या आतला माणूस म्हणून, एक 'इन्सायडर' म्हणून, मी विचार करू शकतो; साहित्याच्या बाहेरचा माणूस म्हणून नव्हे! जाणत्या वयापासून वाचत आलेल्या साहित्यामुळे माझे व्यक्तिगत खासगी विश्वही माझ्या कळत-नकळतपणे मोठेमोठे होत गेल्याचे मला जाणवते. हे व्यापक होत जाणारे जग निखळ माणसाचे, त्याच्या नैसर्गिक, भौतिक परिसराचे व भावनेचे जग आहे. ते साक्षात, प्रत्यक्ष व वास्तव रूपातील आहे. ते सगुणसाकार, इंद्रियगोचर, दिसणारे-जगणारे-वाढणारे, सतत उमलणारे-फुलणारे-सुकणारे असे जग आहे. साहित्यामुळे माणसाचे पार्थिव विश्वच खरे तर विशाल होत जाते आणि पार्थिवता, मृण्मयता हेच मनुष्यसंस्कृतीचे एकमेव सत्य आहे. पार्थिवतेला पृथ्विवत् केवळ देहच नाही, तर तिला एक जीवही आहे. मनुष्याची पार्थिवता ही एक सजीव सत्यता आहे. मी तत्त्वज्ञानाचा माणूस नाही. धार्मिकही नाही. त्यामुळे तत्त्वज्ञान आणि धर्म यांच्या परिशीलनाने माणसाचे जग कितपत विस्तारते, हे सांगण्याचा अनुभव व अधिकार मला नाही. तथापि कोणताही धर्म व कोणतेही दार्शनिक तत्त्वज्ञान माणसाला माणूस म्हणून संपूर्ण प्रतिष्ठा देते की नाही, याबद्दल मला शंका आहे. मनुष्य व मनुष्यजीवन यांना स्वत्व किंवा अस्मिता असते किंवा बहाल करणे उचित ठरते हे, निदान सरळपणे, मान्य करण्यास धर्म व तत्त्वज्ञाने क्वचितच राजी असतात. माणसाची आयडेंटिटी, त्याचे सत्त्व म्हणजे पार्थिवता आहे, हे त्यांना मान्य नसते. मनुष्याची सुखदुःखे, त्याचे यशापयश, त्याची असाहाय्यता व अगतिकता, त्याची पराधीनता व पतनप्रवणता, त्याचे कल्याण व सार्थकता या सगळ्यांविषयी धर्म व दर्शने विलक्षण संवेदनशील असतात, कारुण्याने लदगदलेली असतात, उद्धारासाठी व तारणासाठी उत्सुक असतात हे खरेच आहे. पण यासाठी ते माणसाच्या खासगी जिण्याचाच संकोच करतात, त्याला त्याच्या मनाच्या व जगाच्या छोट्या खंडावर उभे राहण्यास सांगतात; व्यापक व विविधतापूर्ण मनुष्यसृष्टीचा एखाद्या मठात, एखाद्या मंदिरात, एखाद्या मशिदीत, एखाद्या चर्चमध्ये किंवा एकाद्या स्तूपविहारात संक्षेप घडवून आणतात. मनुष्याच्या या भव्योदात्त सृष्टीला नजरेआड करून नजरेआडच संभवणाऱ्या अलौकिक सृष्टीचा एक मोहक पर्याय निर्माण करतात. मनुष्याची स्वायत्तता, अस्मिता, स्वयंपूर्णता, स्वाभिमान यांना धर्म-दर्शनांनी दिलासा दिलाही असेल, पण त्यावरील विश्वासाची कबुली मात्र दिलेली नाही. साहित्य या प्रकारची कबुली कळत-नकळतपणे मनुष्यमात्राला देत असते. साहित्याने नेहमीच माणसाला माणसांत राखण्याचा प्रयत्न केला आहे; माणसाला माणसातून उठवण्याचा यत्न केलेला नाही. माणसाची प्रतिष्ठा या जगात साहित्यानेच प्रारंभापासून सांभाळली आहे. माणसाला माणसांच्या

* बाविसाव्या 'अस्मितादर्श' साहित्य संमेलनाच्या (१९९६) अध्यक्षपदावरून देगलूर (जि. नांदेड) येथे डिसेंबर १९९६ मध्ये केलेले भाषण संमेलनाच्या आयोजकांच्या सौजन्याने आम्ही पुनर्मुद्रित करीत आहोत.

अनुक्रमणिका

अधिकाधिक निकट आणण्याचा प्रयत्न केला आहे. मानवी समाजाच्या इतिहासात माणसे जोडण्याची, माणूसपणाचा विस्तार करण्याची, स्थलकालनिरपेक्ष अशी लांबलचक मनुष्यशृंखला जुळविण्याची कामगिरी साहित्याने केलेली आहे. मनुष्यसमाजातील साहित्याचा इतिहास हाच माणसाचा खराखुरा इतिहास आहे, कारण तोच माणसाचे माणूसपण विकसित करणारा एकमेव घटक आहे. माणसाची आरती फक्त साहित्यानेच गायिली आहे, धर्मांनी व दर्शनांनी नव्हे! मानव्याची विशाल वैश्विक प्रचिती केवळ साहित्यानेच दिलेली आहे. माणसाची खरी स्वप्ने फक्त साहित्यानेच पाहिली आहेत. साहित्य हेच मनुष्यत्वाचे आद्यंती शुद्ध असलेले एकमेव प्रतीक आहे, प्रतिमा आहे.

*"एक तीळ सर्वांनी करंडून खावा*
*माणसावरच सूक्त रचावे*
*माणसाचेच गाणे गावे माणसाने...."*

असे उदात्त भान एक कवीच व्यक्त करतो. धर्म-दर्शनेही एक तीळ सर्वांनी करंडून खावा असे सांगतात, सांगू शकतात; पण त्यामागील भावना माणसावरील श्रद्धेची नसते, तर ती माणसावरील विकल्पाची असते. धर्म-दर्शनांनी माणसाची आरती कधीही मनापासून म्हटलेली नाही, त्यांनी माणसावरील विश्वास कधीही व्यक्त केला नाही.

मी साहित्याला सर्वस्व मानतो. माझा आयुष्यभरचा साहित्यसहवास मला हेच पटवून देत आलेला आहे. सर्वस्व म्हणजे जर धर्म असेल, तर साहित्य हाच माझा धर्म आहे. या साहित्यधर्माचा खरा उपासक हा एकाच वेळी एक विशिष्ट मानव आणि एक विशाल विश्वमानव असतो. तो रा. ग. जाधवही असतो आणि त्याच वेळी तो नामदेव ढसाळ, दिलीप चित्रे, नामदेव व तुकाराम, केशवसुत व मर्ढेकर हे सर्वच असतो. तो *गलिव्हर्स ट्राव्हल्स*चा असतो, *रॉबिन्सन क्रूसो*चा असतो, *मॉबी डिक*चा असतो, *ब्रदर्स कारामाझॉव्ह*चा असतो, *वेस्ट लँड*चाही असतो. तो वैदिक ऋचांचा असतो, चार्वाकाचा असतो, जातककथांचा असतो आणि *फाऊस्ट*चाही असतो. तो भूतकाळाचा असतो आणि वर्तमानासकट भविष्यकाळाचाही असतो. तो मराठी असतो, भारतीय असतो, आफ्रो-आशियाई असतो, यूरो-अमेरिकन असतो आणि चंद्रसूर्याचाही असतो. त्याची विभूती अशी पसरत, पांगत विश्वात्मक होत जाते. मित्रहो, एक साहित्यधर्मी म्हणून या अर्थाने मी इथे उभा आहे व मी जसा इथे उभा आहे, तसाच मी तिथे, पलीकडे, घरीदारी उभा असतो. या व्यापक साहित्य-धर्माबद्दल खरे तर मी काही आपणांस सांगावे, अशी गरज नाही. तुम्ही सर्वही साहित्यप्रेमी आहात, या प्रेमाचा धर्म करण्याच्या आकांक्षेने धडपडत आहात. साहित्यधर्माला कुणी एकमेव प्रेषित नाही, परमेश्वर नाही, एकच एक धर्मग्रंथही नाही. चार ओळींची कविता हीदेखील आपला धर्मग्रंथ होऊ शकते आणि एखाद्या अज्ञात अंधाऱ्या गावकुसाबाहेरचा एखादा लेखक हाही आपला धर्मपुरुष असू शकतो. साहित्यधर्म हा एकमेव मुक्त मानवधर्म आहे. या जगात जर कधीकाळी एकता व एकोपा निर्माण झालाच, तर तो फक्त साहित्यधर्माच्या अधिष्ठानावरच उभा असेल! साहित्याची भाषा ही त्याची खरी भाषा नाही, साहित्याची खरी भाषा भावना हीच आहे. ही भावना नैतिकतेची, मूल्यभानाची आहे. धर्म-दर्शनांची भाषाही हीच असते हे खरे, पण या भाषेने माणसाची उभी किंवा आत्मकेंद्रित वाढ होते. उलट, साहित्याच्या भाषेमुळे माणसाची आडवी वा बहुकेंद्री वाढ होते. आणि विद्यमानाच्या ज्या पर्यावरणात आपण सर्वजण वावरत आहोत, ज्या पर्यावरणात आपण आपला साहित्यधर्म सांभाळत आहोत, त्या आज-उद्याच्या पर्यावरणात उभ्या विकासापेक्षा आडव्या विस्ताराची गरज अधिक आहे. कारण मनुष्यसंस्कृतीचा हा आडवा विस्तार आज संकोच पावत आहे आणि या संकोचाच्या वाह्य प्रक्रियेत आपल्या जाणिवांचा, आपल्या संवेदनशीलतेचा, आपल्या प्रसरणशील विश्वभानाचा, आपल्या साहित्यधर्माचा संकोच होणार नाही, कोंडी होणार नाही याची काळजी घेणे भाग आहे. आपल्या साहित्यप्रेमाला व साहित्यधर्माला, निरोप घेणाऱ्या विसाव्या शतकाने या ऐतिहासिक आव्हानाची प्रकर्षाने आठवण करून दिलेली आहे. आपल्या लेखनातून या आव्हानाचे भान जपले जाईल, याची दक्षता आपल्या कविलेखकांनी घेतली पाहिजे आणि लेखन वाचणाऱ्या आपण सर्वांनी त्या भानाची ओळख मनःपूर्वक करून घेतली पाहिजे, असे मला वाटते.

### साठोत्तरी पर्वाचे दुखरे असमाधान

'अस्मितादर्श'च्या या साहित्यसंमेलनात वावरताना मला सुमारे तीस-पस्तीस वर्षांपूर्वीचा औरंगाबाद येथील नागसेनवनाचा मंतरलेला परिसर आठवत आहे. त्या वेळी तिथे वाङ्मयीन सर्जनशीलतेची बीजे रुजत होती, अंकुरत होती, फुलू पाहत होती. या बीजांच्या गेल्या तीस-पस्तीस वर्षांत वृक्षवेली झाल्या. कविता, आत्मकथा, कादंबरी, कथा, नाटक, विचारप्रबंध, संशोधनसाहित्य, समीक्षा इत्यादी अंगांनी एक प्रभावी साहित्यप्रवाह खळखळून वाहू लागला. मला व्यक्तिशः या सर्व निर्मितीबद्दल मनापासून समाधान वाटते. असमाधान आहे, पण ते थोडे आहे आणि ते लेखक-कवींसंबंधी कमी आणि वाचक-समीक्षकांविषयी अधिक आहे. मराठीतील चांगल्या व ज्येष्ठ-श्रेष्ठ साहित्यिक-समीक्षकांनी आपल्या ज्ञानाचा, अनुभवाचा, व्यासंगाचा लाभ



अनुक्रमणिका

पुरेशा आत्मीयतेने या नव्या प्रवाहकांना होऊ दिला नाही. त्यांनी खऱ्या जिव्हाळ्याने व आस्थेने या प्रवाहकांना मायेचे उद्‌बोधक शब्द ऐकविले नाहीत. या धडपडणाऱ्या साहित्यिकांची 'श्यामची आई' कुणीच झाले नाही. त्यांचे गृहपाठ व साहित्यपाठ मनापासून पूर्णपणे वाचून मगच त्यांची पाठ थोपटणारे किंवा कान धरणारे जिव्हाळ्याचे पंतोजी व कळकळीचे दुढ्ढाचार्य कुणीच नव्हते! औपचारिक शब्दांनी व अभिप्रायांनी या नव्याचे जुन्यांनी स्वागत केले आणि हा स्वागतसमारंभ ते तिथेच विसरून गेले. ज्यांनी आपुलकीचा आव आणला, त्यांनी या नव्या प्रवाहकांची सुलट तपासणी करण्याऐवजी उलट तपासणी केली. साहित्याच्या सारस्वतांच्या दालनात भीत भीत पावले टाकणाऱ्या नवथर मनांना त्यांनी मोठे मोठे प्रश्न विचारले, मोठ्या मोठ्या वळणांची व आडवळणांची प्रश्नमंजुषा त्यांना सोडविण्यास दिली. सर्वेक्षणे व सांख्यिकी यांचा दवदवा उभा केला. या नव्या सर्जनशील मनांना फुलवण्याऐवजी या ज्येष्ठाश्रेष्ठांनी त्यांच्या वाफ्यांना कळत-नकळत कोंडीत पकडून त्यांच्या दिशादिशांना विस्तारण्याच्या ऊर्मींना काटेरी कुंपणे घातली. वाङ्मयीन सर्जनशीलतेच्या प्रकृतीचे व प्रक्रियेचे एवढे प्रचंड अज्ञान दुसऱ्या कोणत्याही स्वतःला शहाण्या समजणाऱ्या सुसंस्कृत साहित्यधर्मी समाजाने प्रकट केले नसेल. तथाकथित काळजीवाहू समीक्षकांचा एक गट या नव्या दलित लेखक-कवींना वहाल करून व नको त्या काळज्यांचा भार त्यांच्यावर लादून ज्येष्ठ-श्रेष्ठ मराठी अभ्यासकांनी स्वतःला काळजीमुक्त करून घेतले. या गटात कुणी माझाही समावेश केला, तरी त्याला आक्षेप घेण्याचा नैतिक अधिकार मला नाही.

मुख्य म्हणजे ज्या व्यापक मराठी समाजासाठी नवे दलित मराठी साहित्य जन्माला आले त्या समाजात त्याला प्रतिसादच हात राखून देण्यात आला. दलित साहित्य हे आपल्या समाजाच्या सामूहिक अपराधी मनाला जाग आणण्यासाठी जन्मले याचे नेमके भानच दुर्लक्षित करण्यात आले. दलित कवि-लेखकांना 'मी-आम्ही'चा आत्माविष्कार केवळ करावयाचा नव्हता; तर 'तू-तुम्ही'चा नि ते आणि ते यांचा आविष्कार करावयाचा होता. दलितांना समजावून घेण्याबरोबरच दलितेतरांना समजावून देण्याची ती वाङ्मयीन धडपड होती. ज्या समाजाची पहिली-दुसरी पिढी नुकतीच कुठे साक्षर होऊ लागली होती त्या दलित समाजासाठीच नव्या दलित साहित्याचा अवतार झाला होता, ही समजूत वाङ्मयीन अज्ञानाची व आडमुठेपणाचीच निदर्शक आहे, हे वेगळे सांगण्याची गरज नाही. नव्या दलित साहित्याचे वाचन-परिशीलन साहित्यबाह्य प्रभावांच्या दडपणातून होत राहिले, निखळ साहित्यिक प्रवृत्तीने नव्हे, असेच त्या वेळचे चित्र होते. हे राजकारण होते, साहित्यकारण नव्हते. पाठ्यपुस्तके, शालेय व विद्यापीठीय अभ्यासक्रम यांतून दलित साहित्य विद्यार्जन व अर्थार्जन या व्यावहारिक साखळीशी जोडले गेले. आकादमिक पुस्तकी गरजांशी व अर्थशून्य प्रश्नांशी त्याचे वाचन-परिशीलन निगडित झाले. साहित्याच्या राजकारणातही ज्येष्ठ-श्रेष्ठ अभ्यासक आपली काळजीमुक्त निश्चिंतता अबाधित राखण्यात यशस्वी झाले.

गांधीवाद, मार्क्सवाद, आंबेडकरवाद, परिवर्तनवाद, साहित्यसिद्धान्त, सौंदर्यशास्त्र, क्रांतिवाद, धम्मवाद, राष्ट्रवाद, आंतरराष्ट्रीयता, वसाहतवाद, सांस्कृतिक प्रभुत्व यांसारख्या बड्याबड्या विषयांचा ऐसपैस पसारा मांडून नव्या दलित सर्जनशीलतेला मराठी ज्येष्ठा-श्रेष्ठांनी पुरेसे भ्रांत केले. या सर्व महाचर्चेत साहित्य, साहित्यिक, त्याची सर्जनशीलता हे मुख्य विषयच बाजूला फेकले गेले आणि तरीही अशी महाचर्चा म्हणजेच समीक्षा असा आभास निर्माण करून नव्या कविलेखकांना जीवनाभिमुख करण्याऐवजी प्रणालिसन्मुख व समीक्षाभिमुख केले. मला विचारवंत व समीक्षक यांचा अधिक्षेप करावयाचा नाही. मला त्यांच्याबद्दल आदरच आहे, परंतु खरे विचार व खरी समीक्षा चांगल्या साहित्याला अधिक चांगले करते, चांगले होण्याची दिशा दाखवते. खोटी समीक्षा चांगले साहित्य वाईट आणि वाईट साहित्य चांगले ठरवते. तिच्या अशा चांगले-वाईटपणाचा प्रभावही खोटाच ठरतो. नव्या लेखककवींना खरे-खोटे असे हे समीक्षेचे आविर्भाव जाणण्याचा अनुभव नसतो, खरे तर तशी त्यांची मनःस्थितीही नसते. दलित लेखक-कवींवर नाकारलेल्या परंपरेचे जेवढे दडपण नसते तेवढे दडपण प्रणालींचे व समीक्षेचे आहे, आणि आजतागायत ते टिकूनही आहे, ही मोठ्या चिंतेची बाब आहे. साठोत्तरी आद्यपर्वातील शिष्टाचारभीरू, काळजीवाहू व विचारजड अशा कामचलाऊ चर्चेने नव्या दलित लेखकांना एकाच वेळी फसवे समाधान व भ्रांत असमाधान यांचे वाटेकरी करून खऱ्या सर्जनाच्या वाटा धूसर केल्या.

आधुनिक साहित्याची व समीक्षेची प्रदीर्घ परंपरा असलेल्या सुसंस्कृत मराठी समाजात एकही अभ्यासक पुढे येऊन असे सांगू शकला नाही, की नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ, दिलीप चित्रे, अरुण कोलटकर, ग्रेस यांसारखे सर्वच नवे लेखक आपल्या समाजातील दलिततत्वाची भिन्न भिन्न रूपे एकसारख्याच तळमळीने अनुभवत आहेत, आविष्कृत करीत आहेत. साठोत्तरी काळातच पहिल्या पर्वात असे म्हटले गेले असते, तर मराठी दलित साहित्य बाह्यप्रेरित पिंजऱ्यात अडकूनही बसले नसते. हे आपण केले नाही; स्वतःला, समाजाला व नव्या सर्जनशील मनांना पटवून देऊ शकलो नाही, याचे कारण आपली वाङ्मयीन संस्कृती

पुरेशी प्रगल्भ व जाणती नाही हेच आहे. अशा संकुचित, सत्यतेपेक्षा सुरक्षेला अधिक जपणाऱ्या व वेड घेऊन पेडगावला जाऊ पाहणाऱ्या संस्कृतीच्या पुरस्कर्त्यांना उद्देशून एखादे भालचंद्र नेमाडे जेव्हा 'शेंबडे समीक्षक' असे शब्द वापरतात, तेव्हा त्यामागील बोच व खंत आपणास समजू शकते.

या झाल्या-गेल्या गोष्टी आता उगाळत बसण्यात स्वारस्य नाही. मलाही असेच वाटते. साठोत्तरी कालखंडात प्रकट होऊन गेल्या तीसपस्तीस वर्षांत जे दलित साहित्य निर्माण झाले त्याच्या संदर्भातील माझे थोडेसे असमाधान काय आहे तेच मला थोडक्यात दिग्दर्शित करावयाचे होते. साठोत्तरी कालखंडातील व आजतागायतचे एकूणच मराठी साहित्य व म्हणून दलित साहित्यही मला चांगले व महत्त्वाचेही वाटते. त्यात कदाचित महानता नसेलही, पण महानतेच्या खुणा मात्र त्यात नक्कीच आहेत. दलित साहित्याने मराठी साहित्याला व एकूणच भारतीय साहित्याला एक नवी आयडेंटिटी, एक नवे स्वत्वरूप दिलेले आहे. इंडॉलॉजी किंवा भारतविद्या यांच्या, युरोपीय विद्वानांनी प्रवर्तित केलेल्या, संकुचित संकल्पनेला एक नवे वास्तव परिमाण बहाल केले आहे. आमच्या समाजाच्या 'इनसायडर' व 'आऊटसायडर'च्या देशी संकल्पना प्रभावीपणे मूर्त केल्या आहेत. दलितता व अस्तित्ववादी भान यांना आमच्या मातीच्या बीजांतून फुलवले आहे. लेखक-कवींनी समाधानी असू नये आणि जातिवंत लेखक-कवी क्वचितच समाधानी असतो. जातिवंत वाङ्मयीन संस्कृती हीदेखील क्वचितच समाधानी असते. परंतु एक साहित्यप्रेमी म्हणून, एक साहित्यधर्मी म्हणून मी व माझ्यासारखे शेकडोजण मराठी साहित्य व दलित साहित्य यांविषयी उठसूट तक्रार करीत बसणार नाहीत. लेखक-कवींचे आत्मिक असमाधान शुद्ध, निर्मळ राहावे, राखावे; त्यात समाजाने आपले असमाधान मिसळून ते शबल करू नये असे मला वाटते.

### युवालेखकांच्या छावणीत

या आताच्या प्रसंगी माझ्यासमोर साठोत्तरी कालखंडातील मराठी दलित व दलितेतर साहित्य नाही. माझ्या पुढे आज-उद्याचा मराठी लेखक-कवी आहे, दलित साहित्यिक आहे. आपले हे युवालेखक ज्या पर्यावरणात वावरत आहेत ते पर्यावरण आणि त्यांचे सर्जनशील आत्मभान जाणून घेण्यास मी उत्सुक आहे. साहित्यनिर्मितीसंबंधी त्यांचा 'कन्सर्न', त्यांची आस्था व नाते कशा प्रकारचे आहे; त्यांच्या मनोबुद्धीवर, संवेदनशीलतेवर कोणत्या गोष्टींचा प्रभाव आहे; या प्रभावातून आविष्काराच्या वाटा व वळणे ते कशा प्रकारे शोधत आहेत; या शोधात त्यांना वाङ्मयीन पूर्वपरंपरेचा अन्वय कशा रीतीने जोडता येत आहे; त्यांच्या जगण्याच्या वास्तवाशी त्यांची सर्जनशीलता कशा रीतीने संगती राखत आहे; त्यांची वाङ्मयीन स्वप्ने कोणती आहेत आणि वाङ्मयीन साधने व साधना कशा प्रकारची आहेत; प्रस्थापितांशी त्यांचे संबंध कशा प्रकारचे आहेत आणि त्यांच्या सामाजिक संबंधांचे व जाणिवांचे स्वरूप कशा प्रकारचे आहे, यांसारख्या विषयांत मला रस आहे. समीक्षेची उद्दिष्टे व क्षेत्रे व्यापक व विविध प्रकारची आहेत, हे आपण जाणतोच. साहित्याची निर्मितिपूर्व समीक्षा व निर्माणोत्तर समीक्षा असे दोन प्रकार आपण मानले, तर माझी आजची मनःस्थिती ही निर्माणपूर्व समीक्षेकडे झुकलेली, काहीशा अपरिहार्यपणे झुकलेली आहे हे इथे सांगितलेच पाहिजे. शिवाय निर्माणपूर्व समीक्षा काहीशा स्वाभाविकपणे ज्या व्यापक परिप्रेक्ष्यात साहित्य-साहित्यिक-समाज-संस्कृती यांच्या परस्परसंबंधांचा वेध घेऊ पाहते, तेवढ्या सहजपणाने लेखनोत्तर समीक्षा त्या परिप्रेक्ष्यात प्रवेश करतेच, असे नाही. कारण शुद्ध साहित्यिक परिप्रेक्ष्याचा पर्याय या लेखनोत्तर समीक्षेला उपलब्ध असतो आणि हा पर्याय लेखनपूर्व समीक्षेला उपलब्ध असूनही पुरेसा वाटत नाही. निखळ साहित्यिक मूल्यांनी समीक्षाव्यवहार करता येतोच; पण अंकुरणाऱ्या वा गर्भित असणाऱ्या समाजातील सर्जनशीलतेच्या मूळ मूल्याची सर्वांगीण जोपासना निखळ साहित्यिक मूल्यांना व मूल्यांनी करता येत नाही. आधुनिक दलित साहित्याच्या रूपाने फुलणाऱ्या समाजातील सर्जनशीलतेच्या मूल्याला मी अधिक महत्त्व देतो व देतही आलेलो आहे. ही सर्जनशीलता ही अवघ्या समाजाची संपदा आहे, ती 'वेल्थ ऑफ नेशन' आहे. प्रत्यक्ष सर्जनाशिवाय सर्जनशीलता आहे हे कसे मानायचे, या प्रश्नाचे उत्तर समाजातील प्रमाणसाहित्याच्या धारेबरोबर प्राचीन काळापासून समांतरपणे वाहत आलेल्या लोकसाहित्याने पूर्वीच देऊन टाकले आहे. अंकुरणाऱ्या वाफ्यांची निगा राखणे, निगराणी करणे, पाटाचे वा पावसाचे पाणी त्या वाफ्यांपर्यंत कसे पोहोचेल याची दक्षता घेणे, वेळप्रसंगी आपली तहान बाजूला सारून आपल्या तोंडचा प्याला त्यांच्या ओठी लावणे, आणि काहीच साधले नाही तर आपले दोन अश्रू तरी त्यांच्यासाठी ढाळणे, या गोष्टीही मला समीक्षेचीच कर्तव्ये वाटतात. मग कुणी ही साहित्याची समीक्षाच नाही असे म्हटले तरी मला चालेल किंवा ही संस्कृतीची समीक्षा आहे असे म्हणून हिणवले तरीही चालेल.

### शतकांच्या संधिकालाचे अंतःसत्त्व

आपली अखेरची चार पावले टाकून निघून जाणाऱ्या या विसाव्या शतकाने मनुष्याची, मनुष्यसंस्कृतीच्या प्रदीर्घ इतिहासात

कुण्या कालखंडाने केली नव्हती एवढी, प्रचंड नागवणूक केली आहे. माणसाला सर्वकप गरिबीच्या चरमसीमेवर या शतकाने नेऊन ठेवले आहे. मनुष्यसंस्कृती इतकी दरिद्री आणि इतकी कंगाल करून या शतकाने गरिबी-श्रीमंतीचे रंगरूपच कमालीचे अनोळखी करून टाकले आहे. मी व्यक्तिशः निराशावादी नाही. प्रलयाचा प्रेषित व्हावे असे मला व माझ्यासारख्या शेकडो माणसांना आजही वाटणार नाही, हे खरेच आहे. परंतु आशावादाला, उद्याच्या स्वप्नाला, उद्याच्या सूर्य-चंद्रयुगाला उभे राहण्यास एक तसूभर जागाही या शतकाने शिल्लक ठेवलेली नाही. आपला आशावाद असा अस्थित असूनही तो आहे एवढाच दिलासा आहे. मी साहित्यप्रेमी आहे, साहित्यधर्मी आहे. आणि साहित्य ही माणसाची प्रतिसृष्टी आहे; तसेच भाषा हे त्या प्रतिसृष्टीचे साधन व सामग्री आहे; आणि ही प्रतिसृष्टी व तिची साधनसामग्री अनेक प्रलयांना आजवर यशस्वीपणे तोंड देऊन टिकून आहे; ही प्रतिसृष्टी तिच्या साध्यसाधनांसकट चिरंतन आहे, हे सर्व आपण सगळेजण जाणतोच. या प्रकारच्या आपल्या साहित्यप्रेमाला, साहित्यश्रद्धेला विलक्षण चक्रावून टाकणारे एक 'अंतःसात्त्विक पर्यावरण' (इथॉस) या विसाव्या शतकाने जाता-जाता निर्माण केले आहे.

विद्यमान भौतिक व सांस्कृतिक पर्यावरणात जीवनाच्या ऐलतटावर व पैलतटावर हिरवळी नाहीत. एका काठावर चंद्र-सूर्याचे उदयसोहळे साजरे होत आहेत; तर दुसऱ्या काठावर काळोखाचे हुंदके उमटत आहेत. विज्ञान व तंत्रविद्या यांच्या, परमेश्वरी लीलेपेक्षाही अधिक अद्भुतरम्य वाटणाऱ्या सुखदायक चमत्कारांची एक सुंदर सृष्टी एका तीरावर वसत आहे; तर दुसरा तीर या विज्ञानरम्य विश्वाला क्षणभरातच होत्याचे नव्हते करण्यासाठी सुसज्ज होत आहे. एका काठावर खंगून-खंगून चिपाड झालेली वसुंधरा कण्हत बसली आहे; तर दुसऱ्या तटावर अनंत अवकाशातील दुसऱ्या वसुंधरांचा शोध जारी आहे. एका बाजूला धर्मकल्पनांचे अंत्यविधी चालू आहेत; तर दुसऱ्या बाजूला त्यांच्यावर राज्याभिषेक केले जात आहेत. देशोदेशींचे शहाणे लोक एका काठावर वैश्विक मानवतेची एक भव्य गाथा रचत आहेत; तर दुसऱ्या तटावर छोट्या-छोट्या अस्मितांचे पवाडे गायिले जात आहेत. जगण्याचा मूलभूत हक्क बजावण्यासाठी एका तीरावर माणसे परस्परांना हात व हाक देत आहेत; तर दुसऱ्या तटावर मारण्याच्या हक्काला मूलभूत करण्यासाठी निर्घृण हत्याचक्र गरगरत आहे.

विद्यमान पर्यावरणाचे हे ब्रह्मांड प्रत्येक माणसाच्या, व्यक्तीच्या व समाजाच्या पिंडातही जसेच्या तसे अस्तित्वात आहे. या पर्यावरणातील पिंडोपिंडी तेच ब्रह्मांड आहे, थेंबाथेंबांत तेच तळे आहे, जिवाजिवांत त्याच प्रकारचे शिवत्व आहे. मॅक्रोकॉझम व मायक्रोकॉझम इतके हुबेहूब सारखे आहेत. आपले व्यक्तिजीवन, कुटुंबजीवन, सामाजिक व सांस्कृतिक जीवन दोन परस्परविरोधी ऐलपैल तटांच्या मधूनच वाहत आहे. कोणत्याही संवेदनशील मनाचा निळासावळा झरा या काठांच्या कात्रीतून बाहेर पडणे केवळ कठीण आहे.

वैज्ञानिक तंत्रविद्येने या विशाल भूगोलाचे एका पंचक्रोशीत रूपांतर केले आहे. जग हे एक खेडे ठरले आहे. या भौगोलिक संकोचामुळे एका बाजूला विश्वमानव, विश्वसमाज अशा कल्पना मूळ धरत आहेत; आंतरसांस्कृतिकता, सांस्कृतिक सापेक्षतावाद यांचा जप चालू आहे; आणि तरीही माणसामाणसांतल्या लढाया जारी आहेत. संरक्षणखर्च हा प्रत्येक देशाच्या अर्थसंकल्पाचा सिंहाचा वाटा बळकावून आहे. देश, धर्म, समाज यांच्या तथाकथित प्रेमाला व निष्ठांना भ्रष्टाचाराने काळे फासले आहे.

या प्रकारच्या पर्यावरणात सर्जनशील आत्मभानाला दाट धुक्यातूनच आविष्काराच्या वाटा धुंडाळाव्या लागत आहेत. संगती व विसंगती, वास्तव व काल्पनिक, सत्यता आणि सत्याभास, निकटचे व दूरचे, आतले व बाहेरचे, तळाचे व पृष्ठभागाचे, सरळ आणि वाकडे, दिसणारे आणि असणारे, भावणारे व भिवविणारे, देशीय आणि विदेशीय, स्त्रीत्व व पुरुषत्व, प्रगती व परागती, क्षणिक व चिरंतन यांसारख्या, काळ्या व पांढऱ्या या रंगांइतक्या, आजवर स्पष्ट दिसणाऱ्या परस्परविरोधी कल्पना आणि संकल्पना आज जवळजवळ अस्पष्ट व अनोळखी झालेल्या आहेत. धर्म ही खरोखरच अफू होती की काय; इहवादी प्रणाल्या खरोखरच तारणहार होत्या काय; समता, स्वातंत्र्य, बंधुता, न्याय या मूल्यांना खरोखरच व्यवहार्यता लाभेल काय; मानवता हे कोणत्या चीजेचे नाव आहे; कालपरवाचे उद्धारक व सुधारक आज-उद्याच्या माझ्या व समाजाच्या जगण्याला कितपत हातभार लावू शकतील; दलितता एका दाराने बाहेर पडत आहे की दुसऱ्या दाराने परत आत येत आहे; चातुर्वर्ण्य खरोखरच संपला की नव्या अवतारात परत सुरू झाला; आपल्या परंपरेच्या गुंत्यातून हव्या त्या पदराची निवड कशी करावयाची व तो पदर धरताना लगडून येणारी गुंतवळ कशी टाळावयाची; या यंत्रतंत्रप्रधान धकाधकीच्या व गळेकापू स्पर्धेच्या वातावरणात मी माझ्या जिण्याचा अन्वय इतरांशी व इतर मूल्यांशी कसा व कितपत लावायचा, यांसारख्या शेकडो प्रश्नांनी आजची संवेदनशील मने विभ्रान्त झालेली आहेत. समाज व साहित्य आपली मातृभाषाच हरवून बसले आहेत.

या प्रश्नप्रलयात जातिवंत सर्जनशील मने वाहून जाणार नाहीत यावर माझी अटळ श्रद्धा आहे. या श्रद्धेला मनुष्यसंस्कृतीच्या इतिहासाचे व शुद्ध साहित्यधर्माच्या चिरंतन परंपरेचे समर्थन आहे. प्रश्नप्रलयांची आव्हाने साहित्याने स्वीकारली आहेत व पेलूनही दाखविली आहेत. ज्ञानदेवांपासून नामदेव ढसाळांपर्यंत चालत आलेली मराठी साहित्याची परंपरा प्राधान्याने नकाराची व विद्रोहाचीच आहे. प्रश्नांच्या प्रलयकाळातूनच ही परंपरा वाट काढत आलेली आहे.

**प्रभाव, प्रभावक, प्रभावित यांचा मागोवा**

या विद्यमान काळातील सामान्यपणे जाणवणारे तीव्र प्रभाव मनुष्यजीवनाच्या सुरक्षिततेचे आहेत, सदभिरुचीचे आहेत, सौहार्द व सामंजस्याचे आहेत; समता, स्वातंत्र्य, बंधुता, न्याय यांचे आहेत. एका सुसंस्कृत जीवनशैलीच्या संपादनाचे आहेत. हे प्रभाव आज-उद्याच्या लेखक-कवींना टाळता येणार नाहीत, टाळता येत नाहीत हे खरेच! खरे तर व्यक्तिपरत्वे, समूहपरत्वे, देशपरत्वे या प्रभावांची तीव्रता कमीअधिक असणे स्वाभाविक म्हणता येईल. राष्ट्रीय दृष्टीने आपण अमेरिकेपेक्षा अधिक असुरक्षित आहोत. आपल्या तळागाळातील बांधवांपेक्षा मध्यमवर्गीय व उच्चवर्गीय बांधवांना वाटणारी असुरक्षितता अधिक मोठी व तीव्र असणार हे उघड आहे; कारण तळागाळातील लोकांना असुरक्षिततेची सवय आपल्या परंपरेने फार पूर्वीपासूनच लावलेली आहे. नगरच्या मराठी साहित्यसंमेलनाचे निर्वाचित अध्यक्ष व थोर कादंबरीकार ना.सं. इनामदार हे त्यांच्या चांगल्या वस्तीतील घरात मध्यरात्री चोर आले म्हणून विलक्षण अस्वस्थ झाले. या आपल्या समाजात माणूस किती असुरक्षित झाला आहे या अनुभवाने असुरक्षेचे एक तत्त्वज्ञानच त्यांच्या मनात वादळासारखे घोंगावू लागले. आपल्या समाजात शेकडो वर्षे दलित-पीडित बांधव उघड्या असुरक्षिततेत जगत आले. त्यांचे तत्त्वज्ञान मांडायला आपल्या समाजाला फुले-आंबेडकरांची वाट बघावी लागली. वैज्ञानिक-यांत्रिक-तांत्रिक युगाचा प्रभावही व्यक्ती-वर्ग-परत्वे याच प्रकारे कमीअधिक स्वागतार्ह वा निषेधार्ह ठरतो. सामान्य कष्टकरी माणसाला दूरदर्शनची एकमेव करमणूक उपलब्ध म्हणून तो त्याचे स्वागत करणार; तर वरिष्ठवर्गीय व्यक्तीला ती तितकी आवश्यक वाटणार नाही. परिवर्तनाची आच नाहीरे वर्गाला अधिक असणार, आहेरे वर्गाला तेवढी तीव्र नसणार! भ्रमनिरास, वैफल्य, निरर्थकता यांच्या जाणिवा चांगल्यातून वाईटाकडे आलेल्यांना जशा जाणवतील, तशा त्या वाईटातून चांगल्याकडे जाऊ पाहणाऱ्यांना जाणवणार नाहीत. विद्यमान काळातील प्रश्नांचे स्थूल स्वरूप सारखे असले तरी त्यांच्या प्रभावांचा स्वीकार व अर्थ व्यक्तिपरत्वे व वर्गपरत्वे वेगवेगळा ठरणार हे उघडच आहे.

आज-उद्याच्या दलित व दलितेतर लेखक-कवींच्या दृष्टीने या प्रश्नांकित पर्यावरणाचा विचार महत्त्वाचा ठरतो. निर्घृण हिंसाचार, धार्मिक दंभ व सत्तापिपासा, सर्वंकष भ्रष्टाचार, निसर्गसंपत्तीचा कमालीचा ऱ्हास, स्त्रीवादाच्या नव्या जाणिवा, वसाहतवादी प्रभावांचा रेंगाळता ठसा, व्यक्तिजीवनाचे व सांस्कृतिक जीवनाचे वाढते राजकीयीकरण, अस्मितांची उतरंड, आदर्शांचे अवमूल्यन, माणुसकीचा वाढता दुष्काळ, जगण्याची पदोपदी निखारे असलेली पायवाट या सर्वांच्या प्रभावाखाली आजउद्याची सर्जनशील मने आविष्काराच्या वाटा चोखाळणार आहेत. त्यांना या वाटा त्यांच्या व्यक्तिगत आकलनानुसार चोखाळण्याचे स्वातंत्र्य असले पाहिजे. देशात एक प्रमाणभूत राजकीय संविधान असते; तरी त्यातही वेळोवेळी सुधारणा वा दुरुस्त्या करणे भाग असते. संविधान इतिहासप्रेरित असते. समाजाच्या ऐतिहासिक दृष्टीने इष्ट ठरणाऱ्या मूल्यांची तरतूद त्यात करावी लागते. इतिहास वा ऐतिहासिकता बदलत जाते व त्या बदलांशी संगती राखणे आवश्यक ठरते. साहित्यक्षेत्रात प्रत्येक नवी पिढी स्वतःचे एक स्वतंत्र साहित्यसंविधान सिद्ध करू पाहते. ऐतिहासिकतेच्या प्रेरणा सामाजिक परिवर्तनाच्या गरजेइतकीच साहित्यिक परिवर्तनाची गरज निर्माण करीत असतात.

एकोणीसशे साठीच्या दशकात दलित समाज व दलित साहित्य-साहित्यिक ज्या ऐतिहासिक पर्यावरणात होते ते पर्यावरण आता बदलते आहे. संवेद्य, संवेदन व संवेदक या त्रिपिटकात फरक होऊ लागलेला आहे. या बदलत्या पर्यावरणाला सामोरे जाण्याखेरीज आज-उद्याच्या दलित व दलितेतरही प्रतिभावंतांना अन्य पर्याय नाही. हे बदल सर्वच प्रकारचे आहेत. ते राजकीय, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक, सामाजिक या सगळ्याच क्षेत्रांतील आहेत. या बाह्य भौतिक क्षेत्रांबरोबरच भावनिक, वैचारिक घटकही त्या परिवर्तनात समाविष्ट आहेत. हा सुमारे तीन पिढ्यांचा कालखंड आहे आणि अत्यंत गतिमान असणाऱ्या विद्यमान काळात हा कालखंड व्यापक व खोल प्रभावांचा असणे हेही अपरिहार्य आहे. दलित साहित्याच्या या पुरोभूमीवर उभे असताना तिच्या पार्श्वभूमीचा काहीएक विचार मनात येणे अगदी स्वाभाविक ठरते.

**पुरोभूमीचा पूर्वकालीन वारसा**

या पार्श्वभूमीने म. फुले-आंबेडकरांचा वारसा दलित साहित्याला दिलेला आहे. परंपरागत मानसिकता बदलण्याचा व ती मानसिकता

अनुक्रमणिका






स्वातंत्र्य, समता, बंधुता व न्याय या मूल्यांशी सन्मुख व समरस करण्याचा तो वारसा आहे. परंपरागत मानसिकता बदलण्याच्या कार्यात चिवट श्रद्धेची गरज असते. यशापयशाची आभाळे जात-येत असतात व त्यासाठी कणखर मनोधैर्य असावे लागते. असे मनोधैर्य धम्माच्या श्रद्धेवर अधिष्ठित करावे, असा डॉ. आंबेडकरांचा वारसा आहे. या वारशात विभूतिपूजेला अवसर नाही; पोथीनिष्ठेपेक्षा व्यक्तीच्या प्रतिष्ठेला व बुद्धिवादाला त्यात स्थान आहे. हा वारसा जातिभेद व त्यावर आधारित उच्चनीचता यांच्या निर्मूलनाचा वसा आहे. मूलतः तो भारत व भारतीयता या व्यापक कल्पनांना जतन करणारा, संपन्न करणारा विजिगीषू देशीयवादाचा वारसा आहे. म्हणूनच वारकरी संप्रदायाप्रमाणे तो अवघ्या समाजासाठी व समाजाचा वारसा आहे. हा वारसा म्हणजे एक मुक्तद्वार आहे. मठामठांची उभारणी करून महंतपदे निर्माण करणाऱ्या महत्त्वाकांक्षी चार माणसांसाठी दिलेला हा वारसा नाही. दीनदलित, अनाथ-अपंग, बायाबापड्या, आदिवासी अशा सगळ्या सामान्य जनांचा व जनांसाठी असलेला हा वारसा आहे. दलितांनी दलितत्वातून बाहेर पडावे व बाहेर पडून झाल्यानंतर इतर बांधवांना त्यातून बाहेर पडण्यास हात द्यावा, असे सांगणारा हा वारसा आहे. ज्ञानाचा व्यासंग करावा, पुस्तके वाचावीत, लिहावीत, ज्ञानाची शक्ती संपादन करावी व तिचा लाभ सामान्य बांधवांना द्यावा अशी आकांक्षा बाळगणारा हा वारसा आहे. दलितेतरांना या वारशाचे मूल्य कमीअधिक उमगले व त्यासाठी कमीअधिक काळ लागला तरी, त्यांच्यावर या वारशाची धुरा वाहण्याची जबाबदारी सोपवून दलितांना स्वस्थ बसता येणार नाही. हा वारसा केवळ दलितांचा व दलितांसाठी नाही, तर तो सगळ्या समाजासाठी व देशासाठी आहे हे पटवून देण्याची जबाबदारीही वारसदारांवर आहे. हे कार्य राजकीय कार्यकर्त्यांवर वा नेत्यांवर सोपवून चालणार नाही. ते या वारशाचे राजकारणच करतील, राजकारणाचे वारशीकरण करणार नाहीत. साहित्यिकांना या दृष्टीने हे काम अधिक भावस्पर्शीपणे व म्हणून अधिक प्रभावीपणाने करता येईल. साहित्यिक ही समाजातील अजूनही विश्वसनीय राहिलेली प्रभावी भूमिका आहे; राजकारणी भूमिका आजतरी शंकास्पद झालेली आहे. दलित साहित्य हे जास्तीत जास्त राजकीयीकरणापासून अलग राखले, तर साहित्य म्हणून व समाजपरिवर्तनाचे एक संथ पण खात्रीचे साधन म्हणून ते अधिक कामयाब ठरेल. आंबेडकरी वारशातच धम्मदर्शनाच्या भावजाणिवा व मिथके यांच्या नव्या अर्थपूर्ण आविष्कारांना स्थान आहे. धम्मदर्शनातील इहवादाची बैठक साहित्यनिर्मितीच्या दृष्टीने परिपोषक ठरणारी आहे.

अशी ही पार्श्वभूमी आज-उद्याच्या दलित लेखकांच्या पुरोभूमीसमोर आहे व ती तशी राखणे प्रेरक ठरणारेही आहे.

ही पार्श्वभूमी आणि पुरोभूमी यांच्या दरम्यान आणखी एक संदर्भ आहे. हा संदर्भ पृथकत्वाची नैसर्गिक जाणीव व मनुष्यजीवनाची जगण्याची गरज यांच्या परस्परसंबंधांचा आहे.

### पृथकतेची प्रकृती व संस्कृती

पृथकपणाची जाणीव असणे व सांभाळणे ही प्रत्येक व्यक्तीची, समूह-समाजाचीही स्वाभाविक गरज आहे, हे आपण जाणतोच. स्वत्व, अस्मिता, नामरूपादी वैशिष्ट्यांचे वेगळेपण या गोष्टी मनुष्यासह सर्वच सजीवांच्या बाबतीत समानच असतात. संवेदनशील व्यक्तीच्या व समूहसमाजाच्या बाबतीत तर या स्वत्वरूप जाणिवा तीव्रोत्कट असतात व व्यापकही असतात. म्हणूनच पृथकत्वाच्या जाणिवेचे स्तरीकरण होत गेल्याचे दिसून येते. मनुष्यजीवनातील विविधता व विषमता या गोष्टी पृथकत्वाच्या स्तरीकरणाच्याच निदर्शक आहेत. मात्र समाजात जगणे, देशात जगणे, जगात जगणे अशी जगण्याच्या सर्वच पातळ्यांवरील प्रक्रिया ही पृथकता व एकता यांच्या द्वंद्वात्मक संबंधावरच अवलंबून असते. मी वेगळाही आहे आणि वेगळा नाहीही अशी दुहेरी जाणीव बाळगूनच कोणत्याही पातळीवर जगणे शक्य असते. साहित्यधर्म या आवश्यक अशा द्वंद्वात्मक जाणिवेचा विकास व विस्तार घडवून आणतो, किंबहुना त्यातील संवाद साधण्याचा प्रयत्न करतो, असे म्हणणे अधिक सयुक्तिक ठरेल. साहित्य कधी-कधी स्वत्वाचा, अस्मितेचा, वेगळेपणाचा चढा सूर लावते, तर कधी-कधी एकतेचा जप सुरू करते. पर्यावरणाच्या प्रभावातून जगण्याचा ढळलेला तोल-समतोल राखण्याचा; सलगता व अलगता, निराळेपणा व सारखेपणा यांच्यात पासंग साधण्याचा ते प्रयत्न करते. पृथकपणाच्या जाणिवा जशा अटळ आहेत, तशा त्या परिवर्तनशीलही आहेत. पृथकपणाची जाणीव स्वयंभू मूल्य नाही आणि एकतेची जाणीव हीदेखील स्वयंभू मूल्य नाही. या दोहोंना सांस्कृतिक मूल्य देणारी बाब म्हणजे त्यातील समतोलपणा! दलित साहित्यिकांनीच केवळ नव्हे, तर आज-उद्याच्या सर्वच लेखक-कवींनी या गोष्टीचे भान आपापल्या ऐतिहासिक व पर्यावरणीय संदर्भात जागृत ठेवले पाहिजे. पृथकता व वेगळेपणा हा समर्थनाचा विषय नाही, तर तो एकतेच्या व सलगतेच्या दृष्टीने संपन्न करण्याचा विषय आहे. कारण पृथकता स्वयंसमर्थितच असते पण संपन्नता संपादावी लागते.

अनुक्रमणिका

**नित्य आणि नैमित्तिक साहित्यधर्म**

आज-उद्याच्या लेखक-कवींची, विशेषतः दलित लेखक-कवींची, पर्यावरणीय पुरोभूमी व पार्श्वभूमी यांच्या संदर्भात आणखी एक गोष्ट उल्लेखनीय आहे. ती गोष्ट म्हणजे साहित्याचा नित्य धर्म व साहित्याचा नैमित्तिक धर्म यांमधील फरकांसंबंधी आहे. लेखक, कवी, कादंबरीकार, नाटककार, समीक्षक यांसारख्या साहित्यिक भूमिकांना अजूनही आपल्या समाजात एक विशेष प्रकारची प्रतिष्ठा आहे. समाजातील यांसारख्या इतर अनेक भूमिका याही प्रतिष्ठित असल्या, तरी त्यांपैकी अनेक भूमिकांसंबंधी समाजमनात विकल्प व संशय निर्माण झालेला दिसतो. तशी स्थिती सुदैवाने लेखक-कवींसंबंधी नाही. त्यामुळे कवि-लेखक म्हणून आपणाकडे लोकांनी कौतुकाने पाहावे असे वाटणे स्वाभाविक आहे. कवि-लेखक असण्यात फारसे व्यावहारिक, आर्थिक हितसंबंध गुंतलेले नसतात व म्हणूनच साहित्यक्षेत्र हे अजून भ्रष्टाचाराचे विहारस्थळ बनलेले नाही. तथापि निव्वळ प्रतिष्ठाप्राप्तीच्या प्रेरणेतून साहित्यनिर्मिती होत नाही, टिकून राहत नाही व तिचे प्रयोजनही साध्य होत नाही, हे लक्षात घेणे आवश्यक आहे.

अशा निर्मितीबरोबरच एक प्रकारच्या व्यक्तिगत किंवा सामाजिक प्रभावी प्रेरणेतूनही नैमित्तिक साहित्य निर्माण होते. दलित साहित्यात गेल्या तीसपस्तीस वर्षांत या प्रकारचे लेखन बरेच झाले आहे. एकेक काव्यसंग्रह, एखादेच आत्मकथन, एखादाच कथांचा वा लेखांचा संग्रह निर्माण करून हे लेखक थांबल्याचे दिसते. या प्रकारच्या नैमित्तिक लेखनाचे मोल मला महत्त्वाचे वाटते. साहित्याची या प्रकारची नैमित्तिकता ही मला दलित साहित्यप्रवाहाचे एक अर्थपूर्ण वैशिष्ट्य वाटते. कारण त्यामागील व्यक्तिमनाची तळमळ व सामाजिक जाणिवेचे भान महत्त्वाचे आहे. एखाद्या कंजारभाट वर्गातील युवकाने एकच एक आत्मकथन लिहून थांबणे यातील लिहिणे हे मला त्याच्या थांबण्यापेक्षा अधिक मोलाचे वाटते.

साहित्याचा धर्म नित्य व नैमित्तिक या दोन्ही स्वरूपांतून व्यक्त होऊ शकतो. नित्य साहित्यधर्म ही एक जीवनाची समग्र गोवणूक व भूमिका आहे. ती सर्वांनाच साधेल व साधावी असा दंडक कोणी व का घालावयाचा? म्हणून यापुढेही नैमित्तिक लेखन व्हावे व नित्य साहित्यधर्माचीही उपासना व्हावी! पुस्तकांच्या संख्येला मूल्य नाही, त्यांतील मौलिकतेला महत्त्व आहे. नित्य साहित्यधर्म दलितांच्या बाबतीत थोडा सबुरीनेच येईल, हे दलितांची संस्कृतिवंचित पूर्वपरंपरा जाणणाऱ्या लोकांना वेगळे सांगण्याची गरज नाही. कधीतरी एकदाच उमलणारे ब्रह्मकमळ हेही एक फूलच आहे हे का सांगायला हवे?

**क्षणिकतेचे अध्यात्म**

ऐलपैल काठांवरील दोन जगे क्षणाक्षणाला होणाऱ्या त्यांच्या ओळखखुणा पुसून टाकत आहेत; क्षणापूर्वीचे वास्तव बघता बघता एखाद्या मायावी मारिचाप्रमाणे आपले रंगरूप बदलत आहे; या पालटत्या क्षणांच्या सत्यता कुठल्या जाणिवांनी, कुठल्या अर्थांनी समजावून घ्याव्यात हेच कळेनासे होत आहे, अशा विभ्रमधारेत आज-उद्याची संवेदनशीलता सापडलेली आहे. क्षणिकतेच्या या मायेत माणसाच्या संचिताची, परंपरेची, इतिहासाची, सामाजिकतेची नाती खिळखिळी होऊ लागली आहेत. क्षणिकतेचे पूर्वोत्तरकालीन अर्थपूर्ण अन्वय व अर्थ निखळून पडत आहेत. या अवस्थेत 'पकडा क्षणाला' - कॅच द मोमेंट - हे कुणी कुणाला सांगण्याची गरजच नाही. कारण क्षणच प्रत्येकाला पकडत आहे. क्षणिकतेच्या या प्रभावकाळात क्षणमात्रतेचे एक तत्त्वज्ञानच आविर्भूत होत चालले आहे. या कालोचित प्रभावाला सर्जनशील मनांना टाळता येणार नाही, हे त्यांनी व आपणही समजून घेतले पाहिजे. आणि उभयतांनी आणखी एक गोष्ट समजावून घेतली पाहिजे : क्षणिकतेच्या निषेधातून नव्हे, नकारातून नव्हे तर तिच्या स्वीकारातून, तिच्याशी समरसून, तिला जिंकून व आत्मसात करूनच जे क्षणिक नाही, जे पळभराचे नाही, जे थेंबासारखे नाही, जे टिंबासारखे नाही, त्या सातत्याचे, त्या चिरकालीनाचे, त्या चिरंतनाचे दर्शन आपणास घडणार आहे. क्षणिकतेची सर्जनशील संवेदनशीलता स्वीकारणे, बागवणे व सहन करणे हा काळाचा कानून आहे व तो साहित्य व समाज यांच्या कायदेकानूंपेक्षा अधिक प्रभावी आहे.

**पर्यावरणीय प्रबोधनाचे भान**

निसर्गाच्या सजीवतेचे, जैविकतेचे, त्याच्या मनुष्यसंस्कृतीशी जडलेल्या अतूट नात्याचे, त्या नात्याच्या महानतेचे संवेदन जागवणे हेही आज-उद्याच्या संवेदनशील कवि-लेखकांचे एक कालोचित कर्तव्य ठरेल. प्राणिसृष्टी, पादपसृष्टी, डोंगरनद्यांची, सागर-सरोवरांची भौतिक सृष्टी आपण साम्राज्यवादी धोरणाने आजपर्यंत पुरती नागविली आहे. माणसाची मूलभूत प्रवृत्तीच बहुधा वसाहतवादी असावी, हे निसर्गाची आपण केलेली अतोनात पिळवणूक स्पष्ट करते. आमच्या परंपरेने वटपूजा गौरविली, अश्वत्थाला तत्त्वज्ञानाचे मखर सजवले, गायबैलाची पुरणपोळीने पूजा केली, पण आमच्या भावजीवनाचा ते क्वचितच विषय झाले. आपले सुखदुःख, आपले हर्षामर्ष, आपले विचार, आपली तत्त्वे यांना सजविण्यासाठी आपण निसर्गरूपे वापरली. आपले विसावे व दिलासे, आपली स्वप्ने व स्वप्नभंग निसर्गरूपांच्या हुकमी उपयोगाने सचित्र केले.

वैलासारख्या जिवाभावाच्या सोबत्याला कथानकाचा नायक होण्यासाठी आपणांस १९९५ पर्यंत वाट पाहावी लागली. घेणाऱ्याने घेत घेत एक दिवस देणाऱ्याचे हातही घेऊन टाकावेत, तशी अवस्था आपण दानशूर निसर्गाची केली. आपण निसर्गाच्या शरीरावर प्रेम केले, आत्म्यावर नाही. समाज व संस्कृती यांच्यापेक्षाही अधिक मूलभूत असे नाते मनुष्याचे निसर्गाशी आहे. साहित्याने या मूलभूत नात्याचा परोपरीने शोध घेतला, त्याचा आविष्कार केला तर भौतिक व जैविक विज्ञानांचे आंधळे डोळेही स्वच्छपणे उघडले जातील. या डोळ्यांनी निसर्गाची शरीररूपे व त्यांची यंत्रणा पाहिली, पण त्याची जैविकता व माणसाशी जुळलेले त्याचे जैविक नाते ओळखलेच नाही.

निसर्ग ही विद्यमान काळातील सर्वांत मोठी व सर्वांत पुराणी दलितता आहे. गरीबच गरिबाचा वाली असतो, हा मनुष्यसंस्कृतीचा निष्कर्ष खरा असेल, तर दलित निसर्गाचे दलित प्रतिभेशी सहजपणे नाते जुळून जाईल, हे स्पष्टच आहे.

### हास्याचा शोध

हास्याचा शोध हा उपेक्षित अंतरंगाचाच शोध आहे, हे माटेमास्तरांनी एकदा दाखवून दिले आहेच. मनुष्यत्वाचे एक व्यवच्छेदक लक्षण त्याच्या हसण्यात, त्याच्या हास्यप्रवृत्तीत दडलेले आहे, हे आपण जाणतोच. वेदना, विद्रोह, नकार, परिवर्तन, क्रांती या सर्वांशी हास्याचे नाते आहे. त्यांच्यात आपण समजतो तेवढा विरोध नाही. वेदनाही हसू शकते, विद्रोहालाही एखादी स्मितरेषा असते, अश्रूही हसण्याचे विदारक चमत्कार करू शकतात, दलितत्वाला हसते-हसविते ओठही असतात. सर्जनशील संवेदनशीलतेला तर जे जिथे असू शकत नाही असे आपणांस वाटत असते ते तिथे असल्याची व पाहण्याची नजर असते. प्रक्षुब्ध तांडवनृत्यातही स्मित करणारे काही पदन्यास ती संवेदनशीलता पाहू शकते. घोंगावणाऱ्या उद्दाम वादळवाऱ्यातूनही मंद हास्याचे बासरीनाद त्याला ऐकू येतात. दुःखाने गदगदलेल्या झाडालाही मंदस्मिताची करुण सळसळ आवरता येत नाही, हे सर्व ती संवेदनशीलता जाणते. आज-उद्याच्या लेखक-कवींनी ही बाब लक्षात घेण्यासारखी आहे. इथे हास्यविनोदाचे तात्त्विक प्रवचन मला करावयाचे आहे. दलित साहित्याच्या क्षेत्रात एका नव्या 'पुलकित' पर्वाचे उद्घाटन करण्यासाठीही मी हे सांगत नाही. मनुष्याला स्वतःकडे पाहून, स्वतःच्या परंपरेकडे पाहून रडावेसे वाटावे, चिडून-संतापून जावेसे वाटावे, सगळे उधळून टाकावेसे वाटावे हे अत्यंत स्वाभाविकच आहे; पण त्याबरोबरच माणसाला स्वतःकडे पाहून, स्वकीयांकडे पाहून, स्वतःच्या परंपरेकडे पाहून हसावेसे वाटणे, हेही तेवढेच स्वाभाविक आहे. स्वतःला हसता आले तर इतरांनाही हसविता येते. हास्याचा उगम स्वतःच्या हास्यास्पदतेतूनच होतो. हा स्व व त्याचे स्वतःचे म्हणून असलेले सर्वकाही सर्जनशील मने जितक्या व्यापक दृष्टीने पाहतील, त्यात वर्गजातींच्या पैल जाणाऱ्या अवघ्या लोकजीवनाचा समावेश करतील, हा सगळा मनुष्यसमाज अखेर आपल्याच माणसांचा व म्हणून आपलाच आहे असे समजतील, तेव्हा स्वतःकडे पाहून हसण्याच्या व हसविण्याच्या शेकडो दिशा आपल्या लेखक-कवींना दिसू लागतील. दलित लेखकांना अस्मितेचे केंद्र अबाधित राखूनही आपल्या आविष्कारांचा परिघ व्यापक करण्याची एक वाट हास्याचे उपेक्षित अंतरंग दाखवू शकेल आणि आविष्कारांचे परिघ वाढवणे हेच तर साहित्यधर्माचे काम आहे. विशेषतः सगळ्याच मराठी व म्हणून दलित साहित्यिकांपुढेही काळानेच अशा कार्याची निकड निर्माण केलेली आहे. आविष्कारांच्या परिघाचा विस्तार होण्याची हीदेखील एक मोठी शक्यता आहे.

### सर्जनशीलतेची संवादी व विद्रोही रूपे

वेगवेगळे साहित्यप्रकार प्रतिभावंतांच्या वेगवेगळ्या सर्जनशील आत्मभानांचे संगोपन व संवर्धन करतात हे आपणास ठाऊक आहे. अनुभवांचे मूल्यसंवेदन, त्यांचा मूल्यबोध म्हणजे जाणिवा. पिंजऱ्यातला पोपट व माणूस एकच अवस्था अनुभवतात, पण हे पारतंत्र्य आहे हा त्याचा अर्थ, त्याचे मूल्य माणूस जाणू शकतो. म्हणून तो मुक्तीचे कवनही करू शकतो. पोपट या प्रकारे कवन करतो की नाही हे कसे सांगणार? त्याचा पिंजऱ्याबाहेरचा बोल व पिंजऱ्यातील पोपटपंची यांत फरक असेलही; पण तो आपणास कळत नाही. साहित्यप्रकार हे अनुभवांच्या मूल्यांकनप्रक्रियेशी संवादी असणारे आविष्कार होत. म्हणून साहित्यप्रकारांत श्रेणी नसते. आत्मकथन हे कमी दर्जाचे व कादंबरी ही मोठी असे मानता येत नाही. अनुभवांच्या आशयसूत्रांचा मूल्यभाव ताकदीने व्यक्त करणे हे सर्व साहित्यप्रकारांचे उद्दिष्ट असते व ते श्रेणीकल्पनेशी निगडित नाही. कविता व्यक्तीच्या भावजीवनाचे भरण-पोषण करते, नाटक तिच्या नाट्यजीवनाचे संवर्धन करते, कथा तिच्या गोष्टीरूप जाणिवांचे लालनपालन करते, कादंबरी तिच्या व्यामिश्र जाणिवांचे घरकुल सांभाळत असते. एके काळी महाकाव्यांनी सर्जनशील आत्मभानांची ही सगळीच कामे एकट्याच्या ताकदीवर पार पाडली. साठोत्तरी कालखंडात झपाट्याने बहरून आलेल्या दलित आत्मकथनांकडे साकल्याने पाहिले की मला त्या प्राचीन महाकाव्यांचीच आठवण येते. या विपुल व विविध आत्मकथांचा एक संश्लिष्ट आकृतिबंध



अनुक्रमणिका

केला, तर तो आकृतिबंध आधुनिक गद्यातील महाकाव्यच ठरेल असे मला राहून राहून वाटते. या आत्मकथनांमागे एका जटिल अनुभवपटाचीच एक सूक्ष्म प्रेरणा आहे असे जाणवते. एखाद्या समर्थ प्रतिभावंताला सगळी दलित आत्मकथने वाचून-पचवून चिंतन-मननपूर्वक त्यांच्या समग्र जाणिवांचा साक्षात्कार झाला, व्हिजन प्राप्त झाली, तर तो जे निर्माण करील त्याचे स्वरूप एका महाकाव्यासारखे एका महाकादंबरीचे ठरेल.

सर्जनशील मनाच्या अनुभवसंपदेचे अर्थपूर्ण जाणिवांत रूपांतर करणाऱ्या वाहिन्या म्हणजे साहित्यप्रकार होत. भावप्रधान जाणिवा प्राधान्याने ज्या काव्यातून प्रकट होतात त्यातील व्यक्तिविशिष्टता स्वीकारणे, स्वागतार्ह मानणे व कोणत्याही व्यक्तिबाह्य निकषाने अशा आविष्कारांचा संकोच होईल, त्यावर दडपण येईल, त्यांना अपराध्यासारखे वाटेल असे काही करणे वा सुचविणे योग्य ठरणार नाही. कविता हे व्यक्तिधर्माचे सुंदर, समर्थ व स्वतंत्र असे पर्याप्त रूप आहे. व्यक्तीला व्यक्ती म्हणून स्वतंत्रतेची विनशर्त सनद देणारा तो एकमेव प्रकार आहे. कवितेत व्यक्ती ही जेवढी व्यक्ती म्हणून आत्मसापेक्ष, आत्मनिष्ठ व आत्मावलंबी राहू शकते तितकी व तशी ती कोणत्याच अन्य साहित्यप्रकारात राहू शकत नाही. मी अलीकडच्या गेल्या पंधरा-वीस वर्षांतील नव्या कवयित्रींच्या काव्याचा आस्वाद घेतला. या काव्यातून मला स्त्रीमुक्तीचा अपूर्व व थरारक साक्षात्कारच घडला. येथील प्रत्येक कवयित्री एक व्यक्ती म्हणून किती स्वतंत्र आहे, किती स्वतंत्रपणे ती स्वतःचे भावजीवन जगत आहे, सोसत आहे, संपन्न करू बघत आहे हे मला या नव्या मानुषी काव्यात प्रथमच दिसले. प्रत्यक्ष स्त्रीचे व्यक्तिजीवन मुक्त नसेलही व नाहीही, पण इथे काव्यात ती पूर्णपणे मुक्तच आहे. विद्यमान काळात व्यक्ती व व्यक्तिमत्त्व विघटित करणारे प्रभाव जबरदस्त आहेत. व्यक्तीची स्वतःशी गाठभेट होणेच कठीण झाले आहे. व्यक्ती स्वतःलाच अनोळखी होत चालली आहे. आज-उद्याच्या लेखक-कवींना हे व्यक्तिविघटनकारक प्रभाव टाळताही येणे शक्य नाही. अशा पर्यावरणात आज-उद्याच्या कवितेला व म्हणून कवींना त्यांचा व्यक्तिधर्म जोपासण्याची व त्यासाठी व्यक्तिबाह्य कायदेकानून न लादण्याची खबरदारी आपण सर्वांनीच घेतली पाहिजे.

कथा, नाटक, कादंबरी हे प्रकार व्यक्तिधर्माच्या विकास-विस्ताराच्या क्षेत्राशी निगडित आहेत. समाज, संस्कृती, व्यापक मनुष्यव्यवहार यांच्याशी या प्रकारांचे नाते आहे. विचारप्रणाल्या, धर्म, तत्त्वज्ञाने किंवा राजकीय, आर्थिक, सामाजिक ध्येयधोरणे यांचीही लेखकपरत्वे कमी-अधिक दखल या प्रकारांतून घेतली जाते. साहित्य व त्याचे साहित्यबाह्य सर्व संदर्भ यांच्यातील संगतीचे व संघर्षाचे द्वंद्वात्मक नाते सनातनच आहे. सर्जनशील संवेदनशीलता, तिचे स्वरूप, तिची प्रकृती व शक्ती यांबाबत गूढरम्यता बाळगावी व या गूढरम्यतेचा फायदा साहित्य व समाज यांच्या संघर्षात साहित्याला दिला जावा, असे निर्विवादपणे समजणे सर्वांनाच मान्य होणार नाही. प्रतिभाशक्तीची बरीच रहस्ये मनोविश्लेषणशास्त्राने व सामाजिक विज्ञानांनी उलगडण्याचा प्रयत्न केला आहे. तरीपण प्रतिभाधर्माचे महान आविष्कार पूर्णपणे गूढमुक्त झालेले नाहीत. ज्ञानेश्वरी, तुकोबांचे अभंग, महात्मा फुल्यांचे अखंड, मर्ढेकर आणि ढसाळांच्या कविता हे आविष्कार विशिष्ट समयी, विशिष्ट स्वरूपात व विशिष्ट सामाजिकतेत का निर्माण व्हावेत याचा पूर्णपणे छडा लावणे व लागणे अवघड ठरते. म्हणूनच केवळ नव्हे, तर विद्यमान पर्यावरणाचे सांस्कृतिक-सामाजिक संभ्रम, मूल्यविवेकाची परवड, अनेक विचारप्रणालीय किंवा तत्त्वज्ञानात्मक प्रयोगांचा व प्रमेयांचा या शतकाने घडवून आणलेला पराभव या सर्वच गोष्टी लक्षात घेता संघर्षशील अशा आज-उद्याच्या साहित्यनिर्मितीचा चौकटबद्ध स्वीकार करणे वा तिला नाकारणे न्याय्य ठरेलसे वाटत नाही. मनुष्याच्या भौतिक, भावनिक व आध्यात्मिक गरजांच्या परिपूर्तीसाठी काहीएका प्रकारची व्यवस्था व काहीएक प्रकारचे गरजाभिमुख अगक्रम ठरवणे व त्यांची अंमलबजावणी करणे आवश्यक असते. या व्यवस्थेत व प्रक्रियेत गुंतलेल्यांना इतिहासाच्या परिवर्तनशील प्रेरणांचे किंवा समाजाच्या अंगभूत गतिमानतेचे संवेदन सापेक्षतः कमी असते किंवा त्याकडे अवधान देण्याइतपत उसंत त्यांच्याकडे नसते. या व्यवस्थांपासून जरा सुरक्षित अंतरावर राहून त्या प्रकारचे संवेदन होण्यास व त्या संवेदनाचे स्वरूप न्याहाळण्यास लेखकांना अधिक अनुकूलता असू शकते. निदान काही लेखकांना हे साधून जाते व प्रश्न अशाच लेखकांचा आहे. व्यक्तिशः मला या प्रकारच्या वंडखोर लेखक-कवींचे स्वागत व्हावे असेच वाटते. एवढेच नव्हे तर आज-उद्याच्या प्रतिभावंतांनी ऐतिहासिकतेचे व व्यवस्था आणि संगतीचे अनुशासन अटळपणे स्वीकारण्याबरोबरच त्यांच्या पलीकडे पाहण्याचा व जाण्याचा प्रयत्न करावा, असेही मला वाटते. या जगात पाण्याइतके अंगभूत प्रवाहित्व फक्त साहित्यातच आहे आणि प्रवाहीपणा हेच मनुष्यजीवनाचे जिवंत लक्षण आहे.

### भारतीय परिप्रेक्ष्य

आज-उद्याच्या दलित लेखक-कवींना भारतीय परिप्रेक्ष्यात आत्मनिरीक्षण करण्यास व आपल्या सर्जनशीलतेला संपन्न करण्यास मदत करणारी एक नवी दिशा आता उजळत आहे. अनेक भारतीय भाषांतून दलित साहित्याची निर्मिती होत आहे. या










निर्मितीचे व निर्मात्यांचे अंतरंग जाणून घेणे मोठे उद्‌बोधक ठरेल. पण यासाठी या अन्यभाषिक साहित्याची भाषांतरे मराठीत उपलब्ध करून दिली पाहिजेत. तौलनिक साहित्याभ्यास ही नवी अभ्यासशाखा भारतीय विविधभाषी साहित्यांच्या आदान-प्रदान-प्रक्रियेवरच उभी आहे. या विविध साहित्यांमधील साधर्म्य व वैधर्म्य समजावून घेणे निर्विवादपणे आवश्यक आहे. यासाठी बहुभाषिक साहित्यसंमेलने व चर्चा यांची कास धरणे कालोचित ठरेल. पश्चिमी वाङ्‌मयीन संकल्पनांचा प्रभाव कमी करण्यासाठीही भारतीय साहित्य व देशीयता या संकल्पनांचा पाठपुरावा करणे आवश्यक आहे. भाषांतरे करणे, वाचणे या आवश्यक सवयी लावून घेणेही निकडीचे आहे. भाषांतर-साहित्याच्या आधारे नव्या कवि-लेखकांना तौलनिक परिप्रेक्ष्य उपलब्ध होईल व त्याचा त्यांच्या निर्मितीला फायदाही होईल. 'अस्मितादर्श' सारख्या मासिकातूनही चांगली भाषांतरे आवर्जून व नियमितपणे यावीत. जमेल त्यांनी बहुभाषक होणे ही तर काळाची गरजच आहे.

### साहित्याच्या प्रपंचाची उभारणी

गेल्या तीसपस्तीस वर्षांच्या काळात विविध प्रकारचे विपुल दलित साहित्य व समीक्षा निर्माण झाली. केवळ साहित्यविचार घेतला, तरी या प्रकारातील शंभरच्या वर पुस्तकांची नोंद मला करता आली. अर्थात ही संख्या प्रत्यक्षात खूपच अधिक असण्याची शक्यता आहे. तेव्हा प्रकाशित पुस्तके, महत्त्वाचे लेख, महत्त्वाची नियतकालिके यांचे विषयवार सूचिकार्य करण्याची जबाबदारी विशेषतः पदवीधर अभ्यासकांची व अध्यापकांची आहे. आपले सर्वच संशोधनसाहित्य, समीक्षा व इतर प्रकारचे अभ्यास हे पदवीप्राप्तीशी व वेतनश्रेणीशी निगडित झालेले दिसतात. त्यामुळे एक प्रकारची कृतक व्यासंगाची आणि झटपट विद्वत्तेची कळा त्यांना प्राप्त झालेली आहे. नेमकी काटेकोर साहित्यदृष्टी व समाजवैज्ञानिकदृष्टी यांचा प्रत्यय त्यांतून कमीच येतो. दलित साहित्याच्या सूचीचे कार्य तत्परतेने व कार्यक्षमतेने हाती घेण्याची नितान्त गरज आहे.

भाषावैज्ञानिक व शैलीवैज्ञानिक अभ्यासांनाही गेल्या तीसपस्तीस वर्षांच्या कालखंडातील दलित साहित्यात भरपूर वाव आहे. पण ही बाजू तर पूर्णपणे उपेक्षित राहिल्याचे दिसते.

दलित साहित्याचा प्रपंच हा माणसाच्या प्रपंचासारखा एक पूर्ण वेळेचा व पूर्ण गोवणूक करणारा अखंड धवडगा आहे. यासाठी श्रमविभागणी करणेही भाग आहे. दलित साहित्याला वाचकांइतकीच या प्रपंचाच्या विविध कार्यक्रमांची जबाबदारी घेणाऱ्या अनेक कुटुंबीयांची गरज आहे. साहित्यप्रेमी अशा सर्वांनीच या बाबतीत आपापल्या जबाबदारीचा वाटा उचलला पाहिजे.

### अनौपचारिक साहित्यचर्चा

मित्रहो, मला जे सांगावयाचे होते ते सर्व सांगून झाले. मी जे सांगितले ते, अनुभवांच्या किंवा वडीलकीच्या अधिकाराने जसे सांगितले नाही, तसेच ते सर्वज्ञ समीक्षकाच्या किंवा शिक्षकाच्या हक्कानेही सांगितले नाही. एक साहित्यप्रेमी व साहित्यधर्मी सामान्य माणूस म्हणून ही बातचीत तुम्हा सर्व जाणत्यांशी केली आहे. ही फार तर एक अनौपचारिक साहित्यचर्चा आहे. आणि औपचारिक समीक्षेपेक्षा अनौपचारिक साहित्यचर्चा मला अधिक महत्त्वाच्या वाटतात. निदान सध्याच्या सुभ्यासुभ्यांनी खंडित झालेल्या वाङ्‌मयीन क्षेत्रात सुभेदारी समीक्षेचे जाच कमी करण्यास अशा अनौपचारिक चर्चांची अधिक गरज आहे, असे मला वाटते. लेखक, कवी, समाजशास्त्रज्ञ, तत्त्वज्ञ, डॉक्टर, वकील, इंजिनिअर, संशोधक, नेते, विचारवंत, तरुण-तरुणी यांनी अनौपचारिकपणे एकत्र यावे, पुस्तकांसंबंधी बोलावे, लेखनाविषयी सांगावे, आपापल्या अनुभवांची व वाचनाची ओळखपाळख करून द्यावी, कधी कथा तर कधी कविता यांचे वाचन करावे, काव्यशास्त्रविनोदात रममाण व्हावे असे मला वाटते. साहित्य म्हणजे नुसते लेखनही नव्हे आणि नुसते वाचनही नव्हे, तर साहित्य हे एक शैलीदार जिणे आहे. असे शैलीदार जगणे व या प्रकारच्या जगण्यासाठी अनौपचारिक संघटना उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. विशेषतः साहित्यिक संस्कृतीपासून वंचित झालेल्या आपल्या लेखक-कवींना अशा अनौपचारिक चर्चामंडळांची नितान्त गरज आहे. निर्मितीच्या बीजांना अंकुरण्यास व अंकुरलेल्या कोंबांना पालवी फुटण्यास त्यांतून आवश्यक तो जीवनरस निश्चितपणे प्राप्त होईल.

### मनुष्याची मृण्मयता व अपराधिता

मित्रहो, साहित्याबद्दल कधीही बोलण्याचा प्रसंग आला, की माझ्या डोळ्यांसमोर दोन प्रतिभावंतांचे शब्द चंद्र-सूर्याप्रमाणे एकदमच उगवताना दिसतात. माझ्या आंतरिक सृष्टीत हे चंद्रसूर्य कधीही मावळत नाहीत; मी एकाच वेळी दिवस आणि रात्र अनुभवत असतो. अवतीभवतीच्या बाहेरील जगात अंधार येतोही, तो अंधार मलाही डोळ्यांनी बघावाच लागतो, मनाने सहनही करावा लागतो; पण माझे आतले लोचन त्या वेळीही अलांछित चंद्रमे व तापहीन मार्तंड यांच्यातच लीन झालेले असतात. *माझ्या* जगण्याची जागा खरी तर तिथेच असते!

तर ते दोन प्रतिभावंत कवी! एक आहे सेंट जॉन पर्स हा नोबेल पुरस्कारविजेता फ्रेंच कवी. तो म्हणतो,

"In this age of nuclear weapons, does the earthenware lamp of poetry still suffice? -- Yes, if its clay reminds us of our's ..... And it is enough for the poet to be the guilty conscience of his times." (या संहारक अण्वस्त्रांच्या युगात कवितेची मातीची पणती आपल्या कामी येईल काय? तर, होय; कारण आपल्या मृण्मयतेची जाणीव हीच मातीची पणती माणसाला देत राहील. म्हणूनच आपल्या युगाचे अपराधी मन जपणे हेच कवीचे काम आहे.)

आणि दुसरे कवी नामदेव ढसाळ. ते सांगतात :

*नंतर उरल्यासुरल्यांनी कुणालाही*
*गुलाम करू नये, लुटू नये,*
*काळा-गोरा म्हणू नये,*
*तू ब्राह्मण, तू क्षत्रिय, तू वैश्य, तू शूद्र*
*असे हिणवू नये,*
*नाती न मानण्याचा*
*आय-भैन न ओळखण्याचा गुन्हा करू नये,*
*आभाळाला आजोबा आणि जमिनीला आजी मानून*
*त्यांच्या कुशीत गुण्यागोविंदाने आनंदाने राहावे,*
*चंद्र-सूर्य फिके पडतील असे सचेत कार्य करावे,*
*एक तीळ सर्वांनी करंडून खावा,*
*माणसावर सूक्त रचावे*
*माणसांचेच गाणे गावे माणसांनी.....!*

मित्रहो, मी अधिक काय बोलणार? प्रत्येक माणसाला दोन मने असतात, असे पूर्वी युंगसाहेब सांगून गेले. एक मन व्यक्तीचे व दुसरे समूहाचे. मलाही तसेच वाटते. जातिवंत लेखक-कवींनाही अशी दोन मने असलीच पाहिजेत आणि असतातही. परंतु सर्वांना व विशेषतः साहित्यनिर्मात्यांना वेगळ्या प्रकारचीही दोन मने असतात. त्यांपैकी एक मन मनुष्याच्या मृण्मयतेचा धर्म सांभाळणारे व दुसरे मन त्याच्या अपराधी वृत्तीचे कर्म सोसणारे असते. मानवी मृण्मयता आणि अपराधिता या बाबी सनातन आहेत. त्या माणसाबरोबरच जन्मल्या व माणसाबरोबरच संपणाऱ्या आहेत. जोपर्यंत या जगात मनुष्य मातीतूनच जन्मत राहील आणि एक तीळ व सात माणसे हे प्रमाण टिकून राहील, तोपर्यंत कवितेची पणती पाजळणारे व एक तीळ करवंडून खाऊ घालणारे कवि-लेखक नितान्त आवश्यक आहेत. पण एवढेच नाही. मृण्मयता व अपराधिता ही मनुष्याच्या मूलभूत दलितत्वाची अंगभूत स्वरूपे आहेत. अशा या दोन मनांना वागवणाऱ्या लेखक-कवींना दलित म्हणावयाचे नाही तर काय म्हणणार? मनुष्याची मृण्मयता ही एक मूल्यकल्पना आहे हे कला-साहित्यांनीच सिद्ध केले आहे. या मृण्मयतेच्या सर्जनशीलत्वाचे त्यांनीच संगोपन केले आहे. दलितता हे मानवी मृण्मयतेचे दुसरे नाव आहे. म्हणूनच एका परम अर्थाने प्रतिभा व प्रतिभावंत हीदेखील दलिततेचीच नामांतरे ठरतात.

शतकांच्या या संधिकालात दलित साहित्यिक आपल्या आदिपर्वातून, वनपर्वातून बाहेर पडून आता उद्योगपर्वात प्रवेश करीत आहेत. आपले आयुष्य म्हणजे एक महाकाव्यच आहे, असे डॉ. आंबेडकरांना एकदा उत्कटत्वाने प्रतीत झाले होते. नव्या उद्योगपर्वातील दलित कवी-लेखकांना आपले काव्य जणू एक महाआयुष्यच होत आहे अशी प्रचिती यावी, येईल अशी माझी इच्छा आहे, श्रद्धाही आहे.

मित्रहो, मी इथे थांबतो. शतकांच्या संधिकालातील साहित्यधर्माचे हे आरुप बोल आपण ऐकून घेतलेत याबद्दल धन्यवाद!








# जीवाची 'निर्मिती' आणि मालकी

*जननिक अभियांत्रिकी व जीवांवरील एकस्वाधिकार यांमधून उत्पन्न होणाऱ्या नैतिक व पर्यावरणीय समस्या*

**वंदना शिव**

(अनुवाद अ. ना. ठाकूर)

जीव म्हणजे काय?

जीव स्वतःची जडणघडण स्वतःच करतात. या गुणवैशिष्ट्याला स्वयंसंघटन म्हणता येईल. आपली जडणघडण आपणच करण्याची क्षमता हे जीवाचे (किंवा सजीव व्यवस्थेचे) व्यवच्छेदक लक्षण आहे. याचा अर्थ सजीव व्यवस्था ही स्वयं-शासित असते; तसेच समोर येणाऱ्या प्रश्नांची सोडवणूक करण्यासाठी ही व्यवस्था स्वतःच उत्तरे शोधून काढते. याचा अर्थ असा नव्हे की, सजीव व्यवस्था ह्या बेटाप्रमाणे पृथक् पृथक् असतात. त्या परस्परक्रिया-प्रतिक्रिया करणाऱ्या नसतात, असेही नाही. स्वतःची जडणघडण स्वतःच करणाऱ्या जीवांची त्यांच्या पर्यावरणाशी परस्परक्रिया-प्रतिक्रिया होत असते; मात्र ही स्वायत्त असते. जीवाच्या जडणघडणीत होणाऱ्या संरचनात्मक बदलांना पर्यावरणाकडून केवळ चालना दिली जाते. असे कोणते बदल करायचे ते पर्यावरण ठरवत नाही किंवा बदलांची दिशा निश्चित करण्याचे कामही पर्यावरण करीत नाही. आपल्या जडणघडणीत नेमके कोणते बदल करायचे ते खुद्द जीव ठरवितो. तसेच पर्यावरणातील कोणत्या घटकांमार्फत बदलांसाठी चालना घ्यायची तेही जीवच ठरवितो. आपले सातत्य राखणे व आपले नूतनीकरण करीत राहणे यांकरिता कशाचा स्वीकार करायचा व कोणत्या गोष्टींचा त्याग करायचा हे स्वतःची जडणघडण स्वतःच करणाऱ्या जीवाला माहीत असते. याकरिता आपल्यासमोरच्या प्रश्नांची उत्तरे स्वतःच्या बळावर जीव देत असतो.

सजीव व्यवस्था ही गुंतागुंतीची असते. म्हणजे तिच्यात अनेक घटक असतात. या जटिलतेमुळे जीवाला आपली व्यवस्था स्वतःच लावता येते व स्वतःची जडणघडण स्वतःच करणे शक्य होते. या गुंतागुंतीमुळे नवनवीन गुण-वैशिष्ट्ये पुढे येण्याचीही शक्यता असते. आपले रूप व आकृतिबंध टिकवून ठेवीत असतानाच जडणघडणीत अखंडपणे मूलगामी बदल करीत राहण्याची क्षमता सजीवात असते. ही क्षमता हे जीवाचे व्यवच्छेदक गुणवैशिष्ट्य आहे.

जीवांमध्ये विविधताही आहे. स्वतःची जडणघडण स्वतःच करण्याच्या जीवाच्या आंतरिक क्षमतेमुळे जैविक विविधता व जीवाचे एकमेवाद्वितीय स्वरूप टिकून राहते. पर्यावरणाबरोबरील परस्परक्रिया-प्रतिक्रियेद्वारा जीवाच्या घटकांचे नूतनीकरण सतत चालू असते आणि द्रव्यांचा सतत पुनर्वापर चालू राहतो. असे असूनही जीव स्वतःचा आकृतिबंध, घडण व वैशिष्ट्यपूर्ण रूप ही टिकवून ठेवतो.

स्वतःचे स्वास्थ्य स्वतःच राखणे आणि त्यासाठी स्वतःच शरीरांतर्गत बिघाड सुधारीत राहणे हे जीवाचे आणखी एक गुणवैशिष्ट्य आहे. गुंतागुंतीची जडणघडण व स्वयंसंघटनाची क्षमता यांतूनच स्वतःचे स्वास्थ्य स्वतःच राखता येण्याचा गुणधर्म जीवात आलेला असतो.

**यंत्र आणि जीव : अभियांत्रिकी विरुद्ध अभिवृद्धी**

जीव आणि त्यांचे पर्यावरण यांच्यामधील परस्परसंबंधांचा अभ्यास म्हणजे परिस्थितिविज्ञान (इकॉलॉजी) होय. विविध प्रकारच्या जीवजाती आणि भिन्नभिन्न पर्यावरणीय व्यवस्था यांना स्वतःची जडणघडण स्वतःच करण्याचे स्वातंत्र्य असते आणि हे स्वातंत्र्य हाच परिस्थितिविज्ञानाचा मूळ आधार आहे. जुळवून घेणे (म्हणजे अनुकूलन), उत्क्रांत होणे व प्रतिसाद देणे यांच्या बाबतीत जीवजाती व पर्यावरणीय व्यवस्था यांच्या अंगी जी क्षमता असते तिच्यामुळे पर्यावरणीय स्थैर्य निर्माण होते. वस्तुतः कोणत्याही व्यवस्थेला जेवढी अधिक स्वायत्तता असेल, तेवढ्या अधिक प्रमाणात स्वतःची जडणघडण स्वतःच करण्याची क्षमता त्या व्यवस्थेपाशी असते.

व्यवस्थेला असलेल्या स्वायत्ततेचे प्रमाण बाह्य नियंत्रणाने कमी होते. परिणामी त्या व्यवस्थेची स्वतःची जडणघडण स्वतःच करण्याची व स्वतःचेच नूतनीकरण करीत राहण्याची क्षमता यांच्यात घट होते.

जीवजातींचे व पर्यावरणीय व्यवस्थांचे बाह्य नियंत्रण व अभियांत्रिकी रीतीने त्यांच्या जडणघडणीत करण्यात येणारे फेरबदल आज इतक्या मोठ्या प्रमाणावर करण्यात येत आहेत की, त्यांची परिसराशी जुळवून घेण्याची व उत्क्रांत होत राहण्याची क्षमता

* पुणे येथे १९९४ साली दिलेल्या परिसर वार्षिक व्याख्यानाचा मराठी अनुवाद

अनुक्रमणिका

क्षीण होत आहे. यातून पर्यावरणीय व्यवस्थेचे स्वास्थ्य व स्वसंवर्धनाची क्षमता धोक्यात येते.

मातुराना व व्हारेला या चिली देशाच्या दोन शास्त्रज्ञांनी पुढील दोन प्रकारांच्या व्यवस्थांमध्ये भिन्नता असल्याचे दाखविले आहे : (१) वंशसातत्य टिकून राहील अशा तऱ्हेने पुनरुत्पादन करण्यासाठी प्रामुख्याने कार्य करणारी स्वयंउत्पादनक्षम किंवा ऑटोपोईटिक व्यवस्था; व (२) पुनरुत्पादन करण्याची आंतरिक क्षमता नसलेली यांत्रिक किंवा ॲलोपोईटिक व्यवस्था. स्वतःचे जीवितकार्य स्वतःच ठरविणारी ऑटोपोईटिक व्यवस्था स्वनियंत्रित व स्वाधीन असते. याउलट, यंत्र ही एक ॲलोपोईटिक व्यवस्था आहे. यंत्राने कोणते कार्य करावयाचे – विशिष्ट उत्पादन करावयाचे – हे बाह्य शक्ती निर्धारित करते. यंत्रात बिघाड झाल्यास वा त्यासमोर नवीनच समस्या उत्पन्न झाल्यास, आता या परिस्थितितून कोणता मार्ग काढावयाचा ते यंत्र स्वतःला विचारीत नाही. बाह्य शक्तींच्या ते अधीन असते.[1]

स्वयंसंघटनक्षम व्यवस्था आतून विकसित होतात. बीमधून एक संपूर्ण झाड आंतरिक प्रक्रियेद्वारा आकारास येते. ज्यांची जडणघडण बाहेरून केलेली असते अशा यांत्रिक व्यवस्थांची वाढ होत नाही; त्या तयार केल्या, बनविल्या जातात. त्यांची जडणघडण बाहेरून दुसऱ्याने केलेली असते.

स्वयंसंघटनक्षम व्यवस्था ह्या आगळ्यावेगळ्या असून त्यांना अनेक पैलू असतात. यामुळे त्यांच्या जडणघडणीत व कार्यामध्ये वैविध्य व लवचिकता आढळते. यांत्रिक व्यवस्था एकछाप असतात. एक मारुती मोटार दुसऱ्या मारुती मोटारीसारखीच असते व प्रत्येक मारुती मोटार तेच एक कार्य पार पाडते.

स्वयंसंघटनक्षम व्यवस्था स्वतःच स्वतःचे स्वास्थ्य राखतात आणि बदलत्या पर्यावरणीय परिस्थितिशी जुळवून घेतात. ज्यांची जडणघडण यांत्रिक रीतीने बाहेरून केलेली असते अशा व्यवस्था स्वतःच स्वतःची तंदुरुस्ती राखू शकत नाहीत; त्या कोलमडून पडतात.

गतिशील संरचना जेवढी अधिक गुंतागुंतीची असते, तेवढ्या अधिक प्रमाणात तिचे कार्य स्वतःच्या आंतरिक बळावर चालते. तिच्यात होणारा बदल हा केवळ बाहेरच्या रेट्यांवर अवलंबून नसतो, तर तो तिच्या आंतरिक स्थितीवरही अवलंबून असतो. सजीव व्यवस्थांचे स्वास्थ्य आणि पर्यावरणीय स्थैर्य यांचे सारभूत मर्म म्हणजे त्यांची स्वयंसंघटनक्षमता होय.

---

१ हुंबेर्तो आर. मातुराना आणि फ्रान्सिस्को जे. व्हारेला, १९९२; *द ट्री ऑफ नॉलेज : द बायॉलॉजिकल रूट्स ऑफ ह्युमन अंडरस्टँडिंग*, शांबाला पब्लिकेशन, बोस्टन.

जीव किंवा पर्यावरणीय व्यवस्था यांच्याकडे, ती जणूकाही यंत्रे आहेत अशा रीतीने पाहिले जाते; तसेच त्यांचे एखादेच कार्य (उदाहरणार्थ, फळे धारण करण्याची क्षमता) 'सुधारण्या'साठी त्यांच्यात, यंत्रातल्याप्रमाणे, बाहेरून फेरबदल केले जातात तेव्हा पुढील दोन शक्यता निर्माण होतात : (१) त्या जीवाची रोगप्रतिकारक्षमता कमी होऊ शकते. त्यामुळे तो जीव रोगाला किंवा इतर जीवांच्या हल्ल्याला बळी पडण्याला अनुकूल परिस्थिती निर्माण होते. अथवा (२) पर्यावरणीय व्यवस्थेत हा जीव प्रबळ होऊन त्या व्यवस्थेतील अन्य जीवजातींना बाजूला सारून त्यांची जागा तो बळकावतो व परिणामी ह्या अन्य जाती निर्वंश होण्याची शक्यता वाढते. विचारांची व उद्दिष्टांची अभियांत्रिकीय चौकट सजीव व्यवस्थेला लागू केली की, परिस्थितिवैज्ञानिक समस्या निर्माण होतात. जननिक अभियांत्रिकीमुळे या विचारचौकटीची पकड अधिक खोलवर घट्टपणे बसत आहे. याचे महत्त्वाचे परिस्थितिवैज्ञानिक व नैतिक परिणाम होणार आहेत.

### जननिक अभियांत्रिकी आणि संक्षेपणवादी तात्त्विक चौकटीची उभारणी

जीव ही जणू यंत्रे आहेत, या विचारसरणीवर जननिक अभियांत्रिकीची उभारणी झालेली आहे. सजीव व्यवस्थेचा अभियांत्रिकीच्या दृष्टीने विचार केला म्हणजे समग्रताविरोधी संक्षेपणवाद (रिडक्शनिझम) अपरिहार्य ठरतो.

संक्षेपणवादी तात्त्विक चौकटीमुळे स्वयंसंघटनक्षम, गुंतागुंतीच्या जीवांच्या विविधतापूर्ण सृजनक्षमतांचे व निर्मितिक्षमतांचे सांस्कृतिक दृष्टीने व भौतिक दृष्टीने शब्दशः व लाक्षणिक, दोन्ही अर्थाने, संक्षेपण होते. संक्षेपणवादी भूमिका असे मानते की, विश्व परस्परांशी असंबद्ध अशा अलग अलग आण्विक तुकड्यांचे बनलेले आहे. यांत्रिक रीतीने असे घटक परस्परांशी जुळविले जाऊन मोठ्या संरचना/व्यवस्था आकारास येतात. अणूचे गुणधर्म त्यांच्या जुळणीमधून आकारास आलेल्या संरचना/व्यवस्था निर्धारित करतात. घटकांचे व्यक्तिगत गुणधर्म ही 'कारणे' आकारास येणाऱ्या संरचनेचे/व्यवस्थेचे गुणधर्म परिणामस्वरूप निर्धारित करतात. गुणधर्म व प्रतिक्रिया निर्धारित करण्यात घटकांमधील आंतरिक परस्परसंबंधांचा काही भाग असतो याला स्वीकृती नसते.

संक्षेपणवादी-यंत्रवादी भूमिकेनुसार अणू वा पदार्थ वा द्रव्य हे जड पायाभूत घटक असून त्यांची जुळणी होऊन सर्व सजीव संरचना तयार झालेल्या आहेत. हे जे मूळ, पायाभूत घटक ते जड असतात; म्हणजेच ते आंतरिकदृष्ट्या सृजनक्षम नसतात. ते कायम जसेच्या तसेच राहतात. त्यांची बाहेरून, बाह्य शक्तींनी







अनुक्रमणिका

जोडणी करावी लागते. हे घटक वेगवेगळे करून त्यांची अर्थातच फेरजोडणी केली जाऊ शकते. स्वतःहोऊन ते काहीच घडवू शकत नाहीत.

जीवविज्ञानातही हे यंत्रवादी प्रारूप आज प्रतिष्ठा पावले आहे. या प्रारूपानुसार जनुके हे भरीव गोट्यांच्या स्वरूपाचे पायाभूत घटक जड पदार्थ असून त्यांच्या विभिन्न रचनांमधून वेगवेगळे जीव उत्पन्न होतात. या प्रारूपानुसार जनुके (जीन्स) ही गुणसूत्रांवरील (क्रोमोझोम्स) विशिष्ट स्थानावर असलेले कण असून, विशिष्ट प्रथिनांचे उत्पादन करावे हे त्यांचे कार्य असते. या प्रथिनांपासून माणूस बनतो. जनुके स्वतःची प्रतिकृती स्वतःच तयार करतात असे येथे गृहीत धरले आहे. रेणवीय जीवविज्ञानाच्या क्षेत्रात सुरुवातीच्या काळात म्यूलर यांनी संशोधन केले होते. *द जीन ॲज द बेसिस ऑफ लाइफ* या आपल्या प्रबंधात त्यांनी असे प्रतिपादन केले होते की, "जनुकांकडे जीवविज्ञानातील अणू म्हणून पाहता येईल. विविध रूपांत असणाऱ्या जीवांच्या शरीरवैज्ञानिक क्रिया व आकार-वैज्ञानिक गुणधर्मांना केवळ ही जनुकेच कारणीभूत असतात."[२]

जीवविज्ञानातील संक्षेपणवादी विचारसरणीला अनेक पैलू आहेत. जीवजातींच्या पातळीवर या विचारसरणीमध्ये माणूस ही एकच जीवजाती मौल्यवान मानली जाते. माणसाच्या उपयोगी पडणाऱ्या, एवढेच स्थान इतर जातींना उरते. ज्या जीवजातींना माणसांचे सुखोपभोग वाढविण्याचे साधन म्हणूनही काही मोल नाही किंवा ज्यांचे मोल फारच कमी आहे अशा सर्व जीवजाती सृष्टीतून बेदखल वा नष्ट करणे या भूमिकेनुसार योग्यच ठरते. विशेषतः वनसंवर्धन, शेती व मासेमारी या क्षेत्रांमध्ये ज्या वेळी ही संक्षेपणवादी भूमिका लागू केली जाते तेव्हा सृष्टीत जे जीवजातींचे वैविध्य आढळते त्याचा अपरिहार्यपणे ऱ्हास घडून येतो. तात्कालिक लाभाचा विचार करून काही मोजक्या जातींचीच कृत्रिम वने निर्माण करण्यात येतात वा मोजक्या जातींचे मासेच फक्त पैदा करण्यावर भर दिला जातो किंवा शेतीमध्ये एकपिकी पद्धतीचा सर्रास अवलंब केला जातो. संक्षेपणाची ही पहिली पातळी म्हणता येईल.

मानवासह, सर्वच जीवजातींच्या सर्व वर्तनाचे स्पष्टीकरण जनुकाच्या आधारे करणे हा दुसऱ्या पातळीवरील जननिक संक्षेपणवाद म्हणता येईल. अनेकानेक जीवजाती नष्ट होण्याच्या धोक्यात भर तर पडते आहेच; पण या दुसऱ्या पातळीवरील संक्षेपणवादी भूमिकेमुळे नवी पर्यावरणीय संकटेही उद्‌भवत आहेत. उदाहरणार्थ, जीवाच्या विशिष्ट रूपांवर मालकोहक्क (एकस्व-पेटंट-अधिकार) प्रस्थापित करता यावेत अशी भूमिका पुढे येत आहे.

संक्षेपणवादी जीवविज्ञान हे सांस्कृतिक संक्षेपणाचेही प्रतीक आहे. सजीवांशी निगडित असलेले पण संक्षेपणवादी नसलेले सर्व प्रकारचे ज्ञानव्यूह व नैतिक व्यवस्था यांचे संक्षेपणवादी जीवविज्ञानामुळे अवमूल्यन होते. ज्यांचे अवमूल्यन होते त्यांमध्ये शेती व वैद्यक यांच्या पाश्चात्त्येतर सर्व पद्धती येतातच, पण पाश्चात्त्य जीवविज्ञानातील ज्या शाखा स्वतःहोऊन जननिक व रेणवीय संक्षेपणवादी भूमिकेशी जुळवून घ्यायला राजी नाहीत त्यांचाही अंतर्भाव होतो. पण ज्ञानविषयक हे व्यूह व त्यांनुसार प्राप्त होणारे ज्ञान, त्यांच्याशी संबद्ध नैतिक विचारव्यूह, तसेच संक्षेपणवादी नसलेले जीवविज्ञान, सृष्टी चिरंजीवी राहण्याच्या दृष्टीने प्रस्तुत आहेत हे ध्यानात घ्यावयास हवे. *द फरगेटिंग* मध्ये डेव्हिड एरेनफेल्ड यांनी असे म्हटले आहे, "एक वनस्पती किंवा प्राणी दुसऱ्यापासून वेगळा ओळखता येण्याची आपल्यापाशी असलेली क्षमता गमावण्याच्या तसेच ज्ञात जीवजाती एकमेकींशी व त्यांच्या पर्यावरणाशी कशा प्रकारे व्यवहार करतात हे विसरून जाण्याच्या टोकाला आपण येऊन पोचलो आहोत."[३]

ऑगस्ट वाइझमान यांनी सुमारे शंभर वर्षांपूर्वी संक्षेपणवादाचा जोरदार पुरस्कार केला होता. तेव्हा त्यांनी प्रजोत्पादक पेशी किंवा बीजपेशी व शरीर यांत अनुल्लंघनीय दरी असते हे गृहीत मांडले होते. त्यांच्या मतानुसार भ्रूणाच्या (गर्भाच्या) प्रारंभीच्या काळातच प्रजोत्पादक पेशी त्या भ्रूणाच्या शरीरात आधीच अलग झालेल्या असतात, आणि प्रौढावस्थेत पुढील पिढीच्या निर्मितीमध्ये सहभागी होईपर्यंत या प्रजोत्पादक पेशी आपले विभक्त रूपातील अस्तित्व चालू ठेवतात. याचा अर्थ संपादित किंवा उपार्जित वैशिष्ट्यपूर्ण लक्षणे ही वारशाने पुढच्या पिढीत संक्रांत होत नसतात. पर्यावरणाशी जीवाची जी देवाणघेवाण होते, क्रियाप्रतिक्रिया होते ती जीवजातीच्या विकासाच्या दृष्टीने असंबद्ध राहते, या म्हणण्याला या मतामुळे पुष्टी मिळाली. ही 'अनुल्लंघनीय वाइझमान दरी' खरे तर अस्तित्वातच नाही. तरीही, जैविक वैविध्याच्या संरक्षणासाठी प्रजोत्पादक पेशीतील जीव द्रव्य (जर्म प्लाझम) सुरक्षितपणे राखून ठेवले पाहिजे, अशा भाषेत बोलले जाते. प्रजोत्पादनक्षम जीवद्रव्याची वाइझमान यांनी बाहेरच्या जगापासून आधीच फारकत केली होती. पर्यावरणाशी अधिक चांगली

२ एव्हलिन फॉक्स केलर, १९८३; *अ फिलिंग फॉर द ऑर्‌गॅनिझम, द लाइफ ॲण्ड वर्क ऑफ बार्बारा मॅकक्लिंटॉक*; फ्रीमन ॲण्ड कंपनी, न्यूयॉर्क, पृ. ९९.

३ डेव्हिड एरेनफेल्ड, १९९३; *द फरगेटिंग*, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, न्यूयॉर्क.

अनुक्रमणिका

जुळवणूक साधणारे, उत्क्रांतीला उपकारक बदल याचा अर्थ जास्त प्रमाणात प्रजोत्पादन करण्याची क्षमता असा मग केला जातो. या भूमिकेनुसार हे बदल अवांछित अशा यदृच्छया 'चुकां'चे परिणाम ठरतात.[४] (जीवनरक्षणासाठी सृष्टीत जी सतत स्पर्धा चाललेली असते त्या स्पर्धेत टिकून राहण्यात या 'चुकां' पोटी जन्माला आलेले काहीसे वेगळे जीव जास्त यशस्वी ठरले की मग या 'चुकां' ना उत्क्रांतीच्या वाटेवरील बदल असे रूप प्राप्त होते. बाकीच्या अगणित 'चुकां' पोटी जन्माला येणारे जीव नष्ट होतात. असा या उपपत्तीचा खुलासा आहे.)

संपादित गुणवैशिष्ट्ये आनुवंशिक वारशात रूपांतरित होत नाहीत, याचा पुरावा म्हणून एका शतकापूर्वी ऑगस्ट वाइझमान यांनी केलेला जगविख्यात प्रयोग असा : त्यांनी सलग २२ पिढ्या उंदरांच्या शेपट्या कापल्या तरीही पुढच्या पिढीतील उंदरे नेहमीसारखीच शेपटी असलेली जन्माला आली. हजारो उंदरांच्या शेपट्या कापून त्यांना विद्रूप केले गेले, पण या विद्रुपतेचा कोणताही परिणाम आनुवंशिक वारसावर झाला नाही, एवढेच वास्तविक या प्रयोगांमधून सिद्ध झाले.[५]

जैव घटनांचे स्पष्टीकरण पेशीमधील रेणूंच्या भौतिक व रासायनिक गुणधर्मांच्या व क्रिया-प्रतिक्रियांच्या परिभाषेमध्ये व चौकटीत देण्याचा प्रयत्न करणारे शास्त्र म्हणजे रेणवीय जीवविज्ञान होय. आदेश-सूचना जनुकांकडून शरीराला मिळतात. या प्रतिपादनाला रेणवीय जीवविज्ञानाने, विशेषतः १९५० नंतरच्या काळातील न्यूक्लेइक अम्लांच्या कार्याविषयीच्या शोधानंतर पुष्टी मिळाली, बळकटी प्राप्त झाली. तसेच यामुळे मेंडल यांच्या आनुवंशिकताशास्त्राला भक्कम असा भौतिक पाया उपलब्ध झाला. रेणवीय जीवविज्ञानामुळे जनुक ते प्रथिने हा आनुवंशिक 'माहिती'च्या संक्रमणाचा मार्ग स्पष्ट झाला. अगदी अलीकडच्या काळापर्यंत, याच्या उलट दिशेने, 'माहिती'चे प्रथिनांमधून जनुकांना संक्रमण होते असे सूचित करणारा कोणताही संकेत रेणवीय जीवविज्ञानाने दिलेला नव्हता. अशी कोणतीही देवाण होऊ शकणार नाही हा रेणवीय जीवविज्ञानाच्या 'मध्यवर्ती ठाम अचल सिद्धान्त'. फ्रान्सिस क्रिक यांनी म्हटले आहे : "एकदा का आनुवंशिक 'माहिती' प्रथिनांमध्ये संक्रमित झाली की, त्यांमधून ती परत 'बाहेर' पडू शकत नाही."[६]

संक्षेपणवाद व नियतिवाद यांची हातमिळवणी आहे. 'सर्व नियंता रेणू' (मास्टर मॉलेक्यूल) म्हणून जनुकाला वेगळे स्थान देणे हा जीववैज्ञानिक नियतिवादाचा एक भाग आहे. **डीएनए** रूपातील जनुके प्रथिने निर्माण करतात हा मध्यवर्ती अचल सिद्धान्त हा या जीववैज्ञानिक नियतिवादातील दुसरा मुद्दा आहे. जनुके काहीही निर्माण करीत नाहीत हे ठाऊक असूनही सिद्धान्त अजून टिकून आहे. लेवांटीन यांनी म्हटले आहे : "विश्वात जेवढे म्हणून रेणू आहेत त्यांच्यापैकी भौतिक-रासायनिक क्रिया-प्रतिक्रियांच्या दृष्टीने जड, चेतनहीन असे जे रेणू आहेत त्यांपैकी एक **डीएनए** हा एक रेणू आहे. जणू तो मृत आहे. स्वतःची पुनर्निर्मिती करण्याची क्षमता या रेणूत नाही. उलट, पेशीमधील प्रथिनाच्या एका गुंतागुंतीच्या यंत्रणेमार्फत तो प्राथमिक द्रव्यांतून निर्माण होतो. **डीएनए** हा रेणू प्रथिनांची निर्मिती करतो असे पुष्कळदा म्हटले जाते. असे असले तरी वस्तुतः प्रथिने (एंझाइम) **डीएनए** ची निर्मिती करतात.

"स्वतःची प्रतिकृती निर्माण करणारे' असा जनुकांचा उल्लेख जेव्हा आपण करतो, तेव्हा त्यांना आपण एक प्रकारची गूढ, स्वायत्त शक्ती (वा क्षमता) बहाल करतो. आणि यामुळे शरीरामधील अधिक सर्वसाधारण स्वरूपाच्या द्रव्यांपेक्षा त्यांना वरचे स्थान देतो. मात्र आपली स्वतःची प्रतिकृती निर्माण करू शकणारी गोष्ट म्हणून एखाद्या गोष्टीचा उल्लेख करायचाच झाला तर, ती गोष्ट म्हणजे जनुक नक्कीच नाही. गुंतागुंतीची व्यवस्था या रूपातील संपूर्ण जीव हीच ती गोष्ट आहे."[७]

जननिक अभियांत्रिकीमुळे दुसऱ्या पातळीवरील संक्षेपणास आपण मान्यता देतो. कारण यामुळे जीव हा त्याच्या पर्यावरणापासून वेगळा काढून तर पाहिला जातोच; शिवाय समग्र जीवापासून जनुके पृथक् आहेत. जनुके व जीव यांचा काहीच संबंध नाही ही दृष्टी बाळगण्यात येते. रेणवीय जीवविज्ञानाची सैद्धान्तिक चौकट अभिजात यांत्रिकी (क्लासिकल मेकॅनिक्स) या विज्ञानशाखेच्या प्रतिकृतिबरहुकूम घेतलेली आहे. एक मध्यवर्ती ठाम अचल सिद्धान्त हे संक्षेपणवादी विचारसरणीचे परमोच्च वैशिष्ट्य आहे. माक्स प्लांक, नील्स बोर, आल्बर्ट आइन्स्टाइन, एडविन श्रोडिंजर व त्यांचे बुद्धिमंत सहकारी जड किंवा भौतिक विश्वाविषयीच्या न्यूटनप्रणीत व्यूहामध्ये आमूल परिवर्तन करण्याचे कार्य ज्या वेळी करीत होते, नेमके त्याच वेळी जीवविज्ञान हे अधिक संक्षेपणवादी होत होते.[८]

---

४ रॉबर्ट वेसन, १९९३; *बियॉण्ड नॅचरल सिलेक्शन*, द एम.आय.टी. प्रेस, केंब्रिज, मॅसाच्युसेट्स/लंडन, इंग्लंड, पृ. १९.

५ तत्रैव, पृ. ११.

६ फ्रान्सिस क्रिक, १९८८; 'लेसन्स फ्रॉम बायॉलॉजी', *नॅचरल हिस्टरी* ९७ (नोव्हेंबर), पृ. १०९.

७ लेवॉटिन आर्. १९९३; *द डॉक्ट्रिन ऑफ डीएनए*, पेंग्विन बुक्स, यू.एस.ए.

८ रॉबर्ट वेसन, पूर्वोक्त, पृ. २९.

अनुक्रमणिका

जीवविज्ञानातील संक्षेपणवादी विचार हा काही केवळ अपघात नव्हता, तर ही विचारपूर्वक आखलेली चौकट होती. *द मॉलेक्युलर व्हिजन ऑफ लाइफ* या पुस्तकात लिली काये यांनी पुढील मत नोंदविले आहे : १९३०-१९५० या दोन दशकांत रॉकफेलर फाऊंडेशन ही संस्था हा रेणवीय जीवविज्ञानाच्या संशोधनाचा प्रमुख आश्रयदाता होता. 'मॉलेक्युलर बायॉलॉजी' (रेणवीय जीवविज्ञान) ही संज्ञा वॉरेन विव्हर यांनी १९३८ साली तयार केली. तेव्हा विव्हर हे या फाऊंडेशनच्या नैसर्गिक विज्ञान विभागाचे संचालक होते. या फाऊंडेशनच्या कार्यक्रमाचे सार या संज्ञेत यावे असा ती तयार करण्यामागील हेतू होता. या संज्ञेचा भर जैविक पदार्थांच्या, अंतिमतः, पराकोटीच्या सूक्ष्म स्वरूपावर होता.

रॉकफेलर फाऊंडेशनच्या भक्कम आर्थिक पाठबळामुळे जीवविज्ञानाची एका संक्षेपणवादी चौकटीमध्ये बौद्धिक व संरचनात्मक फेरमांडणी करणे सोपे गेले. १९३२-५९ या काळात या फाऊंडेशनने अमेरिकेमधील रेणवीय जीवविज्ञानावरच्या कार्यक्रमासाठी सुमारे २.५ कोटी डॉलरांची तरतूद केली. वैद्यकाशिवाय इतर जीववैज्ञानिक कार्यक्रमावर या फाऊंडेशनने खर्च केलेल्या एकूण रकमेच्या पाव हिश्शापेक्षा ही रक्कम जास्तच होती. (१९४०-५० या दशकाच्या सुरुवातीच्या काळापासून शेतीवर खर्च होणारी प्रचंड रक्कम यात अंतर्भूत आहे)

रेणवीय जीवविज्ञानविषयीच्या या न्यासाच्या कार्यक्रमाच्या प्रभावाखाली जीवविज्ञानाच्या क्षेत्रातील संशोधनाची दिशा निश्चित झाली. १९५३-६५ दरम्यान डीएनएच्या जडणघडणीचे तपशीलवार अध्ययन करण्यात आले. या काळात जनुकांच्या रेणवीय जीववैज्ञानिक संशोधनासाठी अठरा जणांना नोबेल पारितोषिके मिळाली. यांच्यापैकी सतरा जणांच्या संशोधनाला विव्हर यांच्या मार्गदर्शनाखालील रॉकफेलर फाऊंडेशनने पूर्णपणे वा काही प्रमाणात आर्थिक साहाय्य केले होते.[१०]

या नवीन कार्यक्रमात एवढ्या प्रचंड प्रमाणावर गुंतवणूक करण्यामागे पुढील हेतू होता : नैसर्गिक, वैद्यकीय व सामाजिक विज्ञानांचा भक्कम आधार असलेला, व्यक्ती व समाज यांच्या सर्वंकष नियंत्रणासाठी व त्यांना हवा तसा आकार देता येण्यासाठी उपयोगी पडणारा, सर्वव्यापी स्पष्टीकरणे पुरवू शकणारा व व्यवहारात लागू करता येणारा एक विचारव्यूह या स्वरूपात मानवीय विज्ञानांचा विकास करणे हा तो हेतू होता. समाजाची धारणा, त्याचे नियंत्रण व इष्ट समाजाची उभारणी या साऱ्या मानवसंबद्ध अभियांत्रिकीच्या आवाक्यातल्या बाबी आहेत असे प्रतिपादन तंत्रविशारदांच्या वर्तुळात केले जात होते. त्या परिभाषेत १९२०-३० या दशकाच्या शेवटी शेवटी ही कार्यक्रमपत्रिका सुस्पष्टपणे मांडली गेली. औद्योगिक भांडवलशाही अधिष्ठित समाजव्यवस्थेशी संवादी अशी माणसामाणसांतील संबंधांची फेररचना करणे हे या कार्यक्रमाचे अंतिम लक्ष्य होते. या कार्यक्रमांतर्गत जीवविज्ञानाची (मुळात या जीवविज्ञानाला 'मानस-जीव-विज्ञान' – 'सायको-बायॉलॉजी' हे नाव होते) उभारणी भौतिक विज्ञानांच्या भक्कम पायावर करण्यात आली. मानवी वर्तनाचे नियमन करणाऱ्या मूलभूत यंत्रणेचे अचूक स्पष्टीकरण करणे आणि अखेरीस मानवी वर्तनाचे नियंत्रण करणे या दृष्टीने ही उभारणी केली होती. हे करताना विशेषकरून आनुवंशिकतेवर फार मोठा भर देण्यात आला होता.

अशा रीतीने, उच्चनीचश्रेणी व असमानता 'नैसर्गिक' किंवा 'स्वाभाविक' आहेत, या स्वरूपाचे प्रामाण्य बहाल केले गेले. *डॉक्ट्रीन ऑफ डीएनए* यामध्ये लेवांटीन म्हणतात : "हे निसर्गवादी स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे आहे – वेगवेगळ्या व्यक्तींच्या अंगभूत किंवा उपजत क्षमता यांच्यात अंतर असते. त्या कमी-जास्त असतात, इतकेच नाही तर खुद्द या उपजत क्षमतादेखील जीववैज्ञानिक रीतीने पिढ्यान् पिढ्या संक्रमित होतात. याचा अर्थ आपल्या उपजत क्षमता या आपल्या जनुकांमध्ये ग्रथित असतात. मूळच्या आर्थिक व सामाजिक वारशाच्या संकल्पनेचे आता जीववैज्ञानिक आनुवंशिकतेत रूपांतर झाले आहे."[११]

संक्षेपणवादी जीवविज्ञानामागील बौद्धिक व सामाजिक उद्दिष्टांचा परस्परसंयोग आणि सुप्रजननशास्त्र यांच्यात जवळचा ऐतिहासिक नातेसंबंध आहे. ज्यांचा संबंध सुप्रजननशास्त्राशी होता अशा अनेक प्रकल्पांना १९३० पर्यंत रॉकफेलर फाऊंडेशनने आर्थिक साहाय्य दिले होते. त्यांचा पाठपुरावा केला होता. मात्र वैज्ञानिक ज्ञानाच्या उपयोजनाद्वारे हवा तसा मानव आपण घडवू शकतो असा दावा करणारे मानवविषयक नवे विज्ञान मांडले जाऊ लागले तोपावेतो प्रजननशास्त्राच्या आधारे हव्या त्या क्षमता अंगी असणाऱ्या मानवांची पैदास (सिलेक्टिव्ह ब्रीडिंग) करून समाजाचे नियमन व नियंत्रण करण्याचे उद्दिष्ट बाळगणे समाजमान्य राहिले नव्हते. असे उद्दिष्ट बाळगणे अनैतिक व अमानुष मानले गेले होते.

अगदी नेमके सांगायचे झाल्यास, जुन्या सुप्रजननशास्त्राला वैज्ञानिक प्रामाण्य उरले नव्हते. म्हणूनच या नवीन कार्यक्रमांची

९ लिली ई.काये, १९९३; *द मॉलेक्युलर व्हिजन ऑफ लाइफ, कॅल्टेक, द रॉकफेलर फाऊंडेशन ॲण्ड द राइझ ऑफ न्यू बायॉलॉजी*, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, पृ. ६.

१० तत्रैव, पृ. ८

११ लेवांटिन, पूर्वोक्त, पृ. २२

निकड निर्माण झाली होती. या नवीन कार्यक्रमात मानवी आनुवंशिकता व वर्तन यांचा अभ्यास काटेकोर वैज्ञानिक चौकटीत केला जाण्याची हमी देण्यात आली होती. सुप्रजननशास्त्राचे रांगडे सिद्धान्त व कालबाह्य वंशवाद यांच्यावर आधारलेल्या सामाजिक नियंत्रणाची भलावण करणे असमर्थनीय झाले होते. त्याच वेळी भौतिकी रासायनिक कोनामधून जनुकाचा रहस्यभेद करण्यासाठी निकराने संशोधन हाती घेण्यात आले. प्राथमिक पातळीवरील जीवांचे संघटन, एक व्यवस्था म्हणून जीवांचे कार्य/वर्तन यांचा अभ्यास, प्रथिनांच्या संरचनेचे विश्लेषण असे या रेणवीय जीवविज्ञानाच्या क्षेत्रातील संशोधन कार्यक्रमाचे स्वरूप होते. सुप्रजननशास्त्राच्या अधिक साधार तत्त्वांचा उपयोग करून समाजाला इष्ट तो आकार देणे व त्यावर नियंत्रण प्रस्थापित करणे यासाठीची, काहीशा मंद गतीने कार्यान्वित होऊ शकणारी, पण खात्रीशीर अशी उपाययोजना उपलब्ध होईल असे आश्वासन हा कार्यक्रम देत होता.[१२]

निसर्ग व समाज यांच्यात असलेल्या वैविध्यांचे आर्थिक व राजकीयदृष्ट्या नियंत्रण करण्यापेक्षा नियमन-नियंत्रणाची अधिक श्रेयस्कर सैद्धान्तिक चौकट म्हणून संक्षेपणवादाची निवड करण्यात आली.

जननिक नियतिवाद व जननिक संक्षेपणवाद यांची हातमिळवणीच असते. 'परंतु, जनुके ही आद्य आहेत' हे म्हणणे विज्ञाननिष्ठ कमी आणि विशिष्ट हितसंबंधी विचारव्यूहाचा भाग अधिक. जनुके या स्वावलंबी बाबी नाहीत; तर ती एका संपूर्ण जीवाचे परावलंबी घटक आहेत व संपूर्ण जीवामुळे ती कार्यरत होत असतात; परिणाम साधत असतात. पेशीच्या सर्व घटकांमध्ये परस्परक्रिया होत असतात. आणि एका जीवाची जडणघडण होण्याच्या कामी जनुकांच्या व्यक्तिगत प्रभावाइतके तरी किमान महत्त्व त्यांच्या विवक्षित समुच्चयात्मक रचनेला आहे.

एकेक प्रकारचे प्रथिन हे एकेका विवक्षित जनुकाच्या 'सूचने'वरून निर्माण होते; आणि एखादा प्राणी म्हणजे ठराविक प्रकारच्या प्रथिनांनी केलेली निर्मिती असते, असे म्हणता येणार नाही. एकेक जनुकाच्या सूचनेबरहुकूम एकेक विशिष्ट प्रथिन तयार होते हे खरे असले तरी, अमुक अमुक प्रथिने एकत्र आल्याने निर्माण झालेला हा जीव, असे म्हणता येणार नाही वा अमुक एक जीव बरोबर अमुक तमुक प्रथिने असे समीकरण घालता येणार नाही. जनुकांचे बहुमुखी परिणाम होतात आणि बहुतेक वैशिष्ट्यपूर्ण लक्षणे ही एकाहून अधिक जनुकांवर अवलंबून असतात.

ज्या प्रक्रियांमुळे जननिक अभियांत्रिकी ही तंत्रविद्या शक्य कोटीत येते खुद्द त्याच प्रक्रिया 'सर्वनियंता रेणू' व 'मध्यवर्ती सिद्धान्त' या संकल्पनांच्या विरुद्ध आहेत. असे असले तरी जननिक नियतिवादी भूमिकेमध्ये अनुस्यूत असलेली एकरेषीय व संक्षेपणवादी कार्यकारणमीमांसा हीच खरी, असे अट्टहासाने म्हटले जाते. म्हणून लेविन यांनी जोर देऊन म्हटले आहे, "Restriction sites, promoters, operators, operons and enhancers play their part. Not only does DNA make RNA but RNA, aided by an enzyme suitably called reverse transcriptase, makes DNA."[१३]

वास्तविक पाहता संक्षेपणवादी दृष्टिकोण हा जैविक घटनांचे स्पष्टीकरण देण्याच्या दृष्टीने व तात्त्विक उपपत्ती मांडण्याच्या दृष्टीने असमर्थ ठरतो. तरी परंतु, त्यामागील हितसंबंधी विचारप्रणाली ही ताकदवान असल्याकारणाने व दृष्टिकोणाला राजकीय-आर्थिक पुष्टी असल्याने ती प्रभुत्व गाजवते आहे.

जीवाच्या तुलनेत जनुकाला सर्वोच्च स्थान देण्याच्या बाबतीत काही जीववैज्ञानिकांनी फारच पुढची मजल मारली आहे. जीव म्हणजे केवळ एक यंत्र असे म्हणून त्यांनी जीवाचा दर्जा खाली आणला आहे. या मांडणीनुसार रचना टिकून राहणे व प्रजोत्पादन करणे हे या यंत्राचे एकमेव उद्दिष्ट होय. अथवा अधिक अचूकपणे सांगायचे झाल्यास, डीएनए टिकवून ठेवणे व त्याचे पुनरुत्पादन करणे हा या यंत्राचा एकमेव हेतू आहे. या यंत्राच्या निर्मितीची आज्ञावली ('प्रोग्रॅम') म्हणून तसेच त्या यंत्राने कसे काम करावे यासाठीच्या आज्ञा देणारी यंत्रणा म्हणून डीएनए कार्य करते अशी मांडणी आहे. डॉकिन्स या शास्त्रज्ञांच्या शब्दांत, 'जीव हे 'टिकून राहण्याच्या दृष्टीने बनविलेले यंत्र' असते; ज्या जनुकांद्वारे त्याची निर्मिती होते त्या जनुकांना राहण्यासाठी घडविलेला जीव म्हणजे एक धडपडत अडखळत हालचाली करणारा रोबो असतो. स्वतःचे अस्तित्व टिकवून ठेवण्यासाठी सदैव कार्यरत असलेली 'इंजिने' म्हणजे ही जनुके असून उपजत 'स्वार्थी बुद्धी' हा त्यांचा, डॉकिन्स यांच्या मते, आद्य गुणधर्म असतो. डॉकिन्स म्हणतात, "बाह्य जगापासून ही जनुके पक्की सीलबंद झालेली असतात. बाह्य जगाशी त्यांचा अत्यंत आडवळणी संबंध येतो. ही जनुके दूरवर्ती नियंत्रणाच्या मार्गाने बाह्य पर्यावरणाला आपल्याला अनुकूल करून घेण्यासाठी प्रयत्नशील असतात. जनुके तुमच्यात आहेत, माझ्यात आहेत. त्यांनी आपली, म्हणजे आपले शरीर व

१२ लिली ई.कोये., पूर्वोक्त, पृ. ८-९.
१३ लेविन रॉजर, १९८३; 'हाऊ मॅमेलियन आर.एन.ए. रिटर्न्स टु इट्स जीनोम', सायन्स २१९ : १०५२-१०५४.

मन यांची निर्मिती केलेली आहे. आणि ती जनुके टिकून राहणे हा आपल्या अस्तित्वाचे अंतिम प्रयोजन आहे."[१४]

**जननिक अभियांत्रिकी आणि नीतिशास्त्र**

जीव ही जणूकाही यंत्रे आहेत अशी दृष्टी बाळगून व्यवहार केला गेला की, जीवांविषयीचा नैतिक दृष्टिकोण बदलतो. जीवाला स्वयंभू मूल्य नाही; एक साधन म्हणून केवळ त्याचे मूल्य आहे, असा नैतिक दृष्टिकोणात बदल होतो. या परिवर्तनाचे आणखी काही गर्भित असे नैतिक परिणाम होतात. उदाहरणार्थ, यातून जीव रोगाला बळी पडण्याची शक्यता वाढते. आपली औद्योगिक (व्यापारी) उद्दिष्टे साध्य करण्यासाठी आजकाल प्राण्यांत हवे ते फेरपालट करण्यात येत आहेत आणि यामधून नैतिक, पर्यावरणीय व आरोग्यविषयक असे गंभीर घातक परिणाम आजच दृग्गोचर झालेले आहेत. संक्षेपणवादी चौकटीत जास्तीत जास्त उत्पादन हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी साधन म्हणून प्राण्यांचा उपयोग केला जाताना नीतिविषयक साऱ्या मर्यादा धाब्यावर बसविल्या जातात, व तसा व्यवहार करणे योग्यच आहे असे मानले जाते. औद्योगिक दृष्टिकोणातून प्राण्यांची पैदास करणाऱ्या क्षेत्रात यंत्रवादी दृष्टिकोण प्रभावी ठरला आहे. मांसउद्योगाचे उदाहरण द्यायचे झाल्यास, या उद्योगातील एका व्यवस्थापकीय तज्ज्ञाचे म्हणणे असे : "डुकरीणीकडे एक यंत्र म्हणून पाहणे व तिला तसे हाताळणे, हे गरजेचे आहे. सॉसेजीस उत्पादन करणारे यंत्र जसे काम करते तसे स्वतःच्या उदरामधून पिलावळ प्रसूत करीत राहणे हे डुकरीण नावाच्या 'यंत्रा'चे कार्य होय, अशीच आपली दृष्टी असायला हवी."[१५]

तथापि डुकरांना यंत्राप्रमाणे वागविल्यास त्याचा त्यांच्या वागण्यावर व आरोग्यावर मोठा विपरीत परिणाम होतो; कारण डुकरे जिवंत प्राणी आहेत; यंत्रे नव्हेत. अशा कारखान्यातील डुकरांच्या शेपट्या कापलेल्या असतात, दात पाडलेले असतात व वृषणे छाटलेली असतात. कारण त्या पर्यावरणात ती एकमेकांवर चालून जातात, त्यांच्या अंगी एक प्रकारची हिंस्र वृत्ती बाणते. या वृत्तीला या उद्योगात 'स्वजातिभक्षणा'ची प्रवृत्ती म्हणतात. अशा कारखानासदृश वराहपालन केंद्रामधील १८ टक्के पिले त्यांच्या मातांकडून गुदमरवून मारली जातात; २ ते ५ टक्के पिलांमध्ये जन्मजात रोग आढळतात (उदाहरणार्थ, फेंगाडे पाय, गुदद्वार नसणे, उफराटी रचना असणाऱ्या स्तनग्रंथी). तसेच ज्या रोगात पाठ केळ्याप्रमाणे कमानदार होते त्या 'बनाना रोगा'स वा पोर्सीन स्ट्रेस सिंड्रोमला (असह्य ताण प्रकट करणारी लक्षणसमूह अवस्था) डुकरे बळी पडण्याची शक्यता वाढते. जननिक अभियांत्रिकीमुळे असे ताण व रोग वाढणे अपरिहार्य आहे. मानवी वृद्धि-संजीवके (हॉर्मोन) दिलेल्या डुकरांत असे आढळून आले आहे. अशा डुकरांचे वजन एवढे जास्त झालेले असते की, ते त्यांच्या पायांना पेलवत नाही. ज्या गायींमध्ये गोकुलीय वृद्धि-संजीवक अंतःक्षेपित केलेले असते त्यांच्या बाबतीतही हाच प्रश्न उद्‌भवल्याचे दिसून आले आहे.

प्राण्यांचे आरोग्य व प्राणी-कल्याणाविषयीचे हे मुद्दे आणि प्राण्यांची स्वयं-नियमनाची क्षमता व स्वतःचे आरोग्य स्वतःच राखण्याची क्षमता यांच्यावर या नवीन तंत्रज्ञानाचा पर्यावरणीय आघात यांच्यामध्ये स्वाभाविकपणेच अंगभूत परस्परसंबंध आहे.

जीवमात्राला एक स्वयंभू मूल्य असते या मुद्द्याचा अंगभूत संबंध जीव स्वतःचे संघटन करीत असतो या मुद्द्याशी आहे. आणि याचा संबंध पर्यायाने स्वतःचे स्वास्थ्य स्वतःच राखता येण्याच्या क्षमतेशी आहे.

जीवनिर्मितीच्या प्रक्रियेत बहुगुणित होणाऱ्या (संख्येने वाढणाऱ्या) पेशींना, त्यांचे विधिलिखित काय आहे, त्यांना काय व्हावयाचे आहे व कोणते कार्य पार पाडावयाचे आहे याच्या सूचना दिलेल्या असतात; त्या दृष्टीने त्यांचे कायमचे प्रभेदन होते व प्राप्त सूचनांनुसार पेशी अवयव घडविण्याचे काम करतात, असे दिसते. मात्र एकंदर जीवाचे संघटन करण्यासाठी असलेल्या सूचना वा त्याचा आकृतिबंध अध्याहृतच राहतो. जेव्हा एखाद्या भागाला इजा होते, तेव्हा खास प्रकारची नवी ऊतके निर्माण करण्यासाठी काही पेशी अप्रभेदित होतात.[१६]

अशा प्रकारे आपल्या वैशिष्ट्यपूर्ण आकृतिबंधाची पुनःस्थापना करण्याची एक आंतरिक क्षमता जीवामध्ये असते. पर्यायाने स्वतःला स्वतःच दुरुस्त करून घेण्याची ही क्षमता आघात पचवून पुन्हा उभे राहण्याचा गुणधर्म टिकून राहण्यावर अवलंबून असते. प्राण्यांकडे यंत्र म्हणून पाहिले जाते; तसेच त्यांच्यात स्वतःच स्वतःची जडणघडण करण्याची क्षमता आहे हे लक्षात न घेता त्यांच्यात फेरपालट केले जातात, अशा वेळी त्यांच्या अंगी असलेल्या स्वतःच स्वतःचे आरोग्य राखण्याच्या व त्यासाठी स्वतःच स्वतःमध्ये दुरुस्ती करून घेण्याच्या क्षमतेत वाढत्या प्रमाणात बिघाड होत जातो. परिणामी त्यांचे अस्तित्व टिकवून ठेवण्याकरिता त्यांची सतत बाहेरून पुष्टी करीत राहण्याची व त्यांचे नियंत्रण करीत राहण्याची गरज वाढत्या प्रमाणावर भासते.

१४ डॉकिन्स आर., १९७६; *द सेल्फिश जीन*, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, ऑक्सफर्ड.

१५ एल.जे. टेलर यांचा डेव्हिड कोटस संपादित *ओल्ड मॅक्डोनल्ड्स फॅक्टरी फार्म* या पुस्तकातील लेख, पृ. ३२.

१६ रॉबर्ट वेसन, पूर्वोक्त, पृ. १४४.

अनुक्रमणिका

**"जीवतंत्रवैज्ञानिक शोध" आणि "जनुक संरचना" अशी जैविक विविधतेची फेरव्याख्या**

जनरल इलेक्ट्रिक कंपनी व तेथील एक कर्मचारी आनंद मोहन चक्रवर्ती यांनी, जननिक अभियांत्रिकीचा वापर करून बनविलेल्या 'स्यूडोमोनास' या सूक्ष्मजंतूच्या (बॅक्टिरिया) अमेरिकेमधील एकस्वासाठी (पेटंटसाठी) १९७१ साली अर्ज केला. चक्रवर्तींनी तीन प्रकारच्या सूक्ष्मजंतूंमधून प्लास्मिड्स काढून घेतले व मग चवथ्या सूक्ष्मजंतूमध्ये त्यांचे रोपण केले. त्यांनी याचा खुलासा पुढीलप्रमाणे केला : "सूक्ष्मजंतूमधील जनुकांच्या जागांची केवळ अदलाबदल करून मी आधीच अस्तित्वात असलेल्या सूक्ष्मजंतूंमध्ये फेरबदल केला."

स्यूडोमोनास हा सूक्ष्मजंतू निसर्गनिर्मित नसून चक्रवर्तींचा शोध आहे व त्यामुळे तो एकस्व देण्यायोग्य आहे, या आधारावर त्यांना त्याचे एकस्व देण्यात आले. अमेरिकेतील एक आघाडीचे वकील अँड्र्यू किंब्रेल या संबंधात म्हणतात, "या निर्णयाने न्यायालयाने या संदर्भातले पूर्वीचे दंडक धाब्यावर बसविले. मानवी शोधांसाठीच एकस्वाचे अधिकार दिले जावेत हा दंडक आजपर्यंत होता. आणि म्हणून कोणत्याही जीवाच्या संदर्भात एकस्व बहाल केले जाऊ शकणार नाही हाही एक पूर्वीचा दंडक होता. या प्रकरणात तर खुद्द संशोधकाने स्वतःच्या सूक्ष्मजंतू 'निर्मिती' चे वर्णन जनुकांचे फक्त 'स्थलांतरण' असे सरळ सोपे केले आहे हे न्यायालयाच्या लक्षात आल्याचे दिसत नाही."

अशा निसरड्या आधारावर जीवासंबंधीचे पहिले एकस्व मान्य करण्यात आले आणि, कोणत्याही स्वरूपातील वनस्पती व प्राणी यांच्या संबंधात एकस्वाला स्वीकृती देण्याचा विचार करता येणार नाही अशी स्पष्ट तरतूद अमेरिकेच्या एकस्वविषयक कायद्यात असतानाही, त्यानंतर तेथे सर्व प्रकारच्या जीवांची एकस्वे विचार न करता (झटपट) बहाल करण्यात आली.

जननिक अभियांत्रिकीचे तंत्र वापरून बनविलेले १९० पेक्षा जास्त प्राणी, आलंकारिक भाषेत बोलायचे झाल्यास, १९९४ साली एकस्व मिळविण्यासाठी जणूकाही रांगेत नंबर लावून उभे होते. यांमध्ये मासे, गायी, उंदीर व डुकरेही होती. ही एकस्वे विविध व्यापारी कंपन्या व संशोधक यांनी मागितली आहेत.

किंब्रेल यांच्या मते चक्रवर्तींच्या बाबतीत देण्यात आलेल्या सर्वोच्च न्यायालयाच्या निवाड्यामागील सूत्र उच्चतर जीवमात्रांना पण लागू करण्यात आले आहे. "सूक्ष्मजंतूंचे एकस्व देण्याची परिणती वनस्पतींची व मग प्राण्यांची एकस्वे देण्याच्या निर्णयामध्ये अटळपणे झाली आहे."[१७]

जीवांवर एकस्व अधिकार देण्याचा निर्णय हा कमी वादग्रस्त ठरावा म्हणून जैविक विविधतेची "जीवतंत्रवैज्ञानिक शोध" व "जनुक संरचना" अशी पुनर्व्याख्या करण्यात आली. ही एकस्वे वीस वर्षांकरिता वैध (लागू) आहेत. त्यामुळे त्यांच्या आवाक्यात वनस्पती व प्राणी यांच्या भावी पिढ्याही येतात. तथापि, विद्यापीठांमधील अथवा व्यापारी कंपन्यांमधील शास्त्रज्ञ जेव्हा जीवातील जनुकांचे स्थलांतरण वा रोपण करतात तेव्हा ते काही, ज्याचे एकस्व ते प्राप्त करतात तो जीव 'निर्माण' करीत नाहीत.

चक्रवर्ती निवाडा हा अमेरिकेमधील या विषयासंबंधातील भूमिकेचा महत्त्वाचा टप्पा ठरला आहे. याचा निकाल देताना न्यायालयाने म्हटले होतेः "निसर्गात आढळणाऱ्या कोणत्याही सूक्ष्मजंतूंपेक्षा स्पष्टपणे वेगळी गुणवैशिष्ट्ये असलेला एक नवीन सूक्ष्मजंतू चक्रवर्तींनी निर्माण केला आहे..." अमेरिकेतील नॅशनल ॲकडेमी ऑफ सायन्सेसच्या 'कमिटी ऑन व्हिजन'चे अभ्यास संचालक के डिस्मुकेस म्हणतात :

"किमान एक गोष्ट तरी आपण पक्की ध्यानात घेऊया : आनंद चक्रवर्तींनी नवीन प्रकारचा जीव निर्माण केलेला नाही. ज्या साधारण प्रक्रियांचा वापर करून सूक्ष्मजंतूंचे विभिन्न वाण आनुवंशिक माहितीची देवाणघेवाण करून वेगळ्या घाटाचा चयापचय असलेला सूक्ष्मजंतूचा नवीन वाण जन्माला घालत असतात त्यांत चक्रवर्तींनी केवळ हस्तक्षेप केला एवढेच. ज्या प्रेरणांच्या नियंत्रणाखाली सर्व पेशीमय जीवन जगते व स्वतःचे पुनरुत्पादन करते, त्याच प्रेरणांखाली 'चक्रवर्ती'चा सूक्ष्मजंतू जगतो व स्वतःचे उत्पादन करतो. अलीकडच्या काळात रिकॉंबिनंट **डीएनए** च्या तंत्रात चांगलीच प्रगती झाली आहे. या तंत्राद्वारे सूक्ष्मजंतूंमधील जनुकांचे थेटपणे जीवरासायनिक नियमन (त्यांच्यात फेरपालट) करणे चक्रवर्तींनी वापरलेल्या तंत्रापेक्षा अधिक प्रमाणात शक्य झाले आहे. मात्र हे केवळ जीववैज्ञानिक प्रक्रियांमध्ये केलेले फेरपालट (फेरमांडणी) आहेत. पूर्णतया नवा (de novo) जीव निर्माण करण्याच्या शक्यतेपासून सध्याचे संशोधन कल्पनातीत दूर अंतरावर आहे. आणि म्हणून मी मनोमन अतिशय कृतज्ञ आहे. हा सूक्ष्मजंतू ही चक्रवर्तींची निर्मिती आहे, निसर्गाची नव्हे या दाव्यामुळे माणसाच्या क्षमतेविषयी बेफाट अतिशयोक्त कल्पना तेवढी होते. शिवाय या प्रकारचा दावा करण्यामधून जीवविज्ञानाविषयीचे अज्ञान व आपली 'ग'ची बाधाच व्यक्त होते. अशा तऱ्हेचे अज्ञान व फाजील अभिमान यांमुळे पूर्वीही आपल्या

१७ किंब्रेल ए., १९९३; *द ह्युमन बॉडी शॉप*, हार्पर कॉलिन्स पब्लिशर्स, न्यूयॉर्क.



अनुक्रमणिका

वसुंधरेचा पर्यावरणीय समतोल व स्वास्थ्य यांच्यावर वज्राघात झालेले आहेत."[१८]

जीवविषयक एकस्वावर अधिकार सांगणारी संक्षेपणवादी जीवशास्त्रज्ञ मंडळी जेव्हा ९५ टक्के **डीएनए** हे 'कुचकामी **डीएनए**' आहे असे सांगतात, तेव्हा त्यांचा अहंकार व उद्धटपणा अधिकच वटवटीत होतो. हे **डीएनए** निरुपयोगी आहे, असा याचा अर्थ अभिप्रेत नसतो; तर **डीएनए**च्या या भागाचे कार्य आपल्याला माहीत नाही, एवढाच याचा अर्थ असतो. जननिक अभियांत्रिकीच्या मदतीने आम्ही जीव 'निर्माण' केला असा दावा जेव्हा जननिक अभियंते करतात, तेव्हा त्यांचे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी त्यांना वऱ्याच वेळा हे 'कुचकामी **डीएनए**' च वापरावे लागते.

ट्रेसीचे उदाहरण पाहू. ट्रेसी (मेंढी जीवजातीचा एक नवा वाण) हा फार्मास्युटिकल प्रोटिन्स लिमिटेड (पीपीएल) या कंपनीमधील शास्त्रज्ञांनी लावलेला 'जीवतंत्रवैज्ञानिक शोध' आहे. ट्रेसीला 'सस्तन प्राण्यांच्या पेशींचा जैव-विक्रियक' (mammalian cell bioreactor) असे संबोधण्यात येते. कारण मानवी जनुकांचे रोपण करून ट्रेसीच्या स्तनग्रंथीद्वारे एक विशिष्ट प्रथिन निर्माण करण्याच्या दृष्टीने तिच्यात अभियांत्रिकीय बदल करण्यात आले. या प्रथिनाचे नाव आल्फा-१-ॲंटिट्रिप्सीन असे असून ते औषधनिर्मिती उद्योगामध्ये वापरले जाते. या कंपनीचे संचालक रॉन जेम्स यांचे म्हणणे असे आहे : "सस्तन ग्रंथी हा एक चांगला कारखाना आहे. आमच्या मेंढ्या म्हणजे शेतात-कुरणात भटकणारे, आखूड लोकर असलेले कारखाने (च) असून त्यांचे कार्य उत्कृष्टपणे चालू असते."

तथापि, जननिक अभियंत्यांनी 'जीवतंत्रवैज्ञानिक शोध' लावला, असा दावा केला जात असतानाच, या कंपनीमधील शास्त्रज्ञांना, सदर प्रथिनाचे जास्त उत्पादन करण्यासाठी हे 'कुचकामी **डीएनए**' वापरावे लागलेले आहे. (या **डीएनए**चे कोणतेही उपयोगी कार्य नाही अशी शास्त्रज्ञांची समज होती.) या बाबतीत रॉन जेम्स म्हणतात : "आम्ही 'या कुचकामी डीएनए' चे काही असे तसेच (random) तुकडे, त्यांच्या ईश्वरनिर्मित अवस्थेत जनुकात तसेच राहू दिले, आणि आम्हांला उत्पादन जास्त मिळाले." एकस्वाचा दावा करताना मात्र शास्त्रज्ञ देव बनतो म्हणजे ज्या जीवाचे एकस्व मिळविलेले आहे त्या जीवाचा मी निर्माता आहे असा तो दावा करतो.

आता, 'जननिक अभियांत्रिकी'च्या करामतीने जो वेगळ्या क्षमता (धारण करणारा) प्राणी अस्तित्वात येतो त्याच्या पुढच्या पिढ्या याही एकस्वधारकाने लावलेले 'शोध' म्हणता येत नाहीत. पुनरुत्पादनाची जीवाची जी स्वतःची क्षमता असते तिच्याच बळावर या नंतरच्या पिढ्या जन्माला येतात. 'नवीन यंत्रे घडविणारे अभियंते' हे रूपक वापरून जीवाविषयी एकस्व बहाल केले जाते. पण संकरित **डीएनए** अंतःक्षेपित केलेल्या (मेंढीच्या) ५५० अंड्यांपैकी ४९९ जगली. जेव्हा ही अंडी मेंढ्यांच्या गर्भाशयात अध्यारोपित केली, तेव्हा फक्त ११२ कोकरे जन्माला आली. त्यांच्यापैकी फक्त पाच कोकरांच्या **डीएनए**मध्ये मानवी जनुक समाविष्ट झालेले आढळले. यांपैकी तीन मेंढ्यांच्या दुधामध्ये दर लिटरमागे फक्त ३ ग्रॅम आल्फा-१-ॲंटिट्रिप्सीन हे प्रथिन मिळाले; पण पीपीएलच्या 'सोन्याची अंडी देणाऱ्या मेंढी' ने म्हणजे ट्रेसी नावाच्या मेंढीने दर लिटर दुधामध्ये ३० ग्रॅम हे प्रथिन निर्माण केले.

जीवाची शरीररचना (जडणघडण) व कार्य यांविषयी अज्ञान असताना, त्या अज्ञानाचाच आधार घेऊन जीव व त्यांची कार्ये निरुपयोगी असल्याचे घोषित करणे हे संक्षेपणवादी जीवविज्ञानाचे एक गुणवैशिष्ट्य आहे. अशा प्रकारे पिके व वृक्ष ही "तणे"[१९] आहेत, असे घोषित केले जाते; वने व काही जातींची गुरेढोरे निकृष्ट प्रतीची (कवडीमोल किमतीची) असल्याचे घोषित केले जाते आणि ज्या **डीएनए**चे कार्य समजलेले नाही त्याला 'कुचकामी **डीएनए**' म्हटले जाते. **डीएनए** रेणूचा प्रमुख भाग 'कुचकामी' समजून आपल्या अज्ञानापोटी त्याला निकालात काढायचे याचा अर्थ असा की, ज्या जैव प्रक्रियांमध्ये हा 'कुचकामी **डीएनए**' रेणू महत्त्वपूर्ण कार्य करीत असतो, त्या प्रक्रिया जाणून घेण्यात आपण अपयशी ठरलो आहोत. जेव्हा **डीएनए** रेणूमधील ९५ टक्के **डीएनए** हे कुचकामी असल्याचे सांगितले जाते, तेव्हा जीवाविषयीची एकस्वे बहाल करणे ही चूकच असते. ट्रेसीच्या रेणूमध्ये कुचकामी **डीएनए**चे काही 'रँडम' तुकडे तसेच राहू दिल्याने जर त्या विशिष्ट प्रथिनाची निर्मिती वाढली असेल तर पीपीएल कंपनीमधील शास्त्रज्ञांच्या अज्ञानाचाच तो पुरावा आहे. हे काही त्यांच्या ज्ञानाचे व निर्मितिक्षमतेचे उदाहरण म्हणता येणार नाही. जननिक अभियांत्रिकीचा इमला हा नियतीवाद व पक्के भाकीत करण्याची क्षमता यांच्या आधारावर उभारलेला आहे, तर सजीवांमध्ये फेरफार करण्याच्या माणसाच्या प्रयत्नांचे अनियतवाद व पक्के भाकीत करण्यातली असमर्थता हे व्यवच्छेदक लक्षण आहे. एकस्वाचे अधिकार प्राप्त करून घेण्यासाठी शोध

१८ ब्रायन बेचर ॲण्ड जेफ्री हॉटिन, १९९१; *ए पेटंट ऑन लाइफ : ओनरशिप ऑफ प्लॅन्ट ॲण्ड अनिमल रिसर्च*, आय.डी.आर.सी., कॅनडा.

१९ वंदना शिव, १९९३; *मोनोकल्चर्स ऑफ द माइंड*, थर्ड वर्ल्ड नेटवर्क, पेनांग.

व निर्मिती यांचे अभियांत्रिकी प्रारूप प्रक्षिपित केले जाते. पण प्रत्यक्ष व्यवहार आणि हे प्रारूप यात दरी आहे, ही गोष्ट वरील उदाहरणावरून स्पष्ट होईल. अभियांत्रिकीय हस्तक्षेपांपासून पदरात पडणारे लाभ व मिळणारी पारितोषिके यांचे श्रेय घेणे आणि हस्तक्षेपांमधून उद्‌भवू शकणारे धोके व संकटे यांची जबाबदारी टाळणे अशीही आणखी एक दरी आहे.

जीवांच्या बाबतीत मालकीहक्क शाबीत करण्याचा दावा हा ते जीव नवीन आहेत, निसर्गात आढळणारे नाहीत या आधारांवर केला जातो.

जननिक फेरपालट केलेले जीव हे निसर्गसृष्टीचा कधी घटक भाग नव्हते म्हणूनच पर्यावरणीय स्वास्थ्य व समतोल यांच्यावर त्यांचा खास परिणाम होईलच होईल; आणि म्हणून हा परिणाम संभवतः काय होईल हे माहीत होणे गरजेचे असून त्याचे मूल्यमापन होणेही आवश्यक आहे; आणि त्याची जबाबदारी या फेरपालटाच्या जनकत्वाचे श्रेय घेणाऱ्या व एकस्व धारण करणाऱ्या 'मालकां'नी स्वीकारायला हवी, असे जेव्हा पर्यावरणवादी म्हणतात, तेव्हा मात्र असा युक्तिवाद केला जातो की, जननिक फेरपालट केलेले जीव तसे नवीन नाहीत किंवा अनैसर्गिक नाहीत; तेही निसर्गसृष्टीचाच भाग आहेत व म्हणून धोका कोणताच नाही.[२०] यामुळे जैव सुरक्षिततेचा प्रश्न अनावश्यक मानला जातो. अशा रीतीने जीवांवर एकस्व प्रस्थापित करायच्या वेळी जीव हे नैसर्गिक नाहीत असे आग्रहाने म्हटले जाते. आणि जेव्हा जननिक फेरपालट केलेले जीव निसर्गात मोकाट सोडल्याने होणाऱ्या परिणामांची जबाबदारी स्वीकारण्याची वेळ येते तेव्हा हे जीव नैसर्गिक असल्याचे आग्रहाने म्हटले जाते. "नैसर्गिक" या संज्ञेचे हे सोयींनी बदलणारे अर्थ पाहता पुढील निष्कर्ष निघतो की, वस्तुनिष्ठतेच्या सर्वोच्च पातळीचा दावा करणारे विज्ञान त्याच्या निसर्गाविषयीच्या दृष्टिकोणाच्या बाबतीत अतिशय व्यक्तिनिष्ठ, संधिसाधू आहे.

नैसर्गिक या शब्दाचा असा सोयीस्कर अर्थबदल करणारे दुसरे उदाहरण म्हणजे बालकांच्यासाठी उत्पादन करावयाच्या दुधाच्या भुकटीविषयीचे आहे. जननिक अभियांत्रिकीच्या मदतीने मानवी प्रथिने असलेली दुधाची भुकटी बनविण्यासंबंधातील हे उदाहरण आहे. दुग्धव्यवसायात जगातील पहिल्या जनुकरोपित (ट्रान्सजेनिक) वळूची मालकी जेन फार्मा या जैवतंत्रविद्या कंपनीकडे आहे. त्या वळूचे नाव हेर्मान आहे. भ्रूणावस्थेत (गर्भावस्थेच्या प्रारंभी) असतानाच हेर्मानवर या कंपनीतील शास्त्रज्ञांनी जैव अभियांत्रिकीतील उपाय योजले होते. मानवी प्रथिनयुक्त दूध गायीने द्यावे या हेतूने या वळूत मानवी जनुक समाविष्ट करण्यासाठी हे उपाय योजले होते. असे दूध बालकांचे अन्न बनविण्यासाठी वापरावयाचे होते.

हेर्मान व त्याची संतती यांच्या मालकीचा प्रश्न आला की, अभियांत्रिकीय रीतीने त्यात समाविष्ट केलेले जनुक व ते जनुक असलेला प्राणी हे नैसर्गिक नाहीत असे मानले जाते; परंतु जेव्हा हेर्मानपासून झालेल्या गायींच्या दुधातील जैव अभियांत्रिकीच्या मदतीने उत्पन्न केलेले मानवी प्रथिन हा घटक असलेले बालकांचे अन्न हे सुरक्षित आहे की नाही असा प्रश्न येतो, तेव्हा मात्र तीच कंपनी म्हणते: "निसर्गात ज्या रीतीने ही प्रथिने निर्माण होतात, नेमक्या त्याच पद्धतीने आम्ही ही प्रथिने तयार केली आहेत." असे प्रथिन असलेले दूध हे मानवी दूधच आहे या गोष्टीवर आम्ही विश्वास ठेवावा, अशी या कंपनीचे प्रमुख कार्यकारी अधिकारी जोनाथन मॅक्‌क्विटी यांची अपेक्षा आहे, असे दिसते. "मानवी दूध हा सुवर्ण मानदंड मानला असून गेल्या पंचवीस वर्षांत दुधाच्या भुकटीच्या स्वरूपात बालकांचे अन्न बनविणाऱ्या कंपन्यांनी त्यात अधिकाधिक प्रमाणात (मानवी घटक) अंतर्भूत केले आहेत." या विचारसरणीमध्ये गाय, स्त्री व मुले ही वस्तूंचे उत्पादन करण्यासाठीची व कमाल नफा मिळविण्याची केवळ साधने मानली आहेत.[२१]

एकस्व कायद्याखाली मालकीहक्क नोंदवून संरक्षण प्राप्त करून घ्यायचे असते तेव्हा जीव मानवनिर्मित आहे असा दावा सांगावयाचा आणि आरोग्य, स्वास्थ्य व पर्यावरण यांच्या सुरक्षिततेचा प्रश्न उपस्थित झाला की, जीव नैसर्गिकच आहे असा बचाव करावयाचा, या परस्परविसंगत भूमिका पुरेशा नव्हत्या म्हणून की काय हेर्मानची मालकी सांगणाऱ्या जेन फार्मा कंपनीने जनुकरोपित वळू निर्माण करण्यामागील उद्दिष्टच पूर्णपणे बदलले. लॅक्टोफेरीन उत्पादित करण्यासाठी असलेल्या मानवी जनुकाची सुधारित आवृत्ती ही कर्करोग किंवा एड्स झालेल्या रोग्यांच्या उपचारासाठी उपयुक्त ठरू शकेल, असा युक्तिवाद करून तिने हेर्मानच्या रेताचा उपयोग करून प्रजनन करण्यासाठीचा नैतिक अडसर दूर करून घेतला आहे. उद्दिष्टांचा रोख बदलण्याच्या या भूमिकेसंदर्भात ही कंपनी व संबंधित शासकीय समिती यांच्यावर अत्यंत कठोर टीका करण्यात आली.

अभियांत्रिकीय रीतीने जीवांची जडणघडण (निर्मिती) करण्याच्या प्रयत्नात आलेले मोठे अपयश पाहता सजीव ही काही केवळ 'यंत्रे' नाहीत आणि वैज्ञानिक हे त्यांचे 'निर्माते' नाहीत, हे उघड झाले.

२० आर.ए.एफ.आय. कम्युनिके, जून १९९३, ऑंटॅरिओ, कॅनडा.

२१ 'न्यू सायंटिस्ट', जानेवारी ९, १९९३.

अनुक्रमणिका

अमुक जीव ही मानवाची नवी निर्मिती आहे असा दावा करून एकस्वाधिकार (पेटंट) प्राप्त करून घेता येतो. त्यामुळे सजीवांवर दोन प्रकारे घातक आघात होतो : (i) जणूकाही ते मानवनिर्मित यंत्रे आहेत या भूमिकेतून त्यांच्यात फेरवदल केले जात असल्याने, स्वसंघटन ही त्यांची जी व्यवच्छेदक क्षमता आहे तीच नाकारली जाते. (ii) एकस्वाधिकार दिलेल्या स्वरूपात पिढ्यान् पिढ्या सजीवांची निर्मिती करण्याचा मालकीहक्क वहाल केला जात असल्याने सजीवांची पुनरुत्पादनाची क्षमता नाकारली जाते.

एकस्वांचे इतरही आनुषंगिक दुष्परिणाम होतात. नवीनच शोध लावल्याचे पारितोषिक म्हणून एकस्व बहाल केले जाते या कारणाने वैयक्तिक संशोधकाचा बहुमान करण्याची ही रीत आहे अशी प्रतिमा निर्माण होते. परंतु व्यवहारात एकस्वाचे हक्क हे नवे ज्ञान-तंत्रज्ञान निर्माण करणाऱ्याच्या पदरात नव्हे तर, भांडवली गुंतवणूक करून उत्पादन करू शकणाऱ्या भांडवलदाराच्या पदरात पडत असतात. सर्जक शक्तीच्या आविष्काराचे ते पारितोषिक वस्तुतः नसते.

सजीवांमध्ये फेरवदल घडवून आणण्यासाठी व्यापारी कंपन्या मोठ्या प्रमाणावर पैसे गुंतवितात. या कंपन्यांना त्यांच्या 'गुंतवणुकीमधून पुरेसा लाभ' मिळायला हवा या युक्तिवादाच्या आधारे उद्योगसमूहांना एकस्वाधिकार वहाल केले जातात. हे लाभ वाढविण्यासाठी शेती व औषधनिर्मिती या क्षेत्रांमध्ये अशा एकस्वप्राप्त जीवांच्या कार्यावरील अवलंबन वाढविण्याकडे, त्यांना जास्त मोठी भूमिका प्रदान करण्याकडे मग अशा उद्योगसमूहांची प्रवृत्ती होते. परिणामी पिकांचे अगणित प्रकारचे वाण न वापरता काहीच मोजक्या वाणांचा वापर वाढतो. औषधांच्या निर्मितीसाठीही संजीवांच्या अगणित जाती टिकवून धरण्याची गरज वाटेनाशी होते. यामधून जैविक वैविध्याची, जनुनिक समृद्धीची धूप मोठ्या प्रमाणावर वाढत असून अधिकाधिक जीवजाती निर्वंश होण्याच्या अवस्थेकडे झपाट्याने वाटचाल करीत आहेत. दुसऱ्या बाजूला, व्यापारी तत्त्वावर चालणाऱ्या कारखानदारी पद्धतीने होणाऱ्या या मानवनिर्मित जीवांच्या पैदाशीशी निगडित असलेल्या पर्यावरणीय दुष्परिणामांची मोजावी लागणारी किंमत यामुळे विकोपाला जाणार आहे.

जीवविज्ञानाच्या संक्षेपणवादी विचारचौकटीवर आधारलेला, 'मानवनिर्मित' जीवांच्या संदर्भातील 'बौद्धिक मालमत्तेवरील हक्क'विषयक दावा का चुकीचा आहे याची अनेक कारणे देता येतात.

जनुके जीव निर्माण करतात, व म्हणून रोपित केलेल्या जनुकांचे स्थलांतरण घडवून आणणारे हे जनुकरोपित जीवांचे निर्माते असतात, हे चुकीचे गृहीत आहे. पण त्याचाच आधार घेऊन जैव अभियांत्रिकीच्या पद्धतीने वनविलेल्या जीवांशी संबंधित एकस्वावर दावा सांगितला जातो. आता जनुके जीव निर्माण करीत नाहीत. जनुके प्रथिने निर्माण करीत नाहीत. इतर प्रथिनांशी निगडित असणाऱ्या, रासायनिक उत्पादनाच्या एका जटिल यंत्रणेद्वारे प्रथिने वनतात. जनुके स्वतःची प्रतिकृती स्वतःच वनविणारी नसतात. जनुकांची निर्मिती प्रथिनांच्या एका जटिल अशा यंत्रणेद्वारा व प्रक्रियेच्या आधारे होत असते. एक जटिल व्यवस्था या रूपातील जीव, संपूर्ण जीव हा स्वतःची प्रतिकृती स्वतःच निर्माण करीत असतो (त्याचा एक घटक असलेले जनुक नव्हे).

सुट्या, एकेकट्या स्वरूपात जनुके सजीवाची निर्मिती करीत नाहीत; संपूर्ण प्राणी हा स्वतःची प्रतिकृती स्वतः तयार करणारा असतो. त्यामुळे, परखडपणे सांगायचे झाल्यास, संपूर्ण जीव निर्माण करण्याच्या दृष्टीने जनुकांची स्थाने वदलण्याला वा वाहेरून जनुक रोपित करण्याला काहीच महत्त्व नाही. तो जीवच स्वतःची 'निर्मिती' स्वतः करतो. जीव आणि त्या जीवाच्या भावी पिढ्या संशोधक जन्माला घालतो, आणि म्हणून या जैवतंत्रवैज्ञानिक फेरबदलांचे, बौद्धिक मालमत्तेवरील मालकीहक्क या स्वरूपात रक्षण केले पाहिजे असे म्हणणे याचा अर्थ, स्वतःची जडणघडण स्वतःच करण्याची व स्वतःची प्रतिकृती स्वतःच निर्माण करण्याची सजीवाची क्षमता नाकारणे असा होतो. हेच सोप्या व रोखठोक भाषेत सांगायचे झाले तर, ही निसर्गाच्या निर्मितिक्षमतेची सरळसरळ चोरीच होय.

जननिक अभियांत्रिकीच्या मदतीने ज्यांच्यात फेरवदल करण्यात आलेले नाहीत अशा वनस्पतींच्या संबंधात औषधे व शेती या क्षेत्रातील वापरासाठी एकस्वे दिली जातात. बऱ्याचदा अशी एकस्वे पाश्चात्त्येतर संस्कृतींनी जे ज्ञान शतकानुशतकांच्या ओघात, कोण्या एका व्यक्तीने नाही तर सामूहिक अनामिक सहभागाद्वारे, संपादित केलेले आहे त्याची चोरी करून मिळविलेली असतात. संक्षेपणवादी भूमिकेमधून निसर्गसृष्टीची चिरफाड करून हे ज्ञान प्राप्त केलेले नसते, समग्र स्वरूपात निसर्गाच्या प्रत्ययाच्या आकलनातून ते प्राप्त केलेले असते.

इंपीरियल कॅन्सर रिसर्च फंडाचे संचालक व ह्यूमन जीनोम प्रोजेक्ट (मानवी जनुक-आराखडा शोधण्याचा प्रकल्प) या प्रकल्पात एक महत्त्वाची भूमिका वठविणारे सर वॉल्टर बॉडमर यांनी 'वॉलस्ट्रीट जर्नल' या नियतकालिकाला दिलेल्या मुलाखतीत म्हटले की, "मालकीहक्क प्रस्थापित करण्याचा मुद्दा हा आम्ही करीत असलेल्या प्रत्येक गोष्टीच्या केंद्रस्थानी असतो." मालकी-विषयीची समस्या वौद्धिक मालमत्तेवरील हक्क या संकल्पनेच्या आधारे सोडविली जात असते.

अनुक्रमणिका

चिरस्थायी निर्मितीच्या पर्यावरणीय व्यवस्थांच्या जागी पर्यावरणाच्या दृष्टीने विनाशकारी व विध्वंसक असलेल्या अ-चिरस्थायी व्यवस्था आणण्याकरिताही ही बौद्धिक मालमत्तेवरील हक्काची संकल्पना कारणीभूत झाली आहे.

'हरितक्रांती'ला खराखुरा हरित पर्याय म्हणून बऱ्याचदा जननिक अभियांत्रिकीचा उल्लेख केला जातो. तथापि ज्याप्रमाणे 'हरितक्रांती'ची एकूण फलनिष्पत्ती ही हरित नसल्याचे आढळून आले आहे, त्याचप्रमाणे जनुकक्रांतीही हरित असणार नाही. जननिक अभियांत्रिकीविषयीचे कृषीमधील बहुतेक संशोधन हे तणनाशक (हर्विसाइड) व कीडनाशक (पेस्टिसाइड) यांच्या बाबतीत पिकांच्या असणाऱ्या 'सहनशीलते'त वाढ करण्यासाठी आहे. यामुळे रसायनांचा वापर कमी न होता वाढत जाईल. पिकांमधील सुधारणा व त्यांच्या उत्पादनक्षमतेतील वाढ या हेतूंनी केलेल्या जननिक अभियांत्रिकीच्या प्रयोगांचे परिणाम हेही विधायक स्वरूपाचे असतात असे दिसत नाही. जनुकरोपित पिकांच्या बाबतीत घेण्यात येणाऱ्या सबळ आक्षेपांचा बारकाईने शोध घेतल्यास हे उघड होते.

**निसर्गदत्त धान्यांच्या जननिक आराखड्यातील फेरबदल : राजगिऱ्याचे उदाहरण**

राजगिरा हे विलक्षण धान्य आहे. याला 'रामदाणा', किंवा 'दैवी धान्य' अशीही नावे आहेत. अमर म्हणजे अमर्त्य किंवा शाश्वत या शब्दावरून 'अमरांथ' हे नाव आले आहे. देशभर परंपरागत कृषिव्यवस्थेत इतर पिकांमध्ये राजगिरा पेरला जातो. दक्षिण भारतातील शेतांमध्ये जी 'नवधान्ये' (नऊ धान्यांचे बी) पेरली जातात त्यांत याचा समावेश आहे. एरंडी, नाचणी (रागी), ज्वारी यांच्याबरोबर राजगिरा वाढत असलेला आढळतो. हिमालयाच्या भागात मांडुआ किंवा रागी यांच्याबरोबर राजगिरा पेरतात किंवा "बारा-अनाज" (बारा धान्ये) एकत्र मिसळून पेरतात त्यात राजगिरा एक असतो. ही बारा धान्ये अशी :

१ फाप्रा Fagophrum tataricumlesculenium
२ मांडुआ Elcusine coracana
३ मार्शा Amaranthus frumentaceous
४ भाट Glycine soja
५ लोबिया Vigna Catiang
६ मूग Phaseolus mungo
७ गाहथ Dolichios bilorus
८ राजमा Phaseolus valgaris
९ जाखिया
१० नवरंगी
११ ज्वारी Sorghum vulgare
१२ उडीद Phaseolus mungo

राजगिरा हे जगातील सर्वाधिक पोषक धान्य आहे. याचे दाणे काळे, तपकिरी, तांबडे, सोनेरी किंवा पांढरे असतात. त्याच्या लाह्या करता येतात. ते दळता येते, भाजता येते व शिजविता येते. याची पाने व खोडेही चविष्ट व सकस/पोषक असतात.

इतर तृणधान्यांच्या तुलनेत राजगिऱ्यामध्ये प्रथिनाचे प्रमाण जवळजवळ दुप्पट असते. शिवाय गहू, मका, तांदूळ वा सोयाबीन यांच्यापेक्षा याच्यातील पोषणास उपकारक तंतूंचे प्रमाण अधिक असते. अन्न म्हणून याच्या या उत्कृष्ट गुणांमुळे याला साक्षात 'देवाचे धान्य' अशी प्रतिष्ठा लाभली आहे.

राजगिऱ्याचे दाणे बारीक असले तरी त्यांची संख्या खूप जास्त, म्हणजे दर झाडामागे ५ लाखापर्यंत असते. त्यामुळे एका कणिसापासून १ किलोग्रॅम दाणे मिळू शकतात. लागवड न केलेल्या, रानटी स्थितीत वाढलेल्या झुडपांपासून दर हेक्टरी सुमारे ३ टन दाणे मिळतात, तर दर हेक्टरी (वाळवलेल्या रूपात) भाजीपाला ४.५ टन मिळतो. परिस्थितिवैज्ञानिक दृष्टीने ही वनस्पती अतिशय काटक आहे. ही वनस्पती दुष्काळात टिकून राहण्याच्या दृष्टीनेही चांगली आहे. आणि इतर तृणधान्यांच्या तुलनेत हिची पाण्याची गरज निम्म्याहून कमीच आहे. ही रोगकारक कीटकांशी चांगला मुकाबला करू शकते. खरे तर उत्तर भारतात साठवणीतील धान्याच्या संरक्षणासाठी त्यात राजगिरा किंवा मार्शा यांच्या बिया घालून ठेवतात. कोष्टक क्र. १ आणि २ मध्ये राजगिरा आणि इतर तृणधान्ये यांचे तुलनात्मक उत्पादन व पोषणमूल्य ही दिली आहेत.

**कोष्टक क्र. १ : तृणधान्ये व राजगिरा यांचे उत्पादन**

| धान्य | अमेरिकेतील सरासरी उत्पादन (दर हेक्टरी किलोग्रॅम) | जागतिक सरासरी उत्पादन (दर हेक्टरी किलोग्रॅम) |
|---|---|---|
| सातू (बार्ली) | २००० | १९१० |
| ओट | १७०० | १६०० |
| मका | ४५०० | २४०० |
| तांदूळ (भरडा) | ५१०० | २३०० |
| राय | १२५० | १७४० |
| गहू | १८०० | १५६० |
| सोयाबीन | १५८० | १३७० |
| राजगिरा | ६८३-३९०० | — |

*संदर्भ : यूएसडिए, – कृषिविषयक आकडेवारी (१९७४)*

अनुक्रमणिका






इतर तृणधान्यांशी तुलना केल्यास राजगिऱ्यामध्ये कॅल्शियम, लोह व प्रथिन यांचे प्रमाण पुष्कळच जास्त आहे. राजगिऱ्याच्या लाह्यांचे लाडू व चिक्की बनवितात. राजगिरा हे तृणधान्यासारखे धान्य आहे व भारतात हे उपवासासाठी चालण्यासारखे आहे. ज्या भागांत याची लागवड होते त्या भागांत याची लापशी व चपात्याही करून खातात. या वनस्पतीचा ५० ते ८० टक्के भाग खाद्य आहे. हिरव्या पालेभाज्या रूपातील या वनस्पतीचे पोषणमूल्य इतर पालेभाज्यांप्रमाणेच आहे. या भाजीतील शुष्क पदार्थाचे प्रमाण जास्त असल्याने इतर भाज्यांच्या तुलनेत राजगिऱ्यामध्ये त्यांच्यापेक्षा २ ते ३ पट एवढी जास्त पोषकद्रव्ये असतात. राजगिरा हा अ-जीवनसत्त्वाचा महत्त्वपूर्ण स्रोत आहे. अ-जीवनसत्त्वाची न्यूनता/त्रुटी ही उष्ण कटिबंधातील आहारविषयक एक सर्वाधिक गंभीर समस्या आहे. या त्रुटीमुळे केवळ भारतामध्येच दरवर्षी सुमारे दहा लाख बालकांना अंधत्व येते. राजगिऱ्याच्या पाल्यात कॅल्शियम व लोह यांचे प्रमाणही जास्त असते. यामुळे मुले व स्त्रिया यांच्या आहारविषयक गरजा भागविण्याच्या दृष्टीने राजगिरा अतिशय महत्त्वाचा आहे. राजगिऱ्याचे पोषणमूल्य उच्च असून पर्यावरणाच्या दृष्टीनेही ही वनस्पती हितकारक आहे. परिणामी, शेतीचे चिरस्थायी स्वरूप पुन्हा प्रस्थापित होण्याच्या दृष्टीने हे महत्त्वाचे पीक आहे.

शेतीवर मुख्यत्वे पाण्यामुळे (जमिनीमुळे नव्हे) मर्यादा पडत असतात, आणि लोकांच्या पोषणविषयक गरजा भागविण्याच्या दृष्टीने धान्याच्या दाण्याच्या वजनापेक्षा त्याचे पोषणमूल्य अधिक महत्त्वाचे असते, या गोष्टी ध्यानात घेऊन जर शेतीची उत्पादनक्षमता वापरलेल्या पाण्याच्या दर एककामागे मिळणाऱ्या पोषणमूल्याची मोजपट्टी लावून मोजली तर, वरील कारणांमुळे, माणसाच्या अन्नविषयक गरजा भागविण्याच्या बाबतीत राजगिरा हा निसर्गातील चमत्कार आहे असे म्हणता येईल.

भूक व कुपोषण या समस्यांवरचा सर्वोत्कृष्ट उपाय म्हणून राजगिऱ्यासारखी धान्ये उपयुक्त ठरली असती; परंतु हरितक्रांतीच्या व्यूहरचनेत अशा धान्यांकडे दुर्लक्ष करण्यात आले. एवढेच नाही, तर त्यांच्या जागी इतर पिके लावून जणू त्यांची हकालपट्टी करण्यात आली. आज जैविक विविधतेच्या महत्त्वासंबंधीची जागरूकता वाढत आहे. म्हणून माणसाच्या अन्नविषयक गरजा भागविण्याच्या बाबतीत 'रामदाणा' किंवा 'देवाचे धान्य' स्वतःचे उचित स्थान परत एकदा प्राप्त करून घेऊ शकते.

तथापि राजगिऱ्याच्या अद्भुत गुणधर्मांचा उपयोग करून घेण्याचे दोन अगदी भिन्न मार्ग आहेत.

पहिला मार्ग 'नवधान्य' या संकल्पनेच्या उदाहरणाने स्पष्ट होतो. शेतीमधील जैविक विविधतेच्या रक्षणाचा 'नवधान्य' हा कार्यक्रम देशाच्या विविध भागांत काही वर्षांपूर्वी आम्ही सुरू केला आहे. शेतीव्यवस्थेत व आहारात राजगिरा परत समाविष्ट करण्याची ही धडपड चालू आहे. राजगिऱ्याचे विविध वाण, त्याची धान्योत्पादनातील भूमिका व वापराची रीत या तिन्हींचे रक्षण करण्याचे प्रयत्नही याद्वारे होत आहेत. वनस्पतींचे वैविध्य, वसुंधरेची जीवनधारणक्षमता तसेच छोट्या शेतकऱ्यांचे जीवनमान व पोटपाणी व ग्राहकाचे स्वास्थ्य यांचे रक्षण करण्याचेच हे प्रयत्न आहेत.

या अद्भुत धान्याचा उपयोग करून घेण्याचा दुसरा मार्ग हा अभियांत्रिकीय स्वरूपाचा आहे. जननिक अभियांत्रिकीच्या मदतीने धान्य पिकांच्या जनुकरोपित प्रजाती तयार करणे हे याचे उदाहरण होय.

जवाहरलाल (नेहरू) विद्यापीठातील प्रा. आशीष दत्त यांनी एका एकस्वाकरिता अर्ज केला आहे. राजगिऱ्यामधील प्रथिनांची निर्मिती करण्यासाठीची आज्ञावली वहन करणारे जनुक भात व गहू यांच्यासारख्या अन्य तृणधान्यांत स्थानांतरित (रोपित)

**कोष्टक क्र. २ : तृणधान्ये व राजगिरा यांच्या दाण्यांतील पोषक घटक**

| धान्य | लोह | कॅल्शियम | प्रथिन (%) | कॅलरी | तंतू भरड(%) | एकूण आहारोपयोगी(%) | विरघळणारा तंतू(%) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| राजगिरा | ३.२२ | २५-३९० | १६-१९ | ३६६ | ४-१४ | १६-१७ | ११ |
| मका | २ | १० | ९-१३ | ३५२ | २-३ | – | – |
| गहू | १२ | ४८ | १२-१४ | ३४३ | १-२ | ७ | – |
| ओट | ४ | ५० | १४-१६ | ३८४ | २ | ६-९ | ४-५ |
| तांदूळ | ३ | १० | ८ | ३५३ | १ | २-४ | – |
| सातू | ३ | १६-१४ | १२ | ३५३ | २-३ | ६ | – |

करण्याच्या संदर्भात हे एकस्व मागण्यात आले आहे. या विद्यापीठाचा जैव तंत्रविद्या विभाग व प्रा. आशीष दत्त यांना हे एकस्व संयुक्तपणे हवे आहे. हे जनुक अलग करणे व ते इतर पिकांत समाविष्ट करणे, स्थलांतरित करणे अथवा स्थानांतरित करण्याची पद्धती या गोष्टी या एकस्वांतर्गत येतात. हे एकस्व अमेरिकेत व यूरोपातही लागू होऊ शकेल.

जैविक विविधता, तसेच मानवी स्वास्थ्य व पोषण यांच्या संदर्भात या एकस्वाचा लक्ष्यार्थ कोणता होतो?

जनुकरोपित पिकांमुळे 'खाद्य तेलांतील प्रथिनांचे प्रमाण (पातळी) वाढेल', असा दावा करण्यात आलेला आहे.

तथापि, राजगिऱ्यामधील उच्च प्रथिनविषयक गुणवैशिष्ट्याचा अंतर्भाव जननिक अभियांत्रिकीच्या मदतीने इतर पिकांत केल्याने होणाऱ्या परिणामाचे मूल्यमापन करताना पुढीलसारखी तुलना करणे आवश्यक आहे. म्हणजे जनुकरोपित पिकाच्या पोषणमूल्याची, राजगिऱ्यासह घेतल्या जाणाऱ्या मिश्रपिकांपासून उपलब्ध होणाऱ्या एकूण पोषणमूल्याशी, तसेच राजगिऱ्यापासून मिळू शकणाऱ्या पोषणमूल्याशी तुलना केली पाहिजे.

राजगिरा ही काही फक्त जास्त प्रथिने देणारी खाण नाही. त्याच्यात कॅल्शियम व लोहदेखील जास्त प्रमाणात असतात. राजगिऱ्याचे हे बहुगुणी/बहुआयामी व गुंतागुंतीचे पोषणमूल्यविषयक गुणधर्म जनुकरोपित पिकात संक्रमित होत नाहीत.

राजगिऱ्याचे जनुक रोपित केलेल पीक पुढे आले, तर खुद्द राजगिऱ्याची हकालपट्टी होण्याला अनुकूल परिस्थिति निर्माण होईल. कारण संशोधन व एकस्वे यांच्यामध्ये गुंतवणूक करणाऱ्या कंपन्यांना बाहेरून जनुके रोपित केलेल्या पिकाच्या प्रसाराला प्रोत्साहन देणे भाग पडेल.

जननिक संक्षेपणवाद हा जननिक अभियांत्रिकीचा आधार आहे. प्रथिनासाठीची आज्ञावली बनविणाऱ्या जनुकाला महत्त्व (प्रतिष्ठा) प्राप्त झाल्यावर मूळच्या समग्र राजगिरा वनस्पतीचे अवमूल्यन होणार. मग राजगिरा हे एक 'पवित्र बीज', देवाची एकमेवाद्वितीय देणगी उरत नाही, तर राजगिरा हा इतर पिकांमध्ये संक्रमित करता येणाऱ्या जनुकाचा केवळ एक उद्गम बनतो. 'रामदाण्या'ची किंवा राजगिऱ्याची लागवड, उत्पादन व वापर यांची गरज उरत नाही. कारण रोपण करण्यासाठी आवश्यक असलेले वियाणे 'जनुक पेढ्या' पुरवू शकतात. या वियांपासून जनुकांचा तंतोतंत क्रम (कृत्तकरूपात) तयार व संक्रमित करणे शक्य असते. ज्या जननिक अभियांत्रिकीमुळे जनुक काढून घेऊन त्याचे स्थानांतरण/रोपण करता येते त्या अभियांत्रिकीमुळे संपूर्ण वनस्पती व तिची लागवड या गोष्टी निरुपयोगी ठरतात. त्यांचे प्रयोजन उरत नाही. कारण प्रथिनविषयक आज्ञावली अंगी वाळगणाऱ्या जनुकाचे महत्त्व एकमेवाद्वितीय ठरून राजगिऱ्याच्या इतर सर्व गुणवैशिष्ट्यांचे (उदाहरणार्थ, रोगकारक जीवांना प्रतिकार करण्याची, तसेच दुष्काळी स्थिती सहन करून तिच्यात तगून राहण्याची क्षमता) अवमूल्यन होते. राजगिरा हा काही केवळ त्याच्या दाण्यातील प्रथिनांचा स्रोत नव्हे. त्याची पानेही खाद्य असून हा अ जीवनसत्त्वाचाही एक अतिशय महत्त्वाचा स्रोत आहे. अशा रीतीने राजगिऱ्यामधील प्रथिन-जनुक भातात संक्रमित केल्याने एकूण पोषकता वाढत नाही, उलट ती घटते. थेट राजगिऱ्यापासून तसेच त्याच्याबरोवरच्या मिश्र पीक पद्धतीमधील इतर पुष्कळ धान्यांपासून अधिक उच्च दर्जाची पोषकता व पोषकतेचे भिन्नभिन्न स्रोत उपलब्ध होतात. कोष्टक क्र. ३ मध्ये राजगिरा (अ), भात (भ) व राजगिरा-जनुकरोपित भात (भ-१) यांची पोषणविषयक माहिती दिली आहे. राजगिऱ्याऐवजी जनुकरोपित भाताचे पीक तेवढे घेण्याच्या वदलामुळे एकूण पोषकतेच्या वाबतीत लाभ न होता तोटाच होतो. शिवाय जनुकरोपित भातामध्ये राजगिऱ्यामधील अंगभूत प्रतिकारक्षमतेचा, विपरीत परिस्थितितही उत्पादनक्षमता टिकवून धरण्याचा अंश आढळत नाही. जनुकरोपित भात हे रोग, रोगकारक कीटक व दुष्काळी स्थिती यांना तोंड देऊ शकणार नाही. परिणामी यावर उपाय म्हणून 'औषधी' रसायनांचे जास्त प्रमाण व त्यांची वाढती तीव्रता, तसेच जास्त प्रमाणात पाण्याचा वापर यांची गरज लागेल. जननिक अभियांत्रिकीच्या मदतीने राजगिऱ्याचे जनुक भातात समाविष्ट केल्याने शेतीची पर्यावरणविषयक जोखीम कमी होण्याऐवजी वाढेल. यामुळे शेती चिरस्थायी होणार नाही, तर अचिरस्थायी होईल.

**कोष्टक क्र. ३ राजगिरा (अ), भात (भ), व जनुकरोपित भात (भ-१) यांची पोषणविषयक माहिती.**

| धान्य | लोह | कॅल्शियम | प्रथिन % | कॅलरी | तंतू (भरड) % | एकूण पोषकता % |
|---|---|---|---|---|---|---|
| राजगिरा | ३-२२ | २५-३९० | १६-१९ | ३६६ | ४-१४ | १६-१७ |
| भ | ३ | १० | ८ | ३५३ | १ | २-४ |
| भ-१ | ३ | १० | १६-१९ | ३५३ | १ | २-४ |

*राजगिरा ते जनुकरोपित भात या बदलाने एकूण लाभ नव्हे, तर हानी होते.*

तंत्र म्हणून जननिक अभियांत्रिकी सुविकसित, प्रगल्भ आहे. परंतु चिरस्थायीपणे मानवी गरजा भागविण्यासाठी जैविक विविधतेचा वापर करून घेणारी तंत्रविद्या म्हणून ती अप्रगल्भ, दुवळी आहे. जननिक अभियांत्रिकीच्या उपयोजनाने उपलब्ध असलेल्या पोपकतेमध्ये भर न पडता तिच्यामुळे साधनसंपत्तीची उधळपट्टी होते व पर्यावरणीय व्यवस्था कोलमडून पडण्याची शक्यता निर्माण होते. जैविक विविधतेचा पाया व मानवी गरजा या वावी लक्षात घेतल्यास जनुकरोपित पिकांमुळे लाभ न होता हानीच होते. अशी पिके विविध पिकांची जागा घेतात व त्यामुळे जैविक विविधता क्षीण होते; तसेच पोपकतेचे विविधतापूर्ण उद्‌गम असणारी पिके नष्ट झाल्याने पोपकतेची उपलव्धता कमी होते.

जननिक अभियांत्रिकीमुळे "संतुलित प्रथिन-संघटन असणाऱ्या जनुकरोपित वनस्पती" निर्माण होतात, असाही दावा करण्यात येतो. तथापि जनुकरोपित धान्याची पोपकतेची पातळी राजगिऱ्यापेक्षा जास्त नाही. तसेच पिकाच्या किंवा आहाराच्या दृष्टीने पाहता जनुकरोपित भाताची घटकद्रव्ये अधिक संतुलित राहतील याची कोणतीही हमी देता येत नाही हे आपण वर पाहिलेच आहे. संतुलित आहारातील सर्व पोषक घटक एकाच पिकापासून मिळू शकत नाहीत. लोक नुसता भात खात नाहीत. ते भात डाळीच्या कालवणावरोवर खातात. येथे येणारे संतुलन हे तांदूळ व डाळ यांच्या मिश्रणातून येते, नुसत्या भातापासून नव्हे. जननिक अभियांत्रिकीच्या मदतीने भातामधील प्रथिनांचे प्रमाण वाढविण्याची धडपड म्हणजे डाळ हा संतुलित प्रथिन-संघटन असणारा स्रोत आहे, या गोष्टीकडे दुर्लक्ष करणे होय. शिवाय जनुकरोपित पिकांमुळे स्वास्थ्याविषयीच्या नवीन जोखमी समोर उभ्या राहतात. जननिक अभियांत्रिकीच्या साहाय्याने 'निर्मिलेल्या' अन्नधान्यांमुळे नवीन प्रकारची ॲलर्जी (वावडे) उद्‌भवण्याची शक्यता वाढू शकते. शिवाय जननिक अभियांत्रिकीच्या मदतीने वनविलेल्या पिकांवरोवर पुढील प्रकारच्या "जीववैज्ञानिक प्रदूषणा"ची जोखीमही येते : रोगांना वळी पडण्याची प्रवणता निर्माण होते; पर्यावरणीय व्यवस्थेत (काही) जीवजाती प्रभावी वनतात; एका जीवजातीतून दुसऱ्या जीवजातीत जनुकांचे स्थानांतरण होते.

व्रिटनमध्ये डॉ. विशप एक प्रयोग करीत आहेत. त्यांनी विंचवाची जनुके एका विषाणू (व्हायरस)मध्ये समाविष्ट केली आहेत. सुरवंट मारण्यासाठी फवारावयाचे एक कीटकनाशक वनविण्यासाठी त्यांनी हा प्रयोग केला आहे. या जनुकरोपित विषाणूला त्याचे मारक लक्ष्य म्हणून नेमून दिलेल्या जीवजाती सोडून इतर जातींना तो उपद्रवी ठरणार नाही या आधारावर हा विषाणू निर्धोक आहे, असे गृहीत धरले आहे. तथापि विषाणू व रोगकारक जीव हे लक्ष्य म्हणून नवीन जीवजाती शोधून काढीत असल्याची पुरेशी उदाहरणे आधीच माहीत आहेत. जननिक अभियांत्रिकीमुळे अधिक शक्तिशाली विषाणू निर्माण झाल्याचा वैज्ञानिक पुरावाही आहे. म्हणून उपलब्ध वैज्ञानिक पुराव्याच्या आधारे जैविक सुरक्षिततेविषयीच्या प्रश्नांच्या वावतीत वेफिकीर किंवा आत्मसंतुष्ट राहण्याच्या या वृत्तीचे समर्थन करता येत नाही.

जननिक अभियांत्रिकीच्या मदतीने निर्माण केलेल्या पिकांच्या पहिल्या चाचणीला भारताने मंजुरी दिली आहे: वॅसिलस थूरेंजेसिस (वीटी) व संकरित व्रासिका (मोहरीकुल) यांच्यासह जननिक अभियांत्रिकीच्या मदतीने वनविलेले टोमॅटोचे पीक हे यांपैकी एक पीक आहे. बीटीविषयक जननिक अभियांत्रिकीय उपाययोजनेमुळे प्रतिरोधक शक्तीमध्ये भर पडत नसल्याचा पुरावा आधीच आढळला आहे. आणि म्हणून वनस्पतींचे पीडक व रोग यांच्या नियंत्रणाचा हा चिरस्थायी मार्ग नाही.

म्हणून जननिक अभियांत्रिकीय रीतीने बनविलेली पिके व खाद्यान्ने यांच्या ज्या फायद्यांविषयी हमी देण्यात आलेली आहे ते फायदे भ्रामक व मृगजळासारखे आहेत व त्यांच्या प्रस्तावामधून उद्‌भवू शकणारे धोके मात्र वास्तव आहेत.

तथापि, जननिक अभियांत्रिकी हे अन्नधान्यनिर्मिती व त्यांचे सेवन यांच्या बावतीत केवळ मृगजळ नाही, तर वैज्ञानिक पातळीवरही तो भ्रम आहे. जननिक अभियांत्रिकीची अभिवचने ही जननिक संक्षेपणवाद व जननिक नियतीवाद यांच्यावर आधारलेली आहेत. तथापि रेणवीय जीवविज्ञानातील संशोधनाद्वारे ही दोन्ही गृहीते चुकीची असल्याचे सिद्ध झाले आहे.

### सजीवतेचा/जीवनाचा गौरव व संरक्षण

जननिक अभियांत्रिकीच्या व एकस्वांच्या या युगात खुद्द जीवनावरच वासाहतिक कब्जा करण्यात येत आहे. निसर्गसृष्टीतील जीवनव्यवस्था संरक्षित राखण्यासाठी जैव-तंत्रविद्येच्या घोडदौडीच्या या काळात कोणती कृती करण्याची आवश्यकता आहे? बाह्य तंत्रवैज्ञानिक हस्तक्षेपांपासून सजीव सृष्टी मुक्त राहावी यासाठी आग्रह राखला पाहिजे. समृद्ध जैविक विविधतेचा जो वारसा आपणांस लाभला आहे त्या आधारे स्वतःचे प्रश्न सोडविण्यासाठी वैशिष्ट्यपूर्ण स्थलकालविशिष्ट उपाय स्वतःच्या अनुभवाच्या व सर्जकतेच्या जोरावर शोधण्याची जगभरच्या समाजांची क्षमता, त्या क्षमतेवर प्राणांतिक आघात करणाऱ्या कायद्यांच्या हस्तक्षेपापासून मुक्त व सुरक्षित राहायला हवी. तसेच, आंतरिक क्षमतेने स्वतःचे स्वास्थ्य पुनर्स्थापित करण्याची व स्वतःची जडणघडण स्वतः

अनुक्रमणिका





करण्याची जीवांची शक्ती नष्ट करणाऱ्या तंत्रवैज्ञानिक फेरबदलांपासून जीवव्यवस्था मुक्त राहावयास हवी.

सध्या मी करीत असलेल्या कामाच्या दोन बाजू आहेत. जीवांमध्ये करण्यात येणारे फेरपालट व त्यांच्यावरील मक्तेदारी यांच्या विरोधात मी काम करीत आहे. विविध एतद्देशीय वियाणी सुरक्षित व संरक्षित ठेवण्याच्या उद्देशाने स्थानिक पातळीवर जागोजागी सामुदायिक बियाणे-कोष (सीड बँक्स) निर्माण करण्यासाठी 'नवधान्य' ('Navdanya') या नावाने एक देशव्यापी जाळे प्रस्थापित करण्याचे काम आम्ही चालविले आहे. जीवन व त्याची विविधता यांच्या क्षेत्रात जो अभियांत्रिकी दृष्टिकोन प्रस्थापित केला जात आहे त्याला पर्याय म्हणून हे काम आम्ही आरंभिले आहे. जीवनपोषक व संवर्धक ज्ञान-तंत्रविज्ञान ही सर्व मानवजातीची समाईक मालमत्ता आहे ही आमची भूमिका आहे. एतद्देशीय स्थानिक बियाण्यांचे जतन व्हावे यासाठी 'बीज सत्याग्रहा'चा मार्ग शेतकरी चळवळीचा भाग म्हणून अवलंबिला जात आहे. थर्ड वर्ल्ड नेटवर्क या आंतरराष्ट्रीय संघटनेमार्फत 'समाईक बौद्धिक संपदा हक्क' अशी एक चळवळ आम्ही उभारीत आहोत. ज्ञान व जीवन हे खासगी मालमत्तेचे विषय आहेत या भूमिकेला पर्याय देणारे हे काम दुसऱ्या प्रकारचे आहे.

विसाव्या शतकाच्या अखेरच्या पर्वात सजीव सृष्टीचे स्वातंत्र्य व स्वतःच्या पद्धतीने व विचाराने जगण्याचे समुदायांचे स्वातंत्र्य हे पर्यावरणीय चळवळीचे सर्वाधिक महत्त्वाचे दोन कळीचे घटक म्हणून पुढे आलेले आहेत असे मी पाहते. या धडपडीला पुढील पॅलेस्टिनियन कवितेमधून मला स्फूर्ती मिळत आलेली आहे.

### आम्ही बी जपणारे, आम्ही अमर्त्य

*आमची मायभूमी भस्मसात करा,*
*आमच्या स्वप्नांची राखरांगोळी करा,*
*आमच्या गीतांवर दाहक आम्ल ओता,*
*कत्तल केलेल्या आमच्या लोकांच्या रक्तावर*
*लाकडाचा भुसा पसरा,*
*सर्व मुक्त, स्वच्छंद, 'वन्य' व*
*एतद्देशीय गोष्टींचा आक्रोश –*
*तुमच्या तंत्रविद्येने त्याची मुस्कटदाबी करा.*
*नष्ट करा,*
*नष्ट करा आमचे गवत आणि आमची माती,*
*नायनाट करा आमच्या शेताशेताचा,*
*आमच्या पूर्वजांनी उभारलेले*
*प्रत्येक गाव भुईसपाट करा,*
*नायनाट करा*
*प्रत्येक घर, प्रत्येक वृक्ष, प्रत्येक ग्रंथ,*
*प्रत्येक कायदा यांचा,*
*आणि सर्वत्र ओतप्रोत असलेले समत्व*
*नि सुमेळ यांचा पण.*
*तुमच्या बाँबवर्षावाने वेचिराख करा प्रत्येक खोरे,*
*तुमच्या लेखणीच्या फटकाऱ्याने खोडून टाका*
*आमचा भूतकाळ,*
*आमचे साहित्य, आमच्या उपमा.*
*कापून नि जाळून टाका वने,*
*उघडी नागडी करा वसुंधरा*
*इतकी की एकाही कीटकाला,*
*एकाही पक्ष्याला, एकाही शब्दाला*
*दडायला जागा सापडणार नाही.*
*हे करा व आणखी पण काही बाही.*
*मला तुमच्या या जुलमाचं भय नाही*
*मी कधीच हताश होत नाही*
*कारण मी एक बीज सुरक्षित ठेवलंय.*
*एक छोटंसं जिवंत बीज.*
*ते मी राखीन,*
*आणि पुनश्च लावीन.*

## वर्गणीचा नवा दर

***नवभारत*ची वार्षिक वर्गणी १ एप्रिल १९९७ पासून रु. १६०/- करण्यात येत आहे. कृपया वाचक व वर्गणीदार यांनी नोंद घ्यावी ही विनंती.**

**सीताराम रायकर, सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**

# भाषांतर आणि वाङ्मयेतिहास

दत्तात्रेय पुंडे

भाषांतर आणि वाङ्मयेतिहास यांचे परस्परसंबंध अनेकविध प्रश्न निर्माण करणारे आहेत. त्यांकडे वाङ्मयेतिहासकारांचे तसेच वाङ्मयेतिहासविषयक तात्त्विक लेखन करणाऱ्यांचेही पुरेसे लक्ष गेलेले दिसत नाही. वाङ्मयेतिहासकार 'भाषांतरित वाङ्मय' असे एखादे प्रकरण किंवा उपप्रकरण कल्पून त्यांच्या समोरील भाषांतरित वाङ्मयाचा प्रश्न निभावून नेताना दिसतात. वाङ्मयेतिहासविषयक तत्त्वचर्चेमध्ये 'भाषांतरित वाङ्मयकृतींची एकूण वाङ्मयेतिहासात कशी व्यवस्था लावायची?', यासारखा एखादाच, प्रत्यक्ष अडचणींतून निर्माण होणारा प्रश्न चर्चेला येताना दिसतो. वास्तविक कोणत्याही भाषेतील वाङ्मयामध्ये भाषांतराची प्रक्रिया अनेक पातळीवर कार्य करीत असताना दिसते. भाषांतराच्या प्रक्रियेमुळे एकूण वाङ्मयविचारात अनेकानेक सूक्ष्म प्रश्न जसे निर्माण होतात, तसेच ते वाङ्मयेतिहासाच्या संदर्भातदेखील तितक्याच सूक्ष्मपणे उपस्थित होत राहतात. वाङ्मयेतिहासलेखनास परिपूर्णता येण्याच्या दृष्टीने त्याही प्रश्नांचा विचार होणे आवश्यक आहे.

॥१॥

एका वाङ्मयीन संस्कृतीवर दुसऱ्या एखाद्या वाङ्मयीन संस्कृतीचे जे आक्रमण होते ते प्रामुख्याने भाषांतरांच्या आश्रयाने होते. अशा परिस्थितीत भाषांतर हे एक प्रभावक्षेत्र ठरते. प्रभावक्षेत्र हा कोणत्याही भाषेतील वाङ्मयेतिहासाच्या संदर्भातील कळीचा मुद्दा असतो. म्हणूनच भाषांतरांमुळे निर्माण होणारे प्रभावक्षेत्रदेखील महत्त्वाचे ठरते. वाङ्मयेतिहासाच्या विचारात ते वगळले जाता कामा नये.

एकूण सांस्कृतिक आक्रमणाची नेहमीची कारणेच वाङ्मयीन संस्कृतीवर होणाऱ्या आक्रमणांच्या संदर्भातही कार्यरत असताना दिसतात. सांस्कृतिक आक्रमणाची १) जित-जेते संबंध, २) व्यापारी संबंध, ३) धार्मिक संबंध, ४) भौगोलिक निकटता आणि ५) आकस्मिक स्थलांतर ही प्रमुख कारणे सांगितली जातात. सांस्कृतिक व सामाजिक इतिहासांमधून या सर्वांची भरपूर चर्चा झालेली आहेच. ती येथे पुनरावृत्त न करता, त्यांतील काही महत्त्वाच्या मुद्द्यांना स्पर्श करून पुढे जाता येईल.

सामान्यतः जित समाजावर जेत्या समाजाच्या संस्कृतीचे आक्रमण होताना दिसते. परंतु जित-जेते संबंधातून होणारे वाङ्मयादी कला-संस्कृतीचे आक्रमण नेहमी असे एकप्रवाही, एकदिक् असते असे नाही. जितांच्या वाङ्मयादी कला-संस्कृतीचे आक्रमण जेत्यांच्या संस्कृतीवर झाल्याची उदाहरणे इतिहासात आढळतात. विशेषतः जेत्यांचा समाज हा जितांच्या तुलनेत जेव्हा सांस्कृतिक दृष्ट्या अप्रगत किंवा मागासलेला असतो, तेव्हा असा उलट-प्रवाही परिणाम होण्याची शक्यता जास्त असणार.

कोणत्याही दोन संस्कृतींतील व्यापारी संबंध हे केवळ व्यापारापुरते मर्यादित राहत नाहीत. अशा संबंधांमध्ये उत्सुकतेपोटी, कुतूहलापोटी किंवा जिज्ञासेपोटी तर सांस्कृतिक आदानप्रदान होत राहतेच; पण कधीकधी व्यापारवृद्धीचा एक व्यूह म्हणूनही हेतुगर्भ सांस्कृतिक देवाणघेवाण केली जाते. ही विशेषतः ललित कलांच्या क्षेत्रात होते.

धर्मप्रसाराच्या हेतूने अनेक संस्कृती अन्य संस्कृतींच्या संपर्कात येत असतात. मुळात धर्मतत्त्वेच या ना त्या पद्धतीच्या कथाकाव्यादी मौखिक अथवा लिखित रचनांच्या आधारे आविष्कृत होत असतात. त्यांचा प्रसार-प्रचार करण्यासाठी पुन्हा वाङ्मयनिर्मितीचाच आधार घेतला जातो. जेथे धर्म हाच संस्कृतीचे अधिष्ठान असतो, तेथे तर त्या संस्कृतीचे समग्र जीवनव्यवहार धार्मिक वाङ्मयातून आविष्कृत होत राहतात. कारण धार्मिक वाङ्मय केवळ आदर्शच प्रस्थापित करण्यासाठी निर्माण होते असे नाही, तर जीवनातील अनादर्शांचे दिग्दर्शन करण्यासाठीदेखील, निषिद्ध गोष्टी सांगण्यासाठीदेखील धार्मिक वाङ्मय निर्माण होत असतेच. धर्मप्रसाराच्या किंवा धर्मस्वीकाराच्या कारणाने जेव्हा दोन संस्कृती एकमेकींजवळ येतात, तेव्हा वाङ्मयीन संस्कृतीचे आदानप्रदान फार मोठ्या प्रमाणात होते. कारण धर्मप्रसारात आग्रहाचा जसा भाग असतो, तसाच अनुनयाचाही असतो. फादर स्टीफन्सचे *ख्रिस्तपुराण* येथे मुद्दाम आठवावे. अनुनयाच्या पोटीच 'पुराण' हा शब्दप्रयोग, ज्ञानेश्वरीसदृश ओवी छंद, मराठी भाषेचा गौरव इ. काही गोष्टी फादर स्टीफन्स स्वीकारतात. अनुनयाचा एक भाग म्हणून भाषांतरे केली गेली आहेतच.

* डॉ. कल्याण काळे व डॉ. अंजली सोमण संपादित *भाषांतरविद्या* या आगामी ग्रंथासाठी लिहिलेला लेख.




शेजारशेजारच्या दोन संस्कृती एकमेकींवर परिणाम करीत असतात, ही गोष्ट सर्वज्ञातच आहे. आपल्या संस्कृतीचे भिन्नत्व कसोशीने अबाधित राखूनही भौगोलिक निकटतेमुळे शेजारच्या संस्कृतीबद्दल कुतूहल वा जिज्ञासा निर्माण होते आणि परिणामी काही गोष्टी स्वीकारल्या जातात. कधीकधी असा स्वीकार गरजेपोटीही होतो.

रोगराई, सततचे अवर्षण किंवा अन्य काही नैसर्गिक वा मानवी आपत्तींमुळे संपूर्ण समाजच्या समाज स्थलांतर करतो आणि मग अन्य संस्कृतीच्या प्रभावक्षेत्राखाली येतो. अशा वेळी स्वसंस्कृती अबाधित राखणे अर्थातच कठीण होते. स्थलांतरामुळे जीवनशैलीच पालटते.

एका संस्कृतीचा संबंध दुसऱ्या संस्कृतीशी वरीलपैकी कोणत्याही एका कारणाने किंवा अनेक कारणांनी होवो, सांस्कृतिक आदानप्रदान हे होतच राहते. वाङ्मयीन संस्कृती ही प्रथमतः तरी प्रामुख्याने भाषांतरांच्याच अंगाने अन्य संस्कृतीत चंचुप्रवेश करते. जेव्हा एका संस्कृतीमधील वाङ्मयकृती दुसऱ्या संस्कृतीमध्ये भाषांतराच्या आश्रयाने स्वीकारल्या जातात, तेव्हा वाङ्मयीन संस्कृतीचा प्रभाव फक्त वाङ्मयकृतींची भाषांतरे होत राहण्यापुरता मर्यादित राहत नाही. भाषांतराचे परिणाम वाङ्मयप्रवाहावरही होत राहतात. भाषांतराद्वारेच नवे वाङ्मयप्रकार, वाङ्मय-तत्त्वे व तंत्रे, नववाङ्मयीन शैली इत्यादी गोष्टी प्रभावित वाङ्मयीन संस्कृती ग्रहण करीत असते. परंतु याहीपेक्षा भाषांतरांचा होणारा आणखी महत्त्वाचा प्रभाव म्हणजे काही जीवनजाणिवा, काही विचारप्रणाली (isms) आणि काही आशयप्रदेशही नव्याने स्वीकारले जातात. यामुळे अर्थातच वाङ्मयाच्या भाषांतरपूर्व मूळच्या प्रवाहात खूपच ढवळाढवळ होते; त्या वाङ्मयप्रवाहात स्थित्यंतरे होतात. ही स्थित्यंतरे लक्षणीय ठरू लागतात. अशा लक्षणीय स्थित्यंतरांच्या कालखंडाला मग त्या वाङ्मयाच्या इतिहासात 'भाषांतरयुग' असे आपोआप म्हटले जाते. कारण केवळ भाषांतरांमुळे येथे वाङ्मयप्रवाहाचे स्वरूप आणि मुख्य म्हणजे वाङ्मयनिर्मितीमागची उद्दिष्टेही परिवर्तन पावत असतात. हे परिवर्तन अखेरीस अशा एका टप्प्यापर्यंत पोहोचते की, भाषांतरांमुळे स्वसमाजाची वाङ्मयविषयक धारणाच बदलविण्याचे कार्य होत राहत असते.

यामुळेच वाङ्मयेतिहासकाराने, 'भाषांतरयुगा'चा विचार म्हणजे केवळ कोणत्या वाङ्मयीन संस्कृतीतून कोणत्या वाङ्मयकृती आपल्या वाङ्मयप्रवाहात आल्या याचा विचार, इतकी संकुचित दृष्टी ठेवू नये. असा विचार करण्यापेक्षाही वाङ्मयेतिहासकाराने भाषांतरित कृतींमुळे स्वसमाजाच्या वाङ्मयविषयक धारणेत काही स्थित्यंतर झाले आहे का, स्वसमाजाच्या वाङ्मयप्रवाहाचे भाषांतरपूर्व स्वरूप आणि भाषांतरित कृतींच्या अवतरणानंतरचे स्वरूप यांत काही अंतर पडले आहे का, काही नवे वाङ्मयप्रकार उदयास आले आहेत का, काही नवी वाङ्मयीन तत्त्वे आणि तंत्रे प्रस्थापित झाली आहेत का, नवशैली आकारास आली आहे का इत्यादींचा वेध घ्यायला हवा. कारण इतिहासाचे ध्येय अखेरतः स्थित्यंतरवेध हेच असते; निदान असायला हवे आणि वाङ्मयेतिहासही याला अपवाद नाही.

आधुनिक मराठी वाङ्मयप्रवाहाचा विचार करताना १८०० ते १८७४ या कालखंडाला 'भाषांतरयुग' म्हटले जाते. पण वर नमूद केलेल्या दृष्टीने या काळातील वाङ्मयप्रवाहाचे निरीक्षण वा परीक्षण वाङ्मयेतिहासकार क्वचितच करताना दिसतात. अधूनमधून स्थित्यंतरविषयक काही निरीक्षणे नोंदविताना ते दिसतात. उदाहरणार्थ, मराठीत 'ट्रॅजेडी' हा नाट्यवाङ्मयप्रकार आला; किंवा मराठी कवितेने पारलौकिकाची कास सोडून इहपरता स्वीकारली इत्यादी. परंतु भाषांतरांच्या परिणामी एकूण कोणता नवा वाङ्मयीन युगधर्म निर्माण झाला, याचे निदान वाङ्मयेतिहासकारांकडून झालेले दिसत नाही. उलट, या कालखंडाला 'भाषांतरयुग' म्हणावे की 'तमोयुग' म्हणावे; भाषांतररूप कृतींना अव्वल दर्जाच्या वाङ्मयाचे मूल्य मिळते की मिळत नाही अशा जुजबी प्रश्नांची चर्चा झालेली दिसते. इतकेच नव्हे तर, "प्रस्तुत कालखंडास भाषांतर-युग असे म्हणण्यात येते, हे त्याचे वर्णन साफ चूक आहे, असे अर्थातच म्हणता येणार नाही.... परंतु हे अर्थात संपूर्ण सत्य नव्हे, हेही त्याच वेळी *शतपत्रे* आणि तदनंतरचे निबंधवाङ्मय, बरीच नाटके आणि कादंबऱ्या, बरेचसे काव्य इत्यादी वाङ्मय लक्षात घेतले असता कळण्यासारखे आहे. यातही अनुकरण बरेच असे हे खरे, तथापि तेवढ्याने जे भाषांतररूप ठरत नाही' अशी धरसोडीची विधानेही आढळतात.[1] पुन्हा निबंधवाङ्मय, कादंबरीवाङ्मय हे भाषांतरांच्या परिणामी येथे अवतरले, हे मूलभूत सत्य येथे साधे अनुकरण मानून डावलले गेले आहेच. कारण भाषांतरांच्या परिणामी कोणता नवा वाङ्मयीन युगधर्म निर्माण झाला, याचा विचार येथे झालेला नाही.

१ प्रा. रा. श्री. जोग, 'उपसंहार', *मराठी वाङ्मयाचा इतिहास* : खंड चौथा (संपादक : प्रा. रा. श्री. जोग), महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, दुसरी आवृत्ती, १९७३; पृ. ६३८.

अनुक्रमणिका

॥२॥

'भाषांतरयुगा'चा वाङ्मयेतिहासामध्ये अपरिहार्यपणे विशेष विचार करावा लागतो; पण भाषांतर हा एकूण वाङ्मयप्रवाहाचा युगधर्म नसण्याच्या काळातही भाषांतरे होण्याची प्रक्रिया चालूच असते. अशा वेळी भाषांतरित वाङ्मयाचा, त्या भाषांतरांमागील विविध, भिन्नभिन्न प्रेरणा-प्रवृत्तींचा वाङ्मयेतिहासामध्ये कसा विचार करावयाचा, हा प्रश्न वाङ्मयेतिहासकारांना सतावत असतो. या संदर्भात वाङ्मयेतिहासकारासमोरील अडचणी नानाविध असू शकतात. उदाहरणार्थ, कोणत्याही वाङ्मयीन संस्कृतीतील कोणत्याही वाङ्मयकृतीचे भाषांतर केव्हाही केले जाते. याबाबतीत नियम असा काहीही नसतो. किंवा काही काही वैश्विक म्हणा, सांस्कृतिक दृष्ट्या महत्त्वाच्या ठरणाऱ्या म्हणा, वाङ्मयकृती भाषांतरकर्त्यांना पुनःपुन्हा खुणावीत असतात. काही अभिजात कृतींची भाषांतरे जणू दरेक दशकामध्ये ठरविल्याप्रमाणे होताना दिसतात. उदाहरणार्थ, *मेघदूता*चे भाषांतर मराठीत कितीतरी वेळा झालेले आहे आणि तरीही अजून आजच्या काळात प्रा. वसंत बापट किंवा प्रा. शांता शेळके यांच्यासारख्या स्वयंप्रज्ञ कविकवयित्रींना त्या कृतीचे भाषांतर करावेसे वाटले आहे. शेक्स्पीयरच्या अनेक नाटकांची भाषांतरे मराठीमध्ये पूर्वापार होत आलेली आहेत आणि आजही होताना दिसत आहेत. अशा भाषांतरांची व्यवस्था लावण्याबाबत कोणते सूत्र स्वीकारावे याचा विचार वाङ्मयेतिहासकाराला करावा लागतो. असे सूत्र निश्चित करताना वाङ्मयेतिहासकाराला अनेक प्रश्नांची उत्तरे शोधावी लागतात. त्यांपैकी काही प्रश्न असे :

१) एकाच कृतीची काही काळानंतर पुनःपुन्हा भाषांतरे का होतात? पूर्वीच्या भाषांतरकर्त्यासमोरील भाषांतराच्या प्रेरणेपेक्षा आजच्या भाषांतरकर्त्याच्या समोरची प्रेरणा वेगळी आहे का? ती वेगळी असल्यास असे वेगळेपण का उद्‌भवते?

२) एकाच वेळी विविध भाषांमधील वाङ्मयकृतींची भाषांतरे होत राहतात. त्यांची संख्या कमीजास्त असते; ती समप्रमाण नसते. अगदी अलीकडील कृतींबरोबरच दूरच्या भूतकाळातील कृतींचीही भाषांतरे होत असतात. अशा रीतीने भाषांतराचे म्हणून जे वातावरण असते, ते विषम असते. अशा विषम वातावरणासंबंधाने एक वाङ्मयेतिहासकार म्हणून काय भूमिका घ्यायची? ती भूमिका कशी निश्चित करावयाची?

३) बरेचदा कविता या वाङ्मयप्रकारात सुट्या सुट्या कवितांची, क्वचित दहापाच कवितांच्या गुच्छाची भाषांतरे होताना दिसतात. हीच गोष्ट लघुकथा, एकांकिका यांसारख्या वाङ्मयप्रकारांबाबतही घडताना दिसते. अशा परिस्थितीत एक लेखक, एक कवी किंवा एक वाङ्मयीन प्रवृत्ती भाषांतराद्वारे स्वभाषेत आली आहे, असे घडत नाही. अशा वेळी प्रभाव-परिणाम कसे शोधायचे? आदानमूल्य कसे जोखायचे?

४) एका भाषेतील वाङ्मयकृती दुसऱ्या भाषेत भाषांतरित झालेली असते. त्या भाषांतरित कृतीच्या भाषांतरांचा कसा विचार करायचा? उदाहरणार्थ, मराठीत फ्रेंच किंवा रशियन वाङ्मयकृती इंग्रजीद्वारा आलेल्या आहेत. अशा स्थितीत आदानमूल्य कसे जोखायचे?

५) वाङ्मयीन तात्त्विक विचार आणि विविध समीक्षापद्धती याही भाषांतराद्वारे वाङ्मयविचारात येऊन दाखल होतात. परंतु या नवविचाराच्या कक्षेत व कवेत येईल असे वाङ्मय मात्र निर्माण होत नसते. वाङ्मयनिर्मिती नाही, पण त्याची चर्चा सुरू आहे, अशी विपरीत परिस्थिती मग निर्माण होते. (उदा., : पोस्ट मॉडर्निझम इन लिटरेचर.) परिणामी प्रत्यक्ष वाङ्मयनिर्मिती व चर्चिला जाणारा वाङ्मयविचार यांतील अंतराचा प्रश्न सोडविण्याची जबाबदारी वाङ्मयेतिहासकारावर येते.

भाषांतरप्रक्रियेमुळे असे कितीतरी छोटेमोठे प्रश्न वाङ्मयेतिहासकारासमोर निर्माण होतात. ते प्रश्न लक्षात येणे आणि त्यांची यथायोग्य उत्तरे गवसणे यावर वाङ्मयेतिहासकाराचे यशापयश काही प्रमाणात तरी अवलंबून राहील.

॥३॥

वाङ्मयेतिहासकाराला वाङ्मयाच्या इतिहासाचे कालखंड कल्पावे लागतात आणि मग भाषांतराच्या बाबतीत त्या त्या कालखंडात उपलब्ध असणाऱ्या स्थितिगतीचा परामर्ष घ्यावा लागतो. या बाबतीत वाङ्मयेतिहासकाराने मुद्दाम ध्यानात घ्यायची गोष्ट म्हणजे त्या त्या कालखंडामध्ये 'भाषांतर' या संज्ञेची जी संकल्पना स्थिर झालेली असेल, ती त्याने केंद्रस्थानी ठेवूनच आपले मूल्यमापन केले पाहिजे. उदाहरणार्थ, मराठी वाङ्मयाचे मध्ययुगीन मराठी वाङ्मय व आधुनिक मराठी वाङ्मय असे दोन स्वरूपभेद होतात, हे आपण जाणतोच. भाषांतरविषयक जी संकल्पना आधुनिक मराठी वाङ्मयाच्या संदर्भात स्वीकारावी लागते, ती तशीच्या तशी मध्ययुगीन मराठी वाङ्मयसंदर्भात लागू करता येत नाही. मध्ययुगीन मराठी वाङ्मयाच्या बाबतीत भाषांतर ही संज्ञा बरीच व्यापक करून घ्यावी लागते. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या मते तर मध्ययुगातील भाषांतरकार या

केवळ भाषांतर करणारा नसतो, तर तो त्या कृतीचे परीक्षण-समीक्षणही करीत असतो.[२] डॉ. केतकरांना अशी भाषांतराद्वारा झालेली परीक्षणे मौलिक वाटतात. मध्ययुगीन मराठी ग्रंथकारांनी भाषांतर करताना मूळ कृतीतील काही भागाची गाळागाळ करणे, मूळ कृतीत नसलेल्या गोष्टी कथन करणे म्हणजे भर घालणे, भाषांतराच्या ओघात कालविपर्यास करणे, भाषांतरविषयाच्या बाबतीत एकच एक आधारग्रंथ न धरणे इत्यादींसारखे म्हणून जे दोष सांगितले जातात, ते डॉ. केतकरांच्या मते वस्तुतः दोष नसून भाषांतरकर्त्याचे मूळकृतीवरील अभिप्राय होत. ते या संदर्भात वास्तुशास्त्रज्ञाचे उदाहरण देऊन म्हणतात, भाषांतरकार "प्रत्येक फरक करतो, तो मूळातील दोष आहे असे वाटूनच करीत नसतो, तर त्यास निराळ्या गरजांची जाणीव असते म्हणून तो काही फरक करतो, तर काही प्रत्यक्ष सौंदर्यविषयक सुधारणाच असतात."[३] भाषांतरकार काही फरक करतो, तो "निराळ्या जनतेला विषय समजावून द्यावयाचा" म्हणूनही करतो, असेही डॉ. केतकरांनी म्हटले आहे.[४]

*महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण* या आपल्या ग्रंथातील "भाषांतरकार आणि त्याचे मूलपरीक्षण" या प्रकरणात डॉ. केतकरांनी मध्ययुगीन मराठी वाङ्मयातील भाषांतरासंबंधाने जी निरीक्षणे व मते नोंदविलेली आहेत, तीच मुळी इतिहासदृष्टीने नोंदविलेली आहेत. प्रकरणाच्या प्रारंभी ते लिहितात "....[भाषांतर करताना] फरक करण्यात कवीचा उद्देश काय होता, या तऱ्हेची चौकशी सुरू झाली म्हणजे त्या काळच्या बौद्धिक परिस्थितीवर प्रकाश पडेल; आणि असे अनेक कवींचे अध्ययन झाले म्हणजे ज्ञानेश्वरांच्या काळापासून आतापर्यंतचा वैचारिक इतिहास चांगल्या तऱ्हेने लिहिता येईल."[५] प्रकरणाची अखेर करताना डॉ. केतकर म्हणतात, "मराठीत भाषांतरे पुष्कळच आहेत आणि त्या भाषांतरांत कवीचे मूळग्रंथावर परीक्षण दिसून येते. भाषांतरातील भेदस्थळे गोळा केली म्हणजे भाषांतरकारांची मूळग्रंथविषयक मते कळतात... काव्यपरीक्षण इतिहासात भाषांतरकर्त्यांनी दाखवलेले काव्यपरीक्षण ही मोठी महत्त्वाची बाब आहे."[६]

सारांश हाच की, ज्या कालखंडातील भाषांतरित वाङ्मयाचा विचार करावयाचा असेल, त्या कालखंडाच्या संदर्भात 'भाषांतर म्हणजे काय?' या प्रश्नाचे कोणते उत्तर येते ह्याकडे वाङ्मयेतिहासकाराचे लक्ष असायला हवे.

॥४॥

मराठी वाङ्मयेतिहासकार भाषांतरांचा पुरेशा गंभीरपणे विचार करायला लागतील, तेव्हा त्यांना एका मुद्द्याकडे लक्ष द्यावे लागेल. तो मुद्दा म्हणजे भारतीय भाषांतील वाङ्मयकृतींची मराठीत झालेली भाषांतरे व पाश्चिमात्य व अन्य विदेशीय भाषांतील वाङ्मयकृतींची मराठीमध्ये झालेली भाषांतरे यांचा एकत्रित विचार करण्यापेक्षा पृथक् विचार करणे सोयीचे व लाभदायी ठरणारे आहे. एकूण भारतीय संस्कृतीचा गाभा एकच असल्याने भारतीय भाषांतील वाङ्मयकृतींच्या भाषांतरांचा एकत्रित विचार करता येईल, असे वाटते.

॥५॥

एका गोष्टीकडे वाङ्मयेतिहासकार अजिबात लक्ष देताना दिसत नाहीत. तिचा निर्देश येथे महत्त्वाचा ठरेल. अन्य भाषांतून भाषांतराद्वारा मराठीत येणाऱ्या वाङ्मयकृतींचा विचार जसा महत्त्वाचा आहे, तसाच मराठीतून अन्य भाषांत होणाऱ्या भाषांतरांचाही प्रश्न महत्त्वाचा आहे. किंबहुना हा प्रश्न जास्तच महत्त्वाचा आहे. मराठीतील कोणत्या वाङ्मयकृती, कोणते लेखक भाषांतराद्वारे कोणकोणत्या भाषक समाजात जाऊन पोहोचले आहेत, तेथील वाङ्मयीन संस्कृतीवर त्यांचा कोणत्या रीतीचा, कोणत्या किंमतीचा प्रभाव-परिणाम झालेला आहे, याचाही विचार व्हायला हवा. किंबहुना याचा विचार अधिक गांभीर्याने, पुरेशा जबाबदारीने व्हायला हवा. एकूण भारतीय पातळीवर (किंवा अन्य भाषासंदर्भात) मराठी वाङ्मयाचे मूल्य जोखण्याचे हे एक महत्त्वाचे गमक आहे. भारतेतर भाषांमध्ये भाषांतरित झालेल्या मराठी वाङ्मयाचा आढावा घेताना इंग्रजीबरोबरच अन्य कोणकोणत्या विदेशी भाषांमध्ये मराठी वाङ्मयकृती भाषांतरित झालेल्या आहेत, याचा तपास करायला हवा. अशा तपासातच मराठी वाङ्मयेतिहासकाराला मराठी वाङ्मयप्रवाहाची प्रभावक्षेत्रेही गवसतील व मौलिकताही आकळेल.

२ "भाषांतरकार हा आपले काम करीत असता, काहीतरी चिकित्सातत्त्वेच वापरीत असतो. तो जेव्हा भाषांतरासाठी विवक्षित ग्रंथ घेतो, तेव्हा तो आपली निवड करण्याची शक्ती उपयोगात आणतो व नंतर भाषांतरास घेतलेल्या काव्यापैकी काही भाग भाषांतर करतो आणि काही भाग सोडून देतो, तेव्हा तो आपले परीक्षण व्यक्त करीत असतो." – डॉ. श्री. व्यं. केतकर, महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण, व्हीनस प्रकाशन, पुणे, दुसरी आवृत्ती, १९६४; पृ. १३०.

३ तत्रैव, पृ. १४८

४ तत्रैव, पृ. १४७

५ तत्रैव, पृ. १३१

६ तत्रैव, पृ. १४८






अनुक्रमणिका

।।६।।

हीच गोष्ट मध्ययुगीन मराठी वाङ्मयाच्या बाबतीतही लक्षात घ्यायला हवी. कारण त्या काळी मराठीमध्ये ग्रंथनिर्मिती होत असतानाच संस्कृत व प्राकृत भाषांमध्येही ग्रंथनिर्मिती होत होती. एक ग्रंथकार एकापेक्षा अधिक भाषांमध्ये आपल्या रचना सादर करीत होता. मुख्य म्हणजे प्राकृत भाषा समर्थपणे कार्यरत असतानाही संस्कृतचे महत्त्व जराही कमी झालेले नव्हते. या संदर्भात डॉ. केतकरांनी नोंदविलेले निरीक्षण असे : "प्रथम एखादा ग्रंथ प्राकृतमध्ये होतो; आणि त्या ग्रंथास नंतर सार्वजनिकत्व येण्यासाठी त्याचे संस्कृतमध्ये भाषांतर होते.... स्वाभाविकत: मनुष्य स्वभाषेमार्फतच इतरास कथा सांगतो. त्या कथा इतरांमध्ये पसरतात, आणि त्या जेव्हा संस्कृतमध्ये लिहिण्याचा हव्यास असलेल्या मनुष्याच्या हाती लागतात, तेव्हा त्या संस्कृत ग्रंथात जाऊन वसतात. संस्कृत वाङ्मय येणेप्रमाणे प्रत्येक देशी भाषेतील वाङ्मयाचे संग्राहक वाङ्मय होत होते व त्या प्रवृत्तीमुळेच आपणांस मराठीतील वाङ्मयाच्या संस्कृत प्रतिकृती झालेल्या आढळतात."[७] सारांश, मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहिताना मराठीतून संस्कृतमध्ये आणि अन्य भाषांमध्ये झालेल्या भाषांतरांचा विचार व्हायला हवा.

।।७।।

साहित्य अकादमी किंवा ज्ञानपीठ यांसारख्या विविध संस्था लेखकांना व लेखनकृतींना भारतीय पातळीवरील पुरस्कार देतात. त्यामुळे लेखनकृतींची भाषांतरे होण्याच्या प्रक्रियेस चालना मिळते आहे. स्वत: साहित्य अकादमी, ज्ञानपीठ, केंद्रिय हिन्दी निदेशनालय, भारत सरकारचें शिक्षण मंत्रालय, प्रांताप्रांतांतील राज्य साहित्य संस्कृती मंडळे इत्यादी संस्था भाषांतरांच्या निरनिराळ्या योजना राबवीत आहेत. त्याकरिता या संस्था भाषांतर-कार्यशाळाही आयोजित करताना दिसत आहेत. विविध विद्यापीठे भाषांतरविद्या या विषयावर चर्चासत्रे व परिसंवाद घेत आहेत. काही विद्यापीठांनी भाषांतरविद्या या अभ्यासविषयाचा समावेश आपल्या पदवी वा पदव्युत्तर पाठ्यक्रमात केलेला आहे. या सर्वांचा परिणाम असा दिसतो आहे की, भाषांतरित कृतीला दुय्यम लेखण्याचा प्रघात व प्रवृत्ती नामशेष होते आहे. या घटनांमुळे भाषांतराचा प्रवाह गेल्या तीस-पस्तीस वर्षांपासून जोमाने वाहू लागल्याचे चित्र दिसत आहे.

याच्याच जोडीला आणखीही एका संकल्पनेचे भारतीय भाषांमधील भाषांतर-प्रक्रियेला पाठबळ मिळत आहे. ती संकल्पना म्हणजे 'भारतीय साहित्याची संकल्पना' होय. भारतीय साहित्याच्या संकल्पनेमुळे भाषाभेद विसरला जातो आहे आणि भाषांतर-प्रक्रियेला चालना मिळत आहे.

असा रीतीने भाषांतरित वाङ्मयाचा प्रवाह दिवसेंदिवस वर्धिष्णू होतो आहे. त्यामुळे आजच्या आणि उद्याच्या मराठी वाङ्मयेतिहासकारांना भाषांतरित वाङ्मयाच्या प्रवाहाचा गंभीरपणाने विचार करणे अपरिहार्यच ठरणार आहे.

७ तत्रैव, पृ. ४७



अनुक्रमणिका





# पं. जवाहरलाल नेहरू : व्यक्तित्वदर्शन

देवदत्त दाभोलकर

जवाहरलाल नेहरू यांच्या चरित्राचे एक वेगळेच आकर्षण आहे. ते कोणीतरी केव्हा तरी समर्थपणे लिहिले पाहिजे. अशा चरित्राच्या उपशीर्षकाचा ज्या ज्या वेळी मी मनाशी चाळा करतो (आणि या ग्रंथाच्या वाचनाच्या वेळी मी केला) त्या वेळी मला 'हॅम्लेट ऑफ ए सब-कॉंटिनेन्ट', 'वॉंडरिंग कंपॅनियनलेस', 'व्हेअर द ट्वेन डिड मीट', 'ए डेमोक्रॅट, ए डिक्टेटर, ऑर नायदर', 'ए प्रॅग्मॅटिक आयडिॲलिस्ट' अशी अनेक उपशीर्षके सुचतात.

त्यांच्या व्यक्तिमत्त्वाविषयींच्या अशा दृष्टिकोणातून असणाऱ्या उत्सुकतेनेच मी हे पुस्तक* वाचावयास घेतले. काही औत्सुक्य पूर्ण झाले, काही नव्याने निर्माण झाले. नेहमीचा वाक्यप्रयोगच वापरावयाचा तर, हे या पुस्तकाचे यश व मर्यादाही.

आपल्या ग्रंथाचे स्वरूप श्री. नंदा यांनी आपल्या प्रास्ताविकातच स्पष्ट केले आहे. हा एक सलग ग्रंथ नाही. जवाहरलाल नेहरूंच्या जीवनाच्या काही अंगांविषयी निबंधरूपाने केलेल्या मांडणीचा तो संग्रह आहे. जवाहरलाल यांच्या सर्व विचारविश्वाचा आणि कार्यक्षेत्राचा विचार या ग्रंथात अंतर्भूत नाही. काही निबंधांत तो त्रोटक आहे तर काही निबंधांत तो काहीसा अधिक विस्ताराने आहे. परंतु पुरेशा व आवश्यक विस्ताराने कुठेही नाही. ही मर्यादा श्री. नंदा यांनीच मान्य केलेली असल्यामुळे तिच्याविषयी अधिक चर्चा करावयाचे कारण नाही. परंतु एक आशा आणि अपेक्षा मात्र हा ग्रंथ वाचल्यानंतर वाचकाच्या मनात निर्माण होते. जवाहरलालजींचे अत्यंत सविस्तर असे (काही खंडात्मक) चरित्र त्यांनी लिहावे. या पद्धतीच्या कामाचा आवाका त्यांच्यात आहे, अनुभव आहे, व कागदपत्रे इत्यादी साहित्य त्यांना उपलब्ध आहे व होऊ शकेल. या अशा कामासाठी समर्थ असे दुसरे नाव सहज नजरेसमोर येत नाही. तो ग्रंथही मात्र त्यांनी याच पद्धतीने, केवळ अभ्यासजड विद्वानांसाठी नाही वा केवळ मनोरंजन शोधू पाहणाऱ्या अतिसामान्य जनांसाठी नाही अशा पद्धतीनेच लिहावा.

श्री. नंदा यांच्या या ग्रंथात, अशा निबंधरूपानेच का होईना, परंतु आणखी काही निबंध त्यांनी समाविष्ट करावयास हवे होते असे वाटते. ग्रंथाला निबंधरूपाचीच परंतु पूर्णता आणण्यासाठीही ते आवश्यक होते. 'गांधी ॲण्ड जवाहरलाल', 'नेहरू ॲण्ड बोस', 'आझाद, नेहरू ॲण्ड पार्टिशन' अशी निबंधांची शीर्षके वाचल्यानंतर साहजिकच 'नेहरू ॲण्ड सरदार पटेल', 'नेहरू ॲण्ड माऊंटबॅटन' हे निबंध असावयास हवे होते असे वाटून जाते. 'नेहरू ॲण्ड काश्मीर', 'नेहरू ॲण्ड चायना', 'नेहरू ॲण्ड सायन्स' यांसारखेही विषय हवे होते. जिना यांच्याविषयी अनेक निर्देश आलेले असल्यामुळे स्वतंत्र निबंध नाही हे युक्तच आहे. 'नेहरू ॲण्ड जयप्रकाश', 'नेहरू ॲण्ड विनोबा' असे निबंध असावेत की नाही यावर कदाचित वाद होऊ शकेल. जयप्रकाश यांचा कुठेच निर्देश नाही व विनोबांचा एकदाच निर्देश आला आहे व तोही उपरोधिक आहे. परंतु जवाहरलालजींच्या संदर्भात त्या त्या व्यक्तींच्या महत्त्वाच्या मूल्यमापनात लेखकाच्या व आपल्या आकलनातील मतभेदामुळेही हे घडू शकेल हे मान्य करावयास हवे.

### जवाहरलाल : मार्ग शोधणारा पथिक

'शुचीनां श्रीमतां गेहे' असे वर्णन करता येईल अशा कुळातच जवाहरलालजींचा जन्म झाला. मुक्तिमार्गावरून वाट चुकलेला योगी हाच असावा असे वाटावे अशीच त्यांची जीवनसरणी झाली. त्यामुळे गीतेतील वरील वचनाच्या उत्तरार्धाचाही त्यांच्या जीवनात प्रत्यय आला. 'योगभ्रष्टोऽभिजायते ।' असा तो उत्तरार्ध सर्वांना माहीत आहे. ही त्यांची वाटचालही या जन्मात पूर्ण झाली नाही. परंतु 'कर्मयोगा'पुरताच अध्यात्मावर विश्वास असणाऱ्या व स्वतःला योगी हे उपपद लावावयास ज्याने ठामपणाने नकार दिला असता अशा मानवाची ती एक जीवनसाधनाच होती यात शंका नाही.

या मांडणीत रॉबर्ट फ्रॉस्टला जागा मिळावी हे थोडेसे प्रथमदर्शनी आश्चर्याचेच वाटावे असे आहे. परंतु सहज मनात आले की, फ्रॉस्टच्या काही ओळींनी जवाहरलालजींच्या जीवनपटाचा आलेखच जवळजवळ उलगडून दाखविला आहे. फ्रॉस्टचे एक वचन तर त्यांनी आपल्या मेजावर आपल्यासमोरच ठेवले होते.

* बलराम नंदा, *जवाहरलाल नेहरू : रिबेल ॲण्ड स्टेट्समन*, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, दिल्ली, १९९५, रु. ४२५/-.

अनुक्रमणिका

*The woods are lovely dark and deep*
*But I have promises to keep*
*And miles to go before I sleep*
*And miles to go before I sleep.*

अशा त्या ओळी आहेत.

*Two roads divided in the forest*
*I took the one less travelled by*
*And that made all the difference.*

दुसऱ्या एका कवितेतील ओळी तर जवाहरलालजींनाच उद्देशून लिहिलेल्या आहेत असा भास व्हावा अशा आहेत.

*How difficult it is to remain from*
*being a king*
*When it is in you and in the situation;*
*And this is half the trouble with the world*
*Or more than half I am half-inclined to say.*

वरील अवतरणात काही प्रमाद माझ्याकडून झाले असण्याची शक्यता मी नाकारीत नाही. परंतु आशय सर्वांना समर्पक वाटेल अशी मला आशा आहे.

**जवाहरलालजींचे मूल्यांकन**

ग्रंथात एकूण सोळा निबंधांचा समावेश आहे. त्यांपैकी पहिले दोन उपोद्घात स्वरूपाचे म्हणून मांडणीच्या स्वरूपाचे मानता येतील. 'द यंग नॅशनॅलिस्ट' व 'द ट्रायम्व्हरेट : गांधी, मोतिलाल ॲण्ड जवाहरलाल' असे ते पहिल्या व दुसऱ्या क्रमांकाचे निबंध आहेत. सोळावा शेवटचा अर्थातच 'ॲन ओव्हरव्ह्यू' अशा स्वरूपाचा व शीर्षकाचा आहे.

'ओव्हरव्ह्यू'चा व ग्रंथाचाही शेवटचा परिच्छेद लेखकाचे जवाहरलालजींचे मूल्यमापन थोडक्यात एकत्रित सांगणारा आहे. नंदा लिहितात :

"Historians may differ in assessing particular policies of Nehru. They are, however, unlikely to question the soundness of his basic premises : his rejection of irrationality, social obscurantism, and fanaticism of all brands, whether racial, religious or political; his respect for the freedom and dignity of human personality; his belief in the democratic processes; his aversion to regimentation and violence; his insistence that even good ends do not justify bad means and, finally, his conviction that in the atomic age the alternative to world co-operation is world disaster." ("नेहरूंनी अंगिकारलेल्या विवक्षित धोरणांचे मूल्यांकन कोणी असे करील, कोणी तसे करील. पण त्यांची पायाभूत बैठक योग्यच होती याविषयी ते सर्व बहुधा निःशंकच असतील. अविवेकाला व कालबाह्य व अंध कर्मकांडी सामाजिक सनातनीपणाला नकार; सर्व प्रकारच्या असहिष्णू कट्टरपणाचा विरोध, मग तो वांशिक असो की धार्मिक असो की राजकीय; माणसाच्या व्यक्तित्वाची स्वायत्तता, तिचे स्वातंत्र्य व तिची प्रतिष्ठा यांविषयी आदर; लोकशाही प्रक्रियांवरील निष्ठा; कोणत्याही साचेबंद पठडीत वंदिस्त करून घेण्याविषयी व हिंसेविषयी तिटकारा; साधनशुचितेचा आग्रह; आणि, शेवटची गोष्ट म्हणजे, आजच्या अणुयुगामध्ये जगाने परस्परसहकाराचा मार्ग न अवलंबिल्यास विनाश अटळ आहे ही खात्री – त्यांची बैठक या गृहीतकृत्यांनी बनलेली होती.")

पंधरावा निबंध 'द ऑटोबायॉग्राफी' असा आहे व चौदाव्याचे शीर्षक 'नेहरू ॲज ए मॅन ऑफ लेटर्स' असे आहे. जवाहरलालजींच्या अंतर्मनात कवी, तत्त्वज्ञ, प्राध्यापक दडलेला होता व राजकारणात ते अपघाताने उतरले असा निष्कर्ष अनेकांनी काढलेला आहे, असा निर्देश करून श्री. नंदा त्यांचा स्वतःचा निष्कर्ष सांगतात. जवाहरलालजींच्या राजकीय क्षेत्रातील चिंतन आणि कृती ह्याच त्यांच्या लेखनाच्या प्रेरणा होत्या व त्या नसत्या तर ते कदाचित ग्रंथकार लेखक झालेच नसते असा त्यांचा निष्कर्ष आहे. केवळ साहित्यिक अशी जवाहरलालजींची प्रतिमा मनात आणणे अशक्य आहे. कॅनव्हासशिवाय चित्र रेखाटण्याचा तो प्रयत्न होईल.

'प्लेईंग फॉर हाय स्टेक्स' असे चौथ्या निबंधाचे शीर्षक आहे. जवाहरलालजींची अनेक बाबतीतील द्विधा मनोवृत्ती व तशा परिस्थितीत कृतींचे त्यांना घ्यावे लागलेले निर्णय याचे काहीसे सूचन यात होते. 'Something of a gambler' असे त्यांचे वर्णन (मला वाटते एका ठिकाणी स्वतः जवाहरलालजींनीही) केले आहे. परंतु

'Who dare to put to the touch
to gain or lose it all'

अशा स्वरूपाची अंतिम निर्णायक जुगार खेळण्याची त्यांची वृत्ती नव्हती. हे उदाहरणाने अधिक स्पष्ट करावयाचे म्हटले त तशी वृत्ती सुभाषबाबूंची होती. जवाहरलालजींचे विरोधक यासाठ त्यांना

अनुक्रमणिका

He either fears his fate too much
Or his deserts are small

यापैकी एका किंवा दोन्ही प्रकारच्या लोकांत त्यांचे वर्गीकरण करून मोकळे होतील. अशा स्वरूपाचा आरोप करणे श्री. नंदा यांच्या मनातही येणे शक्य नाही. परंतु 'प्लेइंग फॉर हाय स्टेक्स' हे शीर्षक थोडेसे अधिक आग्रही झाले हे कदाचित त्यांना मान्य होईल.

परंतु हे समजून घ्यावयाचे तर या ग्रंथातील इतर निबंधांकडे वळले पाहिजे.

**मनाच्या द्विधा अवस्थेच्या कात्रीत**

'To do or not to do is the question' (हॅम्लेटची क्षमा मागून) अशा परिस्थितीला जवाहरलालजींना आपल्या जीवनात अनेकदा सामोरे जावे लागले. काही वेळा कारण परिस्थिती होती तर काही वेळा कारण त्यांची मनोवृत्ती होती. यांपैकी चार संदर्भांत तर त्यांची जवळजवळ प्रतिदिनी कसोटी पाहिली जात होती. ते संदर्भ असे :

१. गांधीजींचे अनुयायित्व/भावना आणि बुद्धी
२. समाजवाद/साम्यवाद/सामाजिक न्याय
३. जातीयता, धर्मवेड व देशाचे विभाजन
४. शीतयुद्ध आणि तटस्थ राष्ट्रांचा गट.

यांपैकी 'गांधी व जवाहरलाल' याच विषयावर, या ग्रंथाच्या मानाने, विस्तृत असा तेहतीस पृष्ठांचा लेख श्री. नंदा यांनी लिहिला आहे. (नेहरू व बोस हा लेखही असाच विस्तृत आहे, परंतु त्यात घटनांच्या निर्देशापलीकडे विश्लेषण असे विशेष नाही. द्विधा वृत्तीही नाही. युद्धाच्या अखेरच्या कालखंडात काँग्रेसचा ब्रिटिशांशी समझोता झाला असता व त्याच सुमारास आझाद हिंद सेना भारतात आली असती तर –? द्विधा वृत्ती झाली असती का? कोणाची? जवाहरलालजींची? सुभाषबाबूंची? तुमची-आमची? सुदैवाने इतिहासाने हा प्रश्नच आपल्यासमोर उभा केला नाही.) 'गांधी व जवाहरलाल' हा लेख विस्तृत असला तरी याच एका विषयावर अनेक ग्रंथ होऊ शकतील अशा तोलामोलाचा तो विषय आहे. (असेच वरील इतर तीन विषयांविषयीही म्हणता येईल.) परंतु यातील भावना-बुद्धी ही टोके सांभाळावयाची तर दोन निर्देश पुरेसे व्हावेत. आयुष्याच्या अखेरीस १९४५ मध्ये गांधीजींनी आपला वारस म्हणून जवाहरलालजींशी काही धोरणात्मक पत्रव्यवहार सुरू केला होता. दुर्दैवाने तो पूर्ण होऊ शकला नाही. त्यावेळी ऑक्टोबर १९४५ मध्ये गांधीजींनी लिहिलेल्या पत्राला उत्तर म्हणून जवाहरलालजींनी लिहिले होते :

"The question before us is not one of truth versus untruth and non-violence versus violence. One assumes, as one must, that true co-operation and peaceful methods must be aimed at, and a society which encourages these must be our objective. The whole question is how to achieve this society and what its content should be. I do not understand why a village should necessarily embody truth and non-violence. A village, normally speaking, is backward intellectually and culturally and no progress can be made from a backward environment. Narrow-minded people are much more likely to be untruthful and violent...." (पृ. ५०)

("सत्य विरुद्ध असत्य किंवा अहिंसा विरुद्ध हिंसा मानून कशाची निवड करावयाची हा पेच आपणासमोर नाही. खऱ्या अर्थाचा सहकार आणि शांततामय मार्ग यांचाच अवलंब आपण केला पाहिजे, आणि ज्या समाजात यांचा परिपोष होईल अशा समाजाची उभारणी केली पाहिजे हे निःसंशयच आहे. हे ध्येय कसे साध्य करावयाचे आणि अशा समाजाचा आकृतिबंध काय असेल हे खरे कळीचे प्रश्न आहेत. सत्य व अहिंसा खेड्यातच मूर्त होतात असे का मानावयाचे ते मला समजत नाही. सामान्यतः खेडे बौद्धिक-सांस्कृतिक दृष्ट्या मागास असते आणि अशा मागास पर्यावरणाच्या आधारे समाज कोणतीच प्रगती साधू शकत नाही. कोत्या मनाची माणसे वागण्याबोलण्यात जास्त असत्यवचनी व हिंस्र राहण्याची शक्यता कितीतरी अधिक असते...")

सत्य आणि अहिंसा यांचे निरपवाद महत्त्व मान्य न करणारी ही भूमिका गांधीजींच्या भूमिकेपासून किती वेगळी आहे हे स्पष्ट करावयाचे कारण नाही. आर्थिक विकासाच्या विविध अंगांबाबतही त्या दोघांत महत्त्वाचे मतभेद होते. राजकीय संघटन आदिविषयींच्या त्यांच्या भूमिकांतही अंतर होते. स्वतंत्र भारतात गांधीजी एक दशक कार्यक्षम असते तर या मतभेदांतून शेवटी काय निष्पन्न झाले असते हे सांगणे कठीण आहे.

परंतु भावनेच्या क्षेत्रात (व कृतीच्या मार्गदर्शनाच्याही क्षेत्रात) दोघांमधील भावबंध किती बळकट होते यांचेही एक चटका लावणारे उदाहरण या ग्रंथात आहे : (पृ. ४६)

३० जानेवारी १९४८. नेहरू सांगतात : "I was sitting in my chair..... worried about Bapu's





funeral. The colossal problem that it presented baffled me. Suddenly, I said, let me go and consult Bapu." ("मी माझ्या खुर्चीत वसलो होतो... वापूंचे अंत्यसंस्कार निर्विघ्नपणे पार पाडण्याची चिंता मला होती. समस्येचे आकारमान छाती दडपून टाकणारे, संभ्रान्त करून टाकणारे होते. एका क्षणी मी स्वतःला म्हटले, 'वापूंपाशी जाऊन मला त्यांचा सल्ला घ्यायला हवा.' ")

**गांधी, जवाहरलाल व समाजवादी : प्रेमाचा त्रिकोण की प्रेमाचा गुंताडा?**

या तिघांतील परस्परसंवंधांचे (भाववंधाचे तसेच तणावाचेही) काही दर्शन 'गांधी आणि जवाहरलाल' या निवंधात होते तसेच 'नेहरू ॲण्ड सोशलिझम ॲण्ड इकॉनॉमिक प्लॅनिंग' या निवंधातही होते. 'लेटर्स टु चीफ मिनिस्टर्स' या निवंधातही याचे काही सूचन आहे. मुख्यमंत्र्यांना लिहिलेली पत्रे हा खरे तर अभ्यासाच्या दृष्टीने एक महत्त्वाचा खजिनाच आहे. सामान्यपणे ही पत्रे पाक्षिक असत. ऑक्टोवर १९४७ ते मे १९६३ या कालखंडात ती लिहिली गेली आहेत. परंतु त्यांना असलेल्या महत्त्वाच्या मानाने या निवंधात त्यांचा फारच वरवर विचार झाला आहे असे वाटल्याखेरीज राहत नाही. पृष्ठांची अटळ मर्यादा लक्षात घेतली तरी असे वाटत राहते. असो.

दलितांविषयीची आंतरिक कणव व सहिष्णुतेवर आधारित लोकशाहीवरील श्रद्धा हे या तिघांना एकत्र बांधणारे धागे होते. यामुळे अनेकदा ते समरस होत, परंतु एकात्म एकरूप मात्र कधीच झाले नाहीत. 'नेहरू आणि जयप्रकाश' असा एक निवंध या ग्रंथात हवा होता असे वर म्हटले ते याच दृष्टिकोणातून. दोघांवरही काही काळ मार्क्सवादाचा, रशियातील क्रांतीच्या पहिल्या दशकात जगाला ज्ञात होऊ दिलेल्या यशाचा प्रभाव होता. अनुभवाने व वस्तुस्थितीच्या ज्ञानाने दोघांच्याहीवरील हा प्रभाव ओसरला. परंतु समाजवादाच्या भावनात्मक, नैतिक आशयापासून हे दोघेही वाजूला सरकले नाहीत. तथापि, काही प्रयत्न करूनही, ते एकत्र काम करू शकले नाहीत. जवाहरलालजी काँग्रेस समाजवादी पक्षातही कधी नव्हते. परंतु समाजवादी त्यांच्याकडे समाजवादाच्या संदर्भात ज्येष्ठतेच्या आदरानेच पाहत असत. जवाहरलालजींना विरोध करताना लोकसभेत वॅ. नाथ पै यांनी काढलेले 'जवाहरलालजी, तुमच्यापासूनच आम्ही समाजवादाचे धडे घेतले' हे आर्त उद्गार प्रसिद्ध आहेत. Of all the words that tongue or pen can write -- the saddest are these: 'It might have been', हेच खरे. याच्या कितीतरी खोल विश्लेषणात शिरता येण्यासारखे आहे.

जवाहरलालजींची आणि भारतात सर्वांचीच कठोर कसोटी पाहणारा कालखंड पाकिस्ताननिर्मितीचा होता. क्षितिजावर काळ्या ढगाचा केवळ एक छोटासा ठिपका दिसत होता. अकस्मात आकाश भरून आले आणि वादळविजा कडाडू लागल्या असे ज्याचे वर्णन करता येईल अशी परिस्थिती निर्माण झाली. ती कोणाच्याच कावूत राहिली नाही. एकदा जयप्रकाश नारायण यांच्यावरोवर एकटाच मी असताना मी त्यांना म्हटले : "You may not answer this if you don't like but Lohia has accused that all of you proved to be cowards." जयप्रकाशजी सौजन्यपूर्वक म्हणाले : I have not read what Lohia has written but it is not true that we were cowards. We were prepared for the ultimate sacrifice but Gandhiji advised us : 'अव हाऊस divide मत करो." ("तुमची इच्छा नसेल तर तुम्ही उत्तर नका देऊ. लोहियांनी तुम्हा सर्वांवर, मोक्याच्या क्षणी तुम्ही सर्व भ्याड शावीत झालात, असा आरोप केला आहे. — लोहियांनी काय लिहिलेय ते मी वाचलेले नाही, पण आम्ही भित्रे होतो हे म्हणणे सत्याला धरून नाही. वलिदान करावयास आम्ही तयार होतो; पण गांधीजींनी आम्हाला सल्ला दिला की, 'या संकटप्रसंगी तुम्ही आता काँग्रेसचे तुकडे करू नका.' ")

'Guilty Men of Partition' (फाळणीचे गुन्हेगार) म्हणून जर गणना करावयास बसले तर वयात आलेल्या भारतातील प्रत्येक व्यक्तीची गणना करावी लागेल. या झंझावातात जवाहरलालजींना भावनेच्या व निर्णयाच्या क्षेत्रात किती तीव्र हेलकावे सहन करावे लागले असतील? या ग्रीक ट्रॅजिक हीरोच्या चित्राचे आरेखन कोण करू शकेल?

या ग्रंथात या संदर्भातील लेखनाने जवळजवळ एक-तृतीयांश भाग व्यापला आहे (पृ. ९७ ते १८४). 'नेहरू ॲण्ड रिलिजन' हा निवंध १८ पृष्ठांचा आहे. 'जवाहरलाल नेहरू ॲण्ड द पार्टिशन ऑफ इंडिया', हा लेख साठ पृष्ठांचा आहे व 'आझाद, नेहरू ॲण्ड पार्टिशन' हा लेख ११ पृष्ठांचा आहे. मौलाना आझाद यांचा *इंडिया विन्स फ्रीडम* हा ग्रंथ चुकीच्या माहितीने इतका भरला आहे की, त्या सर्वांची दुरुस्ती करावयाची तर तितकाच मोठा ग्रंथ लिहावा लागेल असा निर्देश श्री. नंदा यांनी केला आहे.

पाकिस्तानच्या निर्मितीचे विश्लेषण अनेक अंगांनी करता येते व ते तसे करण्याचा प्रयत्न श्री. नंदा यांनी केला. परंतु कालगतीचा रेटाच विलक्षण व प्रलयकारी होता हे त्यांचे निदान आहे. त्यात सत्यांशही खूपच आहे. श्री. नंदा लिहितात. "१९१७



अनुक्रमणिका

च्या राजकीय सुधारणा हस्तगत करावयास काँग्रेसला बत्तीस वर्षे चळवळ करावी लागली. त्यानंतर 'वसाहतीचे स्वराज्य' या संकल्पनेचा उच्चार करावयास बारा वर्षे जावी लागली. परंतु मुस्लीम लीगने मात्र पाकिस्तानच्या संकल्पनेचा उदय झाल्यानंतर पाकिस्ताननिर्मितीची मागणी करावयास केवळ साडेचार महिन्यांचा अवधी घेतला." त्यानंतरच्या सात वर्षांच्या कालखंडात पाकिस्ताननिर्मितीच्या दिशेने होणारी घटनाक्रमांची वाटचाल कोणीही रोखू शकले नाही. जवाहरलालजी आणि सरदार पटेल या दोघांनीही एक अटळ आपद्धर्म म्हणून तिचा स्वीकार केला. कदाचित काही अवधी मिळेल व त्या काळात जनमानस पुन्हा शांत, स्थिर होईल ही गांधीजींच्या मनातील आशा फोल ठरली आणि हा प्रश्न आपल्या अहिंसेच्या व सत्याग्रही जनआंदोलनाच्या शक्यतेच्या पलीकडे गेलेला आहे हे त्यांनाही स्वीकारावे लागले. 'अब हाऊस डिव्हाइड मत करो' या त्यांच्या उद्गारामागे या सर्व वैफल्याचे भान होते.

### जवाहरलालजींचा एकमेव स्वतंत्र ठसा

भारताचे परराष्ट्रीय धोरण ही जवाहरलालजींची एक स्वतंत्र व्यक्तिगत कारागिरी होती. भारत स्वतंत्र होण्याच्या आधीही परराष्ट्रांतील घटनांकडे त्यांचे साक्षेपी लक्ष असे व त्यांचे त्या संदर्भातील विचार गांधीजी मानत असत व काँग्रेसही मानत असे. भारत स्वतंत्र झाल्यानंतरही परराष्ट्रव्यवहार जवाहरलालजींनी आपल्याकडेच ठेवला होता व इतरांनीही ते सहजपणे स्वीकारले होते. सरदार पटेलांनीही त्यात काही हस्तक्षेप करण्याचे कधी मनात आणले नाही. (काश्मीर, हैद्राबाद, गोवा हे प्रश्न त्या अर्थाने परराष्ट्रीय नव्हेत.)

अमेरिका व रशिया या दोन विरोधी लष्करी महासत्तांच्या शीतयुद्धाच्या संघर्षात तटस्थ वृत्तीच्या राष्ट्रांची संघटना बांधण्याची कल्पना सुचणेदेखील अवघड होते, व तशी ती बांधणे हेही महादुष्कर होते. युगोस्लाव्हियाचे टिटो व इजिप्तचे नासेर यांची मदत जवाहरलालजींना झाली ही गोष्ट खरी; परंतु प्रमुख प्रेरणा जवाहरलालजींचीच होती हे सर्वांना मान्य होते. 'तुम्ही जर आमच्या बाजूने नसाल तर तुम्ही आमच्या शत्रुपक्षाचेच आहात असे समजले जाईल' अशा स्वरूपाच्या दोन्ही महासत्तांच्या दहशतवादी भूमिकेला न जुमानता ही संघटना उभी करावयाची होती. जवाहरलालजींनी ती उभी केली, तिचे एक स्वतंत्र स्थान निर्माण केले व जागतिक पातळीवर तिला एक प्रकारची मान्यताही मिळवून दिली. वैचारिक पातळीवर या संकल्पनेला विरोध करणारे लोक होते. व्यावहारिक पातळीवर तर महासत्तांच्या प्रसंगानुरूप निर्माण होणाऱ्या नाराजीचे परिणामही तटस्थ राष्ट्रांना भोगावे लागत. जवाहरलालजी हे प्रमुख नेते व भारत हे प्रमुख राष्ट्र असल्यामुळे भारताला तर ते विशेषच भोगावे लागले. 'With firmness in the right as God grants us to see the right' ही आपली भूमिका जवाहरलालजींनी आंतरराष्ट्रीय राजकारणात पार पाडण्याचा प्रयत्न केला. नेहमीच तो तितका यशस्वी झाला असे नाही. काही वेळा पक्षपातीपणाचे आक्षेपही आले (उदाहरणार्थ हंगेरी). परंतु सामान्यपणे भारताची भूमिका न्यायनीतीवर आधारित अशीच राहिली. जगातील शांततावादी सत्प्रवृत्त लोकांच्या मनावर भारताच्या प्रतिमेचा ठसाही तसाच उमटला. १९५९ मध्ये बर्ट्रंड रसेल यांनी काढलेले उद्गार या ग्रंथात उद्धृत केले आहेत, "In this critical moment of human history it would be Nehru who would lead us from the dark night of fear into a happier day." ("मानवजातीच्या इतिहासातील या कठीण समयी भयाकुलतेच्या अंधाऱ्या रात्रीच्या बोगद्यामधून प्रकाशमान दिवसात घेऊन जाण्याचे काम एक नेहरूच करतील." पृ. २४९) असे ते उद्गार आहेत. याहून अधिक मोठे कोणते प्रशस्तिपत्र असू शकते?

### अन्ततः

२६ मे च्या मध्यरात्री मृत्युपूर्वी जवाहरलालजींनी, आपल्या सचिवाला उद्देशून काढलेले अखेरचे उद्गार, "I have finished all the papers' ("कामकाजाचे सर्व कागदपत्र पाहून त्यांच्या संदर्भात करावयाची सर्व कारवाई पूर्ण केली आहे.") असे होते.

आपल्याला शक्य होते ते सर्व आपण शक्तिसर्वस्वाने केले एवढाच त्या उद्गारांचा आशय होता. भारताच्या दृष्टीने तर 'अनफिनिश्ड अजेंडा' पुष्कळच राहिला. राष्ट्रपुरुष कितीही मोठा असला तरी राष्ट्राचे सर्व प्रश्न तो कधीच सोडवू शकत नसतो. जवाहरलालजींचेही तसेच झाले यात नवल नाही व त्यात त्यांची उणीवही नाही.

जवाहरलालजींचे विस्तृत चरित्र श्री. नंदा कधीकाळी लिहितील तेव्हा त्यांना प्रथमदर्शनी पृष्ठासाठी 'The world is a hard place for an idealist' हे जवाहरलालजींचे उद्गार (पृ. २४२) कदाचित उचित वाटतील.





प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञान (१०)

# डेमॉक्रायटस

मे.पुं. रेगे

डेमॉक्रायटसचा जन्म उत्तर ग्रीसमध्ये ॲब्डेरा या नगरात झाला. सॉक्रेटिसपूर्व तत्त्ववेत्त्यांतील हा सर्वात अधिक बहुप्रसव होता आणि अखेरीस त्यांच्यामध्ये तोच अधिक प्रभावशील ठरला; त्याचा परमाणुवाद ही एका दृष्टिकोणातून पाहता प्रारंभीच्या ग्रीक तात्त्विक विचारांची परिणती होती असे मानता येईल. प्लेटोने त्याच्या नावाचा निर्देश केलेला नाही ही उल्लेखनीय गोष्ट ठरेल. तथापि ॲरिस्टॉटल त्याची महती मान्य करतो आणि एपिक्युरसने ख्रि.पू. ४ थ्या शतकात त्याच्या मूलभूत संकल्पनांचा स्वीकार करून त्यांचा विकास केला आहे. डेमॉक्रायटसचे कोणतेच लिखाण जसेच्या तसे उपलब्ध नाही आणि जे खंड उपलब्ध आहेत त्यांतील फारच थोडे त्याच्या विचाराचा जो भाग मध्यवर्ती आणि सर्वांत महत्त्वाचा आहे असे आपण मानू त्याच्याविषयीचे आहेत. पण एपिक्युरसचे बरेच लिखाण टिकून राहिले आहे आणि म्हणून एपिक्युरिअन मताच्या द्वारा पाश्चात्त्य विज्ञान आणि तत्त्वज्ञान यांच्यावर डेमॉक्रायटसचा चिरस्थायी परिणाम झाला आहे.

त्याच्या जीवनाविषयी फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. त्याने इजिप्त, इराण आणि तांवड्या समुद्राजवळील प्रदेश येथे प्रवास केला होता असे सांगण्यात येते. ल्युकिपस, अनॅक्झॅगोरस आणि फिलोलॉस ह्यांच्याकडे तो शिकला असे मानण्यात येते. त्याच्या एका खंडात - पण ह्या खंडाचा अस्सलपणा विवाद्य आहे – त्याने असे म्हटले आहे :

**मी अथेन्सला आलो; पण कुणी मला ओळखले नाही.**

(डायोजीनीस लेर्शिअस, *लाइव्ह्ज ऑफ धी फिलॉसॉफर्स*, १ x ३६ = ६८ a ११६)

त्याने स्वतःच आपल्या *धी लिटल् वर्ल्ड-ऑर्डरिंग* ('लघु विश्वव्यवस्था') मध्ये म्हटले आहे त्याप्रमाणे त्याच्या जीवनकालाविषयी जी माहिती मिळते ती अशी की, जेव्हा अनॅक्झॅगोरस वृद्ध होता तेव्हा तो तरुण होता; त्याच्याहून तो चाळीस वर्षांनी तरुण होता. आपले *धी लिटल् वर्ल्ड-ऑर्डरिंग* हे ट्रॉयचा पाडाव झाल्यानंतर ७५० वर्षांनी रचले गेले असे त्याने म्हटले आहे. तेव्हा, आपल्या*क्रॉनिकल्स*मध्ये (बखरीमध्ये) अपोलोडोरस म्हणतो त्याप्रमाणे, तो ऐंशीव्या ऑलिम्पिअडच्या वेळी (ख्रि.पू. ४६०-४५७) जन्मला किंवा थ्रॅसिलस आपल्या *प्रोलिगॉमीना टु धी रीडिंग ऑफ धी बुक्स ऑफ डेमॉक्रायटस* - 'डेमॉक्रायटसच्या ग्रंथांच्या वाचनाचे प्रास्ताविक' – ह्या ग्रंथात म्हणतो त्याप्रमाणे तो ७७ व्या ऑलिम्पिआडच्या तिसऱ्या वर्षी (ख्रि.पू. ४७०/४६९) जन्मला. तो सॉक्रेटिसहून एका वर्षाने मोठा होता, असे तो म्हणतो. तेव्हा अनॅक्झॅगोरसचा शिष्य आर्कीलॉस ह्याचा आणि ओनोपायडीस ह्यांचा तो समकालीन होता. (ओनोपायडीसचा त्याने निर्देश केला आहे.) पार्मिनायडीस आणि झीनो, जे 'एकमेव सत्' (धी वन्) मानीत होते त्या संदर्भात, हे दोघे त्या काळी विशेष विख्यात होते ह्याचा तो निर्देश करतो. तसेच ॲब्डेराच्या प्रोटॅगोरसचाही तो निर्देश करतो. प्रोटॅगोरस सॉक्रेटिसचा समकालीन होता ही मान्य गोष्ट आहे. (कित्ता IX ४१)

डायोजीनिस लेर्शिअसने डेमॉक्रायटसच्या ग्रंथांची जी यादी सुरक्षित राखली आहे तिच्यावरून त्याच्या बहुप्रसवतेची आणि किती विविध विषयांत त्याला रस होता ह्याची कल्पना येते.

थ्रॅसिलसने प्लेटोच्या ग्रंथांच्या बाबतीत केले त्याच रीतीने त्याच्या (डेमॉक्रायटसच्या) पुस्तकांची यादी केली आणि चार चार ग्रंथ एकत्रित करून त्यांची व्यवस्था लावली. त्याचे नीतिशास्त्रविषयक ग्रंथ असे आहेत :

*पायथॅगोरस*, *शहाण्या माणसाच्या प्रवृत्तीविषयी*, *पाताललोकातील गोष्टींविषयी*, *ट्रिटोजीनिया* (सर्व मानवी व्यवहारांची धारणा करणाऱ्या तीन गोष्टी हिच्यापासून येतात म्हणून हिला असे संबोधितात – ट्रिटो म्ह. तीन), पौरुषाविषयी किंवा सद्गुणा-







अनुक्रमणिका

*विषयी*, *ॲमल्थयाची शिंगे*, *संतोषाविषयी*, *नैतिक भाष्ये* ('सुस्थितीविषयी' - हे पुस्तक लुप्त आहे).

हे त्याचे नीतिविषयक ग्रंथ आहेत. निसर्गविज्ञान-विषयीचे त्याचे ग्रंथ असे : *बृहद् विश्वव्यवस्था* (हे ल्युकिपसने लिहिले आहे असे थिओफ्रॅस्टसने म्हटले आहे), *लघु विश्वव्यवस्था*, *विश्ववर्णन*, *ग्रहांविषयी*, *निसर्गाविषयी* (एक अध्याय), *माणसाच्या प्रकृतीविषयी* किंवा *मांसाविषयी* (दोन अध्याय), *मनाविषयी*, *ज्ञानेन्द्रियांविषयी*, (काहीजण ही दोन्ही एकत्र करून *आत्म्याविषयी* असे त्याला शीर्षक देतात), *स्वादांविषयी*, *रंगांविषयी*, *भिन्न आकारांविषयी*, *वदलत्या आकाराविषयी*, *टेकवाविषयी* (ऑन बट्रेसिस – हा ग्रंथ पूर्वीच्या ग्रंथांचे समर्थन करतो), *प्रतिमांविषयी किंवा भर्त्याविषयी* (ऑन् प्रॉव्हिडन्स), *तर्कशास्त्राविषयी किंवा नियमाविषयी* (तीन अध्याय) हे निसर्गाविषयीचे ग्रंथ आहेत. (ह्या यादीत समाविष्ट न झालेले ग्रंथ पुढीलप्रमाणे आहेत : *अंतरिक्षातील कारणे*, *वातावरणातील कारणे*, *पृथ्वीवरील कारणे*, *अग्नीसंबंधीची कारणे* आणि *अग्नीतील वस्तू*, *ध्वनीशी संबंधित असलेली कारणे*, *बीजे*, *वनस्पती आणि फळे यांच्याशी संबंधित असलेली कारणे*, *प्राण्यांशी संबंधित कारणे* (तीन अध्याय), *संकीर्ण कारणे*, *लोहचुंबकाविषयी* हे समाविष्ट न झालेले ग्रंथ होत.)

गणितविषयक ग्रंथ असे : *भिन्न कोन किंवा वर्तुळे व गोल* (स्फिअर) *ह्यांच्या संयोगाविषयी*, *भूमितीविषयी*, *भूमिती*, *संख्या*, *अपरिमेय* (इर्रॅशनल) *रेषा आणि घन ह्यांच्याविषयी* (दोन अध्याय), *नभतलदर्शक* (प्लॅनिस्फिअर्स), *महान् वर्षाविषयी किंवा खगोलशास्त्र – एक पंचांग*, *जलकालमापकांची स्पर्धा*, *अंतरीक्षाचे वर्णन*, *भूगोल*, *ध्रुवांचे वर्णन*, *प्रकाशकिरणांचे वर्णन*.

साहित्यिक पुस्तके पुढीलप्रमाणे : *ताल आणि स्वरमेळ ह्याविषयी*, *काव्याविषयी*, *पद्यपंक्तींच्या सौंदर्याविषयी*, *मृदू आणि कर्कश वर्णांविषयी*, *होमरविषयी किंवा शुद्ध भाषा आणि अर्थबोधक टिपणी*, *गीतांविषयी*, *क्रियापदांविषयी*, *नामे*.

त्याचे साहित्यिक ग्रंथ असे आहेत; तांत्रिक ग्रंथ पुढे दिल्याप्रमाणे : *भविष्यज्ञान*, *आहार आणि आहारशास्त्र*, *वैधकीय निर्णय*, *उचित आणि अनुचित प्रसंगांशी संबंधित कारणांविषयी*, *शेतीविषयी किंवा शेती*, *चित्रणाविषयी*, *लढण्याचे डावपेच* आणि *चिलखत घालून केलेली लढाई* ही अशी आहेत.

काहीजण भाष्यांवरून पुढील ग्रंथांचा वेगळा निर्देश करतात : *बॅबिलोनमधील पवित्र लिखाण*, *महासागराचे परिभ्रमण*, *इतिहासाविषयी*, *खाल्डिअन वृत्तान्त*, *फ्रिजिअन वृत्तांत*, *ताप आणि खोकल्याचे आजार ह्याविषयी*, *कायद्यांच्या समस्या*, *कृत्रिम वस्तू किंवा समस्या*. काहीजण त्याला आणखी काही पुस्तकांचे श्रेय देतात पण ही एकतर त्याच्या ग्रंथांतील संकलने आहेत किंवा ती इतरांनी लिहिली आहेत हे मान्य झाले आहे.

(डायोजीनीस लेर्शिअस, *लाइव्ह्ज ऑफ धी फिलॉसॉफर्स*, IX ४५-४९)

ह्या प्रकरणाचा उरलेला भाग चार उपभागांत विभागण्यात आला आहे. पहिल्या भागात डेमॉक्रायटसच्या परमाणुवादाचे वर्णन येते. ह्यात जे वेचे आले आहेत त्यातील कोणताही स्वतः डेमॉक्रायटसच्या खंडांतून घेतलेला नाही. ह्यानंतर ज्ञान आणि संशयवाद ह्याविषयी डेमॉक्रायटसची मते नमूद करणारे वेचे येतात. नंतर डेमॉक्रायटसच्या वैज्ञानिक आणि साहित्यिक संशोधना-विषयीचा विभाग येतो. शेवटचा सर्वांत दीर्घ विभाग डेमॉक्रायटसच्या नैतिक विचारांविषयीचा आहे. ह्या चार उपभागांची तौलनिक लांबी किती सामग्री अवशिष्ट आहे ह्यावर अवलंबून आहे. डेमॉक्रायटसच्या विचारांचे जे भिन्न पैलू आहेत त्यांना तो स्वतः किती महत्त्व देत होता – किंवा आपण किती देतो – ह्याच्याशी ती संबंधित नाही.

**१ परमाणुवाद**

परमाणुवाद हा डेमॉक्रायटसचा जो सर्वांत प्रसिद्ध सिद्धान्त आहे त्याच्या बाबतीत आपल्याला इतरांनी केलेल्या निवेदनावर अवलंबून राहावे लागते.

परमाणूंवर परिणाम होत नसल्यामुळे जर तेच परमाणू टिकून राहत असले तर जगे नष्ट होत नाहीत तर त्यांचे रूपांतर होत असते असे (डेमॉक्रायटसचे अनुयायीही) म्हणतील हे उघड आहे – एम्पिडोक्लिस आणि हेरॅक्लायटस यांचेही मत असेच होते असे दिसते. ह्या (तत्त्ववेत्त्यांचे) मत काय होते हे 'डेमॉक्रायटसविषयी' ह्या ॲरिस्टॉटलच्या ग्रंथातील उताऱ्यावरून दिसून येईल.

"नित्य वस्तूंचे स्वरूप लघु द्रव्यांचे बनलेले असते असे डेमॉक्रायटस मानतो. ही (द्रव्ये) संख्येने अनंत असतात आणि त्यांच्यासाठी त्यांच्याहून भिन्न असलेल्या आणि विस्ताराने अनंत असलेल्या स्थानाची स्थापना तो करतो. ह्या स्थानाला 'रिक्त' (व्हॉइड), शून्य (नथिंग) आणि अनंत ह्या नावांनी तो संबोधितो आणि प्रत्येक द्रव्याला तो वस्तू, घन आणि सत् (बिइंग) असे







अनुक्रमणिका

म्हणतो. तो असे मानतो की, ही द्रव्ये इतकी लहान असतात की, आपल्या इंद्रियांना त्यांचे आकलन होत नाही आणि त्यांची सर्व प्रकारची रूपे (फॉर्म्स), सर्व प्रकारचे आकार (शेप्स) असतात आणि त्यांच्या परिमाणांत सर्व प्रकारचे फरक असतात. त्यांच्यापासून आदितत्त्वांप्रमाणे दृश्य आणि इंद्रियगम्य वस्तूंची उत्पत्ती आणि संयोग तो घडवून आणू शकला. त्यांच्यामधील ज्या वैषम्यांचा आणि भेदांचा आपण निर्देश केला आहे त्यांच्यामुळे हे परमाणू एकमेकांशी वांधले जातात. त्यांना बांधणाऱ्या ह्या वंधामुळे ते एकमेकांशी झगडतात आणि रिक्तामध्ये इतस्ततः नेले जातात. आणि असे नेले जात असताना ते एकमेकांवर आदळतात आणि एकमेकांना स्पर्श करतात आणि सलगपणे राहतात. पण हे वंध खरोखरी एक असलेली अशी कोणतीही वेगळी प्रकृती त्यांच्यापासून निर्माण करू शकत नाही; कारण दोन किंवा अधिक वस्तू कधीतरी एक बनू शकतील असे मानणे आचरट आहे. ह्या वस्तू एकत्र कशा राहतात ह्याचे स्पष्टीकरण ज्या प्रकारे त्या एकमेकांत अडकतात आणि एकमेकांना पकडून ठेवतात त्यांच्या साहाय्याने तो करतो; कारण त्यांतील काही वस्तू खडबडीत असतात, काहींना आकडे (हूक्स) असतात, काही अंतर्वक्र तर काही बहिर्वक्र असतात. आणि इतरांत असे असंख्य भेद असतात. तेव्हा तो असे मानतो की, ह्या वस्तूंच्या परिसरातून कोणतीतरी अधिक बलवान शक्ती येऊन, त्यांच्यावर आघात करून, त्यांना गदागदा हलवून विखरून टाकीपर्यंत त्या एकमेकींना पकडून ठेवतात आणि एकत्र राहतात. तो केवळ प्राण्यांच्याच संबंधात नव्हे तर वनस्पती आणि (सबंध) जगे यांच्या संबंधातही – आणि सामान्यपणे सर्व इंद्रियगोचर वस्तूंच्या संबंधात – त्यांचे जनन होते आणि ह्याच्या विरोधी असलेले विसर्जन होते असे म्हणतो." (ॲरिस्टॉटल : *फ्रॅग्मेन्टस*, २०८)

(सिम्प्लिसिअस : *कॉमेन्टरी ऑन धी हेवन्स* – २९४.३० – २९५.२२)

ॲरिस्टॉटलचा डेमॉक्रायटसवरील प्रबंध लुप्त आहे. त्यातील ह्या उताऱ्याला पूरक म्हणून त्याच्या उपलब्ध असलेल्या *मेटॅफिजिक्स* मधील पुढील उतारा जोडता येईल :

ल्युकिपस आणि त्याचा सहकारी डेमॉक्रायटस असे म्हणतात की, भरीव (फुल) आणि रिक्त (व्हाइड) ही मूलतत्त्वे आहेत; एकाला ते सत् म्हणतात व दुसऱ्याला असत्. ह्यातील भरीव व घन हे सत् आहे आणि रिक्त हे असत् आहे. (सत् हे असत्‌शी तुलना करता अस्तित्वात असते असे नाही असे ते जे म्हणतात ते ह्यामुळे – कारण घनाशी तुलना करता रिक्त अस्तित्वात असते असे नाही.) आणि ही अस्तित्वात असलेल्या वस्तूंची उपादान कारणे (मटीरिअल कॉज) होत. आणि अधिष्ठानभूत असलेले द्रव्य एकच आहे असे जे मानतात ते ज्याप्रमाणे त्याच्या धर्मापासून वस्तूंची उत्पत्ती होते असे मानतात – (द्रव्य विरळ असेल किंवा सान्द्र असेल त्याप्रमाणे हे धर्म निष्पन्न होतात असे मानतात) – त्याप्रमाणे हे तत्त्ववेत्तेही (परमाणूंमधील भेद हे) इतर वस्तूंची कारणे असतात असे मानतात. हे भेद संख्येने तीन आहेत असे ते म्हणतात – आकार, क्रम आणि स्थिती. कारण ते असे म्हणतात की, वस्तू फक्त 'ताल', 'संयोग' आणि 'प्रकार' ह्या बाबतीत भिन्न असतात – येथे ताल म्हणजे आकार, संयोग म्हणजे क्रम आणि प्रकार म्हणजे स्थिती. 'A' हे अक्षर 'N' ह्या अक्षराहून आकाराने भिन्न आहे; 'AN' हे 'NA' पासून क्रमामुळे भिन्न आहे; आणि 'N' हे 'Z' पासून स्थितीमुळे भिन्न आहे. गती घेतली तर (अस्तित्वात असलेल्या वस्तूंना ती कशापासून आणि कशी प्राप्त होते ह्या बाबतीत) इतरांप्रमाणे त्यांनीही हेळसांड करून ह्या प्रश्नाची चौकशी केली नाही.

(ॲरिस्टॉटल, *मेटॅफिजिक्स*, ९८५ b ४-२०)

ॲरिस्टॉटलचे शेवटचे विधान सिम्प्लिसिअसमध्ये प्रतिध्वनित झाले आहे.

डेमॉक्रायटससुद्धा, जेव्हा तो असे म्हणतो की, सर्व प्रकारच्या आकारांची (फॉर्म्स) एक वावटळ पूर्णापासून वेगळी सरते (B १६७), पण हे कसे, कोणत्या कारणामुळे घडते हे सांगत नाही, तेव्हा तोही ह्याची उत्पत्ती उत्स्फूर्तपणे आणि यदृच्छेने घडते असे मानताना दिसतो.

(सिम्प्लिसिअस : *कॉमेन्टरी ऑन धी फिजिक्स*, ३२७.२३-२६)

ह्याच भाष्यात दार्शनिक सिद्धान्तांचे विवरण करणारा जो भाग आहे त्याच्या आधारे, ॲरिस्टॉटलपासून आपल्याला जी माहिती मिळते तिच्यात किंचित् भर टाकता येते.

ह्याच प्रकारे (ल्युकिपसचा) सहचारी, ॲब्डेराचा डेमॉक्रायटस ह्याने भरीव आणि रिक्त अशा आदितत्त्वांची स्थापना केली : एकाला तो सत् म्हणतो आणि दुसऱ्याला असत्; कारण अस्तित्वात असलेल्या वस्तूंचे द्रव्य (मॅटर) म्हणून तो परमाणूंची स्थापना करतो आणि त्यांच्यामधील भेदांपासून इतर सर्व गोष्टींची उत्पत्ती तो घडवून आणतो. हे तीन आहेत. ताल, संयोग आणि प्रकार; म्हणजे आकार, स्थिती आणि क्रम. कारण जे सदृश आहे ते स्वभावतः सदृशापासून गतिमान होते आणि एकाच प्रकारच्या वस्तू एकमेकींकडे नेल्या जातात, आणि प्रत्येक प्रकारच्या आकाराची

जेव्हा वेगवेगळ्या संयुक्तांत रचना होते तेव्हा भिन्न स्थिती निर्माण होते. अशा प्रकारे आदितत्त्वे अनंत असल्यामुळे, सर्व प्रकारचे गुणधर्म आणि द्रव्ये, ही कशी आणि कोणत्या कारणांमुळे अस्तित्वात येतात ह्याचे विवरण करण्याचे काम त्यांनी सयुक्तिकपणे स्वीकारले. ह्यामुळे असे म्हटले जाते की, आदितत्त्वे अनंत आहेत असे जे मानतात तेच वस्तुजाताचे सयुक्तिक विवरण करू शकतात. आणि ते असे म्हणतात की, परमाणूच्या आकारांची संख्या अनंत असते कारण ते असेच असावेत, तसे असू नयेत ह्याला काही कारण असत नाही. अनंतत्वाचे हे स्पष्टीकरण त्यांनी स्वतःच दिलेले आहे. (कित्ता : २८.१५-२७)

'सदृश हे सदृशामुळे गतिमान होते' ह्या डेमॉक्रायटसच्या कल्पनेचे एक उदाहरण खालील उतार्‍यात आढळते:

मी अगोदरच म्हटल्याप्रमाणे, निसर्ग-वैज्ञानिकांनी स्वीकारलेले एक प्राचीन मत असे आहे की, जे सदृश आहे ते सदृशाला ओळखते. डेमॉक्रायटसने ह्या मताला पुष्टी देणारा पुरावा पुढे केला आहे आणि प्लेटोने आपल्या *टायमीअस* मध्ये त्याला स्पर्श केला आहे असे मानण्यात येते. डेमॉक्रायटसने आपला युक्तिवाद सजीव आणि निर्जीव अशा दोन्ही पदार्थांवर आधारला आहे. कारण, तो म्हणतो, प्राणी आपल्याच प्रकारच्या प्राण्यांसोबत गोळा होतात – कबुतरे कबुतरांसोबत, वगळे वगळ्यांसोबत आणि इतर अप्रबुद्ध प्राण्यांच्या बाबतीतही असेच असते. निर्जीव पदार्थांच्या बाबतीतही असेच असते हे जेव्हा बिया चाळल्या जातात तेव्हा त्यांच्यावरून किंवा समुद्रकिनार्‍यांवरील गोट्यांवरून आपल्याला दिसू शकते. कारण (पहिल्या उदाहरणात) चाळण फिरवली असता ज्वारी ज्वारीबरोबर, बार्ली बार्लीबरोबर आणि गहू गव्हाबरोबर वेगवेगळे होतात आणि दुसर्‍या उदाहरणात, लाटांच्या गतीने लंबवर्तुळ आकाराचे गोटे लंबवर्तुळ आकाराच्या गोट्यांसोबत एका ठिकाणी आणून सोडले जातात, आणि वाटोळे गोटे वाटोळ्या गोट्यांसोबत; जणूकाय वस्तूंमधील सादृश्यामध्ये त्यांना एकत्र गोळा करणारी कोणतीतरी शक्ती अंतर्भूत असते. (B 164) हे डेमॉक्रायटसचे मत आहे.

(सेक्स्टस इम्पिरिकस : *अगेन्स्ट धी मॅथेमॅटिशिअन्स*, VII ११६-११८)

जग हे परमाणू आणि रिक्त यांचे बनलेले आहे असे डेमॉक्रायटस का मानीत होता हे आतापर्यंत उद्धृत केलेले उतारे स्पष्ट करीत नाहीत. ॲरिस्टॉटलचा पुढे दिलेला उतारा डेमॉक्रायटसच्या स्वतःच्या प्रत्यक्ष युक्तिवादांची मांडणी करण्याचा दावा करीत नाही; पण त्यात डेमॉक्रायटसमध्ये आढळणारी सामग्री काही फेरबदल करून मांडण्यात आली आहे असे सर्वसाधारणपणे मानण्यात येते :

डेमॉक्रायटसचे मत काही सयुक्तिक आणि वैज्ञानिक युक्तिवादांवर आधारलेले होते असे दिसते. मला काय म्हणायचे आहे हे पुढे जाताजाता स्पष्ट होईल. एखादी वस्तू किंवा परिमाण असे असते की, तिचे सर्वत्र विभाजन करता येते आणि असे विभाजन करता येते असे मानण्यात अडचण नाही. कारण अशा विभाजनापासून निसटेल असे काय असेल? जर ती सर्वत्र विभाज्य असेल आणि असे विभाजन शक्य असेल तर, जरी ही सर्व विभाजने एकाच काळी झालेली नसली तरी, कोणत्यातरी एका काळी ती अशी विभाजित असेल; आणि असे घडले असेल तर काही अशक्य घडले असे झालेले नसेल. तेव्हा आपल्या स्वरूपाला अनुसरून जर ती सर्वत्र विभाज्य असेल तर तिचे असे विभाजन झालेले असले – मग हे विभाजन एकामागून एक येणाऱ्या मध्यबिंदूंशी झालेले असो किंवा अन्य पद्धतीने झालेले असो – तर त्याने अशक्य काही घडले असे होणार नाही. (कारण पाहा की, जर हजार वेळा तिचे विभाजन करून तिचे हजार भाग केले आहेत असे मानले तर, जरी प्रत्यक्षात असे भाग कुणी करणार नाही तरी, काही अशक्य घडले आहे असे होणार नाही.)

आता जर ही वस्तू सर्वत्र विभाज्य असेल तर, समजा, की तिचे असे विभाजन झाले आहे. मग काय उरेल? काही परिमाण (मॅग्निट्यूड)? हे शक्य नाही. कारण मग ज्याचे विभाजन झालेले नाही असे काही असेल. पण ती वस्तू सर्व विभाज्य आहे असे आपण मानले होते. पण जर काही वस्तू किंवा परिमाण उरत नसेल आणि जर असे विभाजन घडून येणार असेल तर ती बिंदूंची बनलेली असणार आणि तिच्या घटकांना परिमाण असणार नाही किंवा तिचे घटक म्हणजे (काहीच नसणार) शून्य असणार, म्हणजे ती शून्यांपासून निष्पन्न होत असणार, शून्यांची बनलेली असणार आणि ती सबंध वस्तू म्हणजे काहीच नसून (केवळ) आभास असणार.

त्याचप्रमाणे, जर ती बिंदूंची बनलेली असेल तर तिला परिमाण असणार नाही. कारण जेव्हा बिंदूंचा एकमेकांशी संयोग होता, त्यांचे मिळून एक परिमाण (मॅग्निट्यूड) बनले होते आणि ते एकत्र होते तेव्हा त्यांच्यामुळे (तो) सबंध अजिबात अधिक मोठा होत नसे. कारण त्याचे दोन किंवा अधिक भागांत विभाजन झाले तर तो सबंध अगोदर होता त्याहून अधिक लहान किंवा मोठा असत नाही; ह्यामुळे जरी सर्व बिंदू एकत्रित केले तरी त्यांचे मिळून कोणतेही परिमाण होणार नाही.






जेव्हा एखाद्या वस्तूचे विभाजन होत असते तेव्हा काही भुसा निर्माण झाल्यासारखे होत असेल आणि म्हणून (मूळच्या) परिमाणातून काही वस्तू निसटते असे असेल तरी (तिलाही) तोच युक्तिवाद लागू पडतो. ही वस्तू कशी विभाज्य असेल?

कदाचित् असे असेल की जी निसटते ती वस्तू नसते तर कोणतेतरी वेगळे होऊ शकणारे रूप (फॉर्म) किंवा धर्म (प्रॉपर्टी) असतो आणि परिमाण म्हणजे ह्या धर्माशी ज्यांचा संपर्क (कॉन्टॅक्ट) असतो असे विंदू असतात. पण परिमाण हे जी परिमाणे नसतात त्यांचे वनलेले असते असे मानणे विपरित (ॲव्सर्ड) आहे.

तसेच, हे विंदू कुठे असतील आणि ते गतिहीन असतात की गतिमान असतात?

एक संपर्क (कॉन्टॅक्ट) घेतला तर त्याच्यात दोन गोष्टी नेहमीच अंतर्भूत असतात; ह्यामुळे तो संपर्क, विभाजन आणि विंदू याहून भिन्न असे काहीतरी असते.

कोणत्याही आकारमानाची वस्तू सर्वत्र विभाज्य असते अशी भूमिका स्वीकारली तर ह्या सर्व गोष्टी निष्पन्न होतात.

तसेच एखाद्या ओंडक्याचे किंवा कशाचे तरी मी भाग पाडले आणि ते जुळविले तर तेवढ्याच आकारमानाचा फिरून एकक होतो. कोणत्याही विंदूपाशी मी तो ओंडका कापला तरी असेच होते. तेव्हा शक्यतेची कोटी घेतली तर त्याचे सर्वत्र विभाजन झालेलेच आहे. मग ह्या विभाजनाहून अन्य काय असते? जरी त्याच्या अंगी काही धर्म असले तरी वस्तूचे त्यांच्यात विसर्जन कसे होते आणि त्यांच्यापासून तिची निर्मिती कशी होते? ते (तिच्यापासून) वेगळे कसे होतात? तेव्हा परिमाणे संपर्कांची किंवा विंदूंची बनली असणे अशक्य आहे; अविभाज्य विंदू आणि परिमाणे ही अनिवार्यतेने अस्तित्वात असतात.

(ॲरिस्टॉटल, *ऑन जनरेशन ॲण्ड करप्शन*, ३१६ a १३-b १६)

### २ ज्ञान

डेमॉक्रायटसचा परमाणुवाद म्हणजे ज्या चौकटीत जगाच्या स्वरूपाचे आकलन करण्याचा प्रयत्न त्याने केला ती चौकट होती. ह्या बरोबरच ह्या उपपत्तीत एक दृढ संशयवाद अभिप्रेत असल्यासारखा होता. एपिक्युरसचा शिष्य कोलोटिस ह्याने डेमॉक्रायटसविरुद्ध केलेले दोन आक्षेप प्लूटार्कने नमूद केले आहेत आणि त्यांच्यावर टीकाही केली आहे. हे उतारे ह्या विषयाच्या संदर्भात सर्वात उपयुक्त ठरतील.

(डेमॉक्रायटस) असे म्हणतो की, प्रत्येक वस्तू अशी अशी असण्याऐवजी तशी तशी असते असे काही नसते आणि असे म्हणून तो सर्व जीवनच गोंधळात टाकतो हा (कोलोटिसने) घेतलेला पहिला आक्षेप. पण प्रत्येक वस्तू अशी अशी असण्याऐवजी तशी तशी असते असे नसते असे डेमॉक्रायटस म्हणत तर नाहीच. उलट, त्याने प्रोटॅगोरस ह्या सोफिस्टावर नेमके हे म्हणण्यावद्दल टीका केली आहे आणि त्याच्याविरुद्ध वरेच समर्पक युक्तिवाद मांडले आहेत. कोलोटिसचा ह्या लिखाणाशी यत्किंचितही परिचय नसल्यामुळे डेमॉक्रायटसच्या शब्दांविषयी त्याचा गैरसमज झाला आहे. शून्याच्या तुलनेने पाहता (शून्य अस्तित्वात नसते, पण) वस्तू अस्तित्वात असतात असे नसते. असे तत्त्व जेव्हा तो मांडतो तेव्हा 'वस्तू' म्हणजे जडपदार्थ (वॉडी) आणि शून्य म्हणजे रिक्त असे त्याला अभिप्रेत असते; शून्यालासुद्धा स्वतःचे स्वरूप आणि अस्तित्व असते असे त्याला सुचवायचे असते.

(प्लुटार्क, *अगेन्स्ट कोलोटीस*, ११०८F-११०९A)

आपल्या आक्षेपांनी आपण डेमॉक्रायटसबरोवर एपिक्युरस-लाही जीवनातून हद्दपार करीत आहोत ही गोष्ट कोलोटिस लक्षात घेत नाही. त्याच्या दुसऱ्या आक्षेपाच्या वावतीत हे अधिकच खरे आहे. डेमॉक्रायटसचा जो दावा आहे की, संकेताने रंग असतात, संकेताने गोड असते आणि संकेताने संयुक्त (कॉम्पाउण्ड्स) असतात, इ., पण वस्तुतः रिक्त आणि परमाणू असतात – हा दावा म्हणजे ज्ञानेन्द्रियांवरील हल्ला आहे असे तो म्हणतो आणि पुढे त्याचे मत असे आहे की, जो कुणी ह्या युक्तिवादाला चिकटून राहतो आणि त्याचा वापर करतो तो आपण स्वतः एक माणूस आहोत आणि जिवंत आहोत असा विचारही करू शकणार नाही.

पण डेमॉक्रायटस काय म्हणतो आहे? अविभाज्य आणि अविनाशी, निर्गुण आणि अविकार्य अशी संख्येने अनंत असलेली अशी द्रव्ये रिक्तामध्ये इतस्ततः विखुरलेली असतात. जेव्हा ती एकमेकांजवळ येतात किंवा त्यांची टक्कर होते, ती एकमेकात अडकतात तेव्हा हे समूह पाणी किंवा अग्नी किंवा वनस्पती किंवा माणसे म्हणून भासतात पण वस्तुतः ह्या सर्व गोष्टी म्हणजे ज्यांना तो अदृश्य रूपे (फॉर्म्स) म्हणतो केवळ त्या असतात, अन्य काही नसतात. कारण जे अस्तित्वात नाही त्याच्यापासून काही उत्पत्ती होत नाही; उलट, ज्या गोष्टी अस्तित्वात आहेत त्यांच्यापासून काही उत्पन्न होत नाही. कारण असे की, त्यांच्या काठिन्यामुळे परमाणूंचा विकार होत नाही किंवा ते बदलत नाहीत. ह्यामुळे ज्या गोष्टी रंगहीन आहेत त्यांच्यापासून रंग उत्पन्न होत नाहीत आणि ज्या निर्गुण आणि अविकार्य

आहेत अशा गोष्टींपासून निसर्ग किंवा जीव (सोल) उत्पन्न होत नाही.

(कित्ता, ११००F - ११११A)

सर्वांत महत्त्वाचे भाष्य सेक्स्ट्स इम्पिरिकसमध्ये आढळते. डेमॉक्रायटसच्या लिखाणातील ह्या विषयाशी संबंधित असलेले बहुतेक खंड त्यात समाविष्ट आहेत.

ज्ञानेंद्रियांना जे प्रतीत होते ते डेमॉक्रायटस कधीकधी नाकारतो आणि म्हणतो की ह्या प्रकारच्या कशाला सत्यात स्थान नसते तर मतामध्ये (ओपिनिअन) स्थान असते. परमाणू आहेत आणि रिक्त आहे ही वस्तुस्थिती हे अस्तित्वात असलेल्या वस्तूविषयीचे सत्य आहे. कारण तो म्हणतो :

**संकेताने गोड आणि संकेताने कडू, संकेताने उष्ण आणि संकेताने थंड, संकेताने रंग (असतात); वस्तुतः परमाणू आणि रिक्त (आहेत.) (पाहा B १२५)**

ह्याचा अर्थ असा की, प्रत्यक्षज्ञानाचे विषय असलेल्या वस्तू असतात असे वाटते आणि मानले जाते, पण वस्तुतः त्या अस्तित्वात नाहीत – फक्त परमाणू आणि रिक्त ही आहेत.

आपल्या 'टेकावा' मध्ये ज्ञानेन्द्रियांना विश्वसनीय (ज्ञान प्राप्त करून देण्याची) शक्ती असते असे दाखवून देण्याचा जरी त्याचा प्रयत्न असला तरी प्रत्यक्षात तो त्यांचा निषेध करतो असे आढळून येते. कारण तो असे म्हणतो की,

**प्रत्यक्षात आपल्याला कशाचेच दृढपणे ज्ञान होत नसते; (ज्ञानाचा विषय असलेली वस्तू) शरिराची अवस्था आणि (त्या वस्तूत) रिघणाऱ्या वस्तू आणि तिचा प्रतिकार करणाऱ्या वस्तू यांना अनुसरून ती जशी बदलत जाते त्याचेच ज्ञान आपल्याला होत असते. (B ९)**

आणि फिरून तो असे म्हणतो की,

**आणि प्रत्येक वस्तू कशी आहे आणि कशी नाही ह्याचे वास्तवज्ञान आपल्याला नसते हे अनेक प्रकारे दाखवून देण्यात आले आहे. (B १०)**

आणि *'कल्पनांविषयी'* ह्यात तो म्हणतो,

**ह्या नियमानुसार माणसाने हे ओळखले पाहिजे की, तो वास्तवतेपासून दूर असतो (B ६)**

आणि परत,

**ह्या युक्तिवादही असे दाखवून देतो की वस्तुतः आपल्याला कशाविषयीही काही ज्ञान असत नाही, तर प्रत्येक बाबतीत आपला विश्वास बदलत्या आकाराचा असतो. (B ७)**

आणि परत,

**आणि तरी हे स्पष्ट आहे की, प्रत्येक वस्तू वास्तवात कशी आहे हे जाणणे एक कोडे आहे. (B ८)**

आता ह्या उताऱ्यांत जरी तो फक्त ज्ञानेन्द्रियांवर स्पष्टपणे हल्ला करीत असला तरी तो सर्वच ज्ञान नाकारीत आहे असे त्यात अभिप्रेत आहे. पण *नियम* ह्या आपल्या ग्रंथात तो असे म्हणतो की, ज्ञानाची दोन रूपे (फॉर्म्स) आहेत, एक ज्ञानेन्द्रियांनी प्राप्त होते आणि दुसरे आकलनशक्तीद्वारा. आकलनशक्तीद्वारा जे ज्ञान लाभते त्याला तो अस्सल ज्ञान म्हणतो; सत्य आणि असत्य ह्यात भेद करण्याच्या बाबतीत ते विश्वसनीय असते. इन्द्रियांद्वारा प्राप्त होणाऱ्या ज्ञानाला तो अंधुक (डार्क) म्हणतो. सत्य काय आहे हे ओळखण्याच्या बाबतीत ते बिनचूक असते हे तो नाकारतो. त्याचे शब्द असे आहेत :

**ज्ञानाची दोन रूपे आहेत : एक अस्सल आणि दुसरे अंधुक. जे अंधुक आहे त्याच्यात हे सामावलेले असते : पाहणे, ऐकणे, वास घेणे, रुची घेणे आणि स्पर्श करणे. जे अंधुक असते ते ह्याच्यापासून वेगळे काढण्यात आलेले असते....**

मग अस्सल ज्ञानाला अंधुक ज्ञानावर स्थान देऊन तो पुढे असे म्हणतो –

**जेव्हा अंधुक ज्ञान अधिक सूक्ष्मपणे पाहू शकत नाही किंवा ऐकू, वास घेऊ, चव घेऊ शकत नाही किंवा स्पर्शाने जाणू शकत नाही तेव्हा काहीतरी अधिक सूक्ष्म .....**

**(B ११b)**

तेव्हा डेमॉक्रायटसच्या म्हणण्याप्रमाणे विवेक (रीझन) – ज्याला तो अस्सल ज्ञान म्हणतो – हा सत्याचा मानदंड आहे. पण डायोटिमस म्हणतो की तो तीन मानदंड मानतो. जे अस्पष्ट आहे त्याचे ग्रहण करताना जे प्रतीत होते ती मानदंड असतो. (कारण जे प्रतीत होते ते जे अस्पष्ट आहे त्याचे दर्शन असते असे अॅनॅक्झॅगोरसने म्हटले आहे आणि ह्यासाठी डेमॉक्रायटसने अॅनॅक्झॅगोरसची स्तुती केली आहे.) अन्वेषणाच्या संदर्भात संकल्पना हा मानदंड असतो (कारण, मित्रा, अन्वेषण कशाविषयीचे आहे हे जाणले पाहिजे हे प्रत्येक वेळी लागू पडणारे तत्त्व आहे (प्लेटो, *फीड्रस*, २७३ B); निवड करणे आणि टाळणे ह्या बाबतीत आपले मनोविकार हा मानदंड असतो – कारण जे आपल्याला अनुकूल असल्याचे आढळून येते त्याची निवड करायची

असते आणि जे आपल्याला परके असल्याचे आढळते ते टाळायचे असते.

(सेक्स्टस इम्पिरिकस, *अगेन्स्ट धी मॅथेमॅटिशिअन्स*, VII १३५-१४०)

डायोजीनीअस लेर्शिअस ह्याने विचारांचा हाच क्रम थोडक्यात मांडला आहे :

कित्येकांच्या म्हणण्याप्रमाणे झेनोफेनीस आणि एलिआचा झीनो आणि डेमॉक्रायटस हे संशयवादी होते.... जेव्हा डेमॉक्रायटस असे म्हणतो की,

**संकेताने उष्ण आणि संकेताने शीत असते : वस्तुतः परमाणू आणि रिक्त असते.**

तेव्हा तो (वस्तूंचे) गुण नाकारीत असतो. आणि फिरून

**वस्तुतः आपल्याला काही ज्ञान नसते; कारण सत्य खोलवर (दडलेले) असते. (B ११७)**

'संकेताने रंग असतात', इ. ह्या डेमॉक्रायटसच्या प्रसिद्ध दाव्याचा निर्देश करणारे अनेक उतारे आहेत.

जे स्पष्टपणे दिसून येते त्याच्याशी युक्तिवाद विरोधी आहे हा कोणत्याही युक्तिवादाविरुद्ध घेता येण्याजोगा सर्वात मोठा आक्षेप आहे हे सर्वांना माहीत आहे. कारण जे स्वतःप्रमाण आहे त्याच्या आधाराशिवाय युक्तिवादाचा प्रारंभही होऊ शकत नाही. मग ज्यांच्यापासून त्यांचा प्रारंभ झाला आहे त्यांच्यावरच त्यांनी हल्ला केला तर ते विश्वसनीय कसे ठरतील? डेमॉक्रायटसलाही ह्याचे भान होते. कारण

**संकेताने रंग, संकेताने मधुर, संकेताने कटू, वस्तुतः परमाणू आणि रिक्त**

असे म्हणून जेव्हा त्याने ज्ञानेन्द्रियांवर आरोप केले तेव्हा त्याने ज्ञानेन्द्रियाकरवी बुद्धीला जे प्रत्युत्तर देववले ते असे की,

**बिचाऱ्या मना! तू आमच्याकडून पुरावा घेतोस व मग आम्हांला उलथून टाकायचा प्रयत्न करतोस का? आम्ही उलथले गेलो तर त्यात तुझे पतन आहे.**

म्हणून, सत्य म्हणून स्पष्टपणे प्रतीत होणाऱ्या ज्या विधानांपासून युक्तिवादाचा प्रारंभ होतो त्यांच्याशीच जेव्हा त्याचे सर्वात पटण्याजोगे निष्कर्ष विरोधी असतात, युक्तिवाद जेव्हा इतका वाईट असतो तेव्हा तो युक्तिवाद अविश्वसनीय आहे म्हणून त्याचा निषेध केला पाहिजे.

(गालेन, *ऑन मेडिकल एक्स्पीरिअन्स* XV ७-८)

हे सर्व लोक असे गृहीत धरतात की, जे आदिम मूलद्रव्य असते ते निर्गुण असते, त्याला स्वाभाविक पांढरेपणा किंवा काळेपणा किंवा इतर कोणताही रंग नसतो, आणि गोडी किंवा कडवटपणा किंवा उष्णता किंवा थंडपणा नसतो किंवा सामान्यपणे बोलायचे तर इतर कोणताही गुण नसतो. कारण डेमॉक्रायटस म्हणतो,

**संकेताने रंग, संकेताने कडू, संकेताने गोड : वस्तुतः परमाणू आणि रिक्त.**

आणि त्याला असे वाटते की, परमाणूंच्या समुदायापासून सर्व इंद्रियग्राह्य गुण निष्पन्न होतात. जे आपण त्यांना पाहतो त्यांच्याशी ते सापेक्ष असतात आणि निसर्गात पांढरे किंवा काळे किंवा पिवळे किंवा तांबडे किंवा कडू किंवा गोड असे काही नसते. 'संकेताने' ह्या पदाने 'रूढी' सारखे, किंवा 'आपल्या सापेक्षतेने', 'वस्तूंचे स्वतःचे जे स्वरूप आहे त्याच्यामुळे नव्हे' असे काहीतरी त्याला अभिप्रेत आहे. 'वस्तूंचे स्वतःचे जे स्वरूप आहे' त्याला तो वास्तवता म्हणतो; हा शब्द तो 'सत्' (रिअल) पासून निष्पन्न करतो आणि त्याचा अर्थ 'सत्य' असा आहे. तेव्हा त्याची सवंध उपपत्ती घेतली तर तिचा अर्थ असा होईल : माणसे असे मानतात की, पांढऱ्या वस्तू आहेत आणि काळ्या वस्तू आहेत आणि गोड वस्तू आहेत आणि कडू वस्तू आहेत. पण सत्य असे आहे की, ज्या काही गोष्टी आहेत त्या वस्तू आणि रिक्त आहेत – अगदी हेच त्याने स्वतः म्हटले आहे – परमाणूंना तो 'वस्तू' म्हणतो आणि रिक्ताला 'शून्य' म्हणतो. आता जे सर्व परमाणू आहेत त्या लहान वस्तू असल्यामुळे त्यांच्यात गुणांचा अभाव असतो. रिक्त हा एक प्रकारचा अवकाश आहे आणि त्याच्यात ह्या सर्व वस्तू सर्व काळ वरखाली अशा फिरत असतात. आणि त्या एकमेकात अडकतात तरी किंवा एकमेकांवर आदळून मागे सरतात आणि ह्या भेटीगाठीत त्या एकमेकांपासून दूर तरी सरकतात किंवा एकमेकांशी जुळतात तरी आणि ह्यापासून त्या सर्व संयुक्तांची (कॉम्पॉउण्ड्स) घडण करतात. ह्यांत आपली स्वतःची शरिरे, त्यांचे गुणधर्म आणि त्यांची प्रत्यक्षज्ञाने समाविष्ट आहेत.

(गालेन, *धी एलिमेन्ट्स अॅकॉर्डिंग टु हिपोक्रेटिस*, I ४१७-४१८K)

सत्य पाहता फक्त परमाणू अस्तित्वात आहेत आणि बाकीची सर्व केवळ रूढी आहे असे जेव्हा डेमॉक्रायटस म्हणतो तेव्हा ती त्याची चूक आहे आणि त्याला शोभून दिसेल अशी ही चूक नाही. कारण, डेमॉक्रायटस, तुमच्या उपपत्तीप्रमाणे आपल्याला सत्य काय हे शोधून काढता येणार नाही एवढेच नव्हे, आपल्याला

जगताही येणार नाही; आग, मृत्यू याविरुद्ध सावधगिरीचे उपाय योजिता येणार नाहीत. (इनोन्डाचा *डायोजीनिस*, खंड ६ ११)

ॲरिस्टॉटलला डेमॉक्रायटसची जी चूक म्हणून वाटते तिचे एक त्रोटक आणि बुचकळ्यात टाकणारे विश्लेषण त्याने दिले आहे :

आपल्याला वस्तूपासून जे इंद्रियप्रत्यय लाभतात त्यांना विरोधी असलेले इंद्रियप्रत्यय इतर अनेक प्राण्यांना त्याच वस्तूपासून लाभतात. आणि एकच व्यक्ती घेतली तर तिच्याही प्रत्यक्षज्ञानाला वस्तू सदैव तशाच दिसत नाहीत. तेव्हा त्यांतील (इंद्रियप्रत्ययांतील) कोणता सत्य आहे आणि कोणता असत्य आहे हे अस्पष्ट राहते. कारण हे सत्य असण्याऐवजी ते सत्य असावे ह्याला काही कारण असत नाही – त्या सर्वांचा दर्जा समान असतो. ह्यामुळेच डेमॉक्रायटस म्हणतो की, एकतर काहीच सत्य नाही किंवा निदान आपल्याला तरी ते अस्पष्ट राहते. सामान्यपणे असे म्हणता येते की, (वस्तूंचे) आकलन म्हणजे प्रत्यक्षज्ञान होय आणि प्रत्यक्षज्ञान हे स्थित्यंतराच्या स्वरूपाचे असते असे ते मानत असल्यामुळे ते असे म्हणतात की, प्रत्यक्षज्ञान हे अनिवार्यपणे सत्य असते.

(ॲरिस्टॉटल, *मेटॅफिजिक्स*, १००९b ७-१५)

अखेरीस, गेल्या काही पृष्ठांत जे संशयवादी चिंतन व्यक्त झाले आहे त्याच्याशी डेमॉक्रायटसची सर्व (उपलब्ध) वचने सुसंवादी आहेत असे नाही ह्यावर भर दिला पाहिजे.

आपल्याला हे माहीत आहे की, जे प्राप्त करून घ्यायला कठीण असते ते अनावश्यक असते आणि जे आवश्यक असते ते प्राप्त करून घ्यायला सुलभ ठरावे अशी ईश्वराने औदार्याने व्यवस्था केली आहे. म्हणून डेमॉक्रायटसने म्हटले आहे आणि ते योग्य आहे की,

**निसर्ग आणि शिकवण सारखी असतात.**

आणि ह्याचे कारण तो थोडक्यात पुढे सांगतो

**कारण शिकवण माणसाचा आकार बदलते आणि निसर्गही आकार बदलून कृती करतो.**

(क्लेमेन्ट, *मिसलनीज़*, IV xxiii १४९.३-४)

आणि ज्या लिखाणात प्रोटॅगोरसवर हल्ला करण्यात आला आहे (ज्याचा निर्देश प्लुटार्कने केला आहे) त्यांच्यात सापेक्षतावादाविरुद्धचा प्रभावी युक्तिवाद प्रथम मांडण्यात आला आहे.

प्रत्येक इंद्रियप्रत्यय सत्य आहे असे तुम्ही मानू शकत नाही; कारण तो उलटविता येतो – डेमॉक्रायटस आणि प्लेटो ह्यांनी प्रोटॅगोरसला दिलेल्या उत्तरात हे दाखवून दिले आहे. कारण जर प्रत्येक सत्य असेल तर 'प्रत्येक प्रत्यय सत्य असतो असे नाही' हेही सत्य असणार (कारण हाही एक प्रत्यय आहे) आणि अशा रीतीने प्रत्येक प्रत्यय सत्य आहे हे असत्य ठरते.

(सेक्स्टस इम्पिरिकस, *अगेन्स्ट धी मॅथेमॅटीशिअन्स*, VII ३८९-३९०)

## *नवभारत*च्या हितचिंतकांस नम्र आवाहन

*नवभारत*चे एक हितचिंतक-वाचक श्री. एम. व्ही. भाटवडेकर यांनी काही महिन्यांपूर्वी प्राज्ञपाठशाळा मंडळाकडे २५,००० रुपये ठेव म्हणून ठेवले. ही रक्कम कायम-ठेव स्वरूपात बँकेत राहावी आणि तिच्यावर मिळणारे व्याज फक्त *नवभारत* करता वापरले जावे, या अटीवर त्यांनी ही ठेव ठेवली आहे. जर यदाकदाचित *नवभारत* चे प्रकाशन थांबले तर मूळ रक्कम श्री. भाटवडेकरांना अथवा त्यांच्या वारसांना मंडळाने परत करावयाची आहे. एक प्रकारे *नवभारत* चालू असेपर्यंत बेमुदत अशी ही बिनव्याजी ठेव श्री. भाटवडेकर यांनी आमच्याकडे दिली आहे.

आमच्या वर्गणीदार वाचकांनी व हितचिंतकांनी श्री. भाटवडेकर यांचे प्रमाणे आमच्याकडे बिनव्याजी ठेवी ठेवाव्यात असे आवाहन आम्ही आवर्जून करीत आहोत. आपण आपली ठेव तीन, पाच किंवा आपणांस शक्य असेल तितक्या मुदतीकरता ठेवू शकता. आम्ही ती स्वतंत्रपणे गुंतवू आणि मुदत संपल्यावर आपणांस मूळ रक्कम हवी असल्यास त्वरित परत करू.

**सीताराम रायकर** — सचिव
**मे.पुं. रेगे** — अध्यक्ष
**वसंत पळशीकर** — का. संपादक, *नवभारत*

प्राज्ञपाठशाळा, मंडळ, वाई






# अक्षरवेध

**मी भरून पावले आहे** – मेहरुन्निसा दलवाई, साधना प्रकाशन, पुणे, १९९४, रु. १५०/-

*मी भरून पावले आहे* – मेहरुन्निसांच्या आत्मकथनाचे हे शीर्षक वाचले, कृतार्थतेचे उन्मुक्त सूर ऐकून पुस्तक वाचण्यासाठी मन उत्कंठ झाले. कित्येक वर्षे आठवणी, आत्मकथने, आत्मचरित्रे वाचत आलेय. गेली काही दशके ती मोठ्या प्रमाणावर प्रकाशित होऊ लागलीत. दलित आत्मकथनांचे अनेकपदरी कोडकौतुक झाले. आत्मकथनांची सामाजिक दस्तावेज म्हणून दखल घेतली गेली. अलीकडच्या – विशेषतः स्त्रियांच्या – आत्मकथनांत स्वतःच्या मनोव्यापारांचे, अंतरंगघटनांचे चित्रण जसजसे वाढत गेले, तसतशी ही आत्मकथने महत्त्वाची मानसशास्त्रीय दस्तावेज आहेत हे जाणवू लागले. उदा., सुनीता देशपांड्यांचे *आहे मनोहर तरी*.... अंतर्निरीक्षणाचा आदर्श वस्तुपाठ वाटला. आणि आत्मकथने माझ्या अभ्यासाचा विषय बनला.

ही आत्मकथने शास्त्रदृष्ट्या कितीही मोलाची वाटली तरी त्या लेखनात मांडलेल्या अनुभवाचे स्वरूप मात्र नेहमीच विलोभनीय नव्हते. अलीकडील स्त्रियांच्या आत्मकथनांतील 'उजाडपणा' मन विशेष अस्वस्थ करीत होता. आत्मकथन नेहमीच आणि पूर्णपणे प्रामाणिक नसते. त्यात कल्पनारंजन, अतिरंजन, नटवेपणा यांतून येणारा खोटेपणा तर असतोच; पण आत्मसमर्थनाची जबरदस्त प्रेरणा असणाऱ्या लेखकांनी जाणूनबुजून सत्याचा अपलाप केलेला असतो. पण अखेर ते लेखिकेच्या मनाचे खरेखुरे दर्शनच ना! 'आयुष्य सांडुनिया मी रिक्तहस्त आहे' असा सूर आळवणाऱ्या या काळात 'भरून पावल्या'चे सूर ऐकले म्हणून उत्कंठा वाटली.

हे एक बोलपुस्तक आहे. सरिता पदकींनी विचारलेल्या, मेहरुन्निसांच्या आठवणी जागवणाऱ्या प्रश्नांनी बोलते झालेले, लयबद्ध कथन. तरल नसले तरी अत्यंत नितळ. मेहरुन्निसा बोलत गेल्या, मोकळेपणाने, सच्चेपणाने. त्या सांगण्यामागे आवेश नव्हता, अभिनिवेश नव्हता, सारवासारव नव्हती; पण तटस्थताही नव्हती. मन गुंतलेले होते. मेहरुन्निसा आणि वाचक यांच्यात मध्यस्थी कोणीही केलेली नाही.

नेमके काय आहे या पुस्तकाचे बलस्थान? अल्पायु हमीदच्या शोकान्त जीवनाची कहाणी? मुस्लिम समाजाच्या उत्थानासाठी त्याने सुरू केलेल्या धगधगत्या संघर्षाचे रूपचित्र? एका साध्यासुध्या आनंदयात्री मुलीचे धीरगंभीर परिवर्तनवादिनीत झालेले रूपांतर? अस्सल जगणाऱ्या स्त्रीने अवघ्या १९ वर्षांच्या सहजीवनातून केलेली आयुष्यभराच्या समाधानाची बेगमी? 'मेहरू, आज मी जो काही आहे तो तुझ्यामुळे आहे' – सहचराने दिलेल्या एवढ्याशा पावतीवर पार्थिव जीवनातील सारं दैन्यदुःख कुर्बान होऊ शकतं? की ही पावती देण्याची कुवत असणारं, आपल्या सामान्य सहचरीचे असामान्य देपो जाणू शकणारे हमीदचे संवेदनक्षम मन आपल्याला मोह घालतंय?

मेहरुन्निसा 'ग्रेट' नाहीत. तसा दावा त्यांनी केलेला नाही. आपण 'ग्रेट' नाही याने खंतावलेल्याही नाहीत. त्यांची आत्मप्रतिमा भरपूर सकारात्मक आहे, आत्मतृप्त आहे. याचे कारण त्यांचे बालपण. पुण्यातल्या सुधारकी थाटाच्या मुस्लिम कुटुंबाचे रूपही आपल्याला या बालपणाच्या वर्णनातून न्याहाळता येते.

त्यांच्या आई-वडिलांचा विषमविवाह. अल्लड माता आपल्या मुलीचे पालन करू शकणार नाही म्हणून आजीने त्यांना वाढविले. स्वतःच्या मुलांपेक्षा लाडाकोडाचे झुकते माप या नातीला दिले. खाण्यापिण्याची चंगळ, नटामुरडायला सूट. नातीला घरकाम करावे लागले तर आजीला हळहळ वाटायची. आत्या, काका सर्व उच्चशिक्षित, आधुनिक विचारांचे. त्यामुळे शिक्षणाची संधी विनासायास प्राप्त झालेली. असे तब्येतीने संगोपन झाल्यावर स्वतःच्या इच्छेने मेहरुन्निसा कॉलेज सोडतात आणि मुंबईस आपल्या आईवडिलांकडे राहायला येतात.

इथे एक वेगळ्या प्रकारचे कुटुंब आहे. घरात आईची सत्ता आहे. वडील अल्पशिक्षित आहेत. आई-मुलीत वयोवस्थेचे अंतर नाही. आयुष्यात एक वेगळाच अध्याय सुरू होतो. अशा वेळी आई-मुलीत एक स्पर्धेचे नाते निर्माण होऊन त्याचे पर्यवसान मुलगी गोंधळून जाण्यात होऊ शकते. पण तसे झाले नाही.





आई-मुलीचे नाते खूप चांगले झाले नाही. पण आईला समजून घेण्याची, आईच्या समस्यांची उकल करण्यात तिला साह्यभूत ठरण्याची वृत्ती मेहरुन्निसांची राहिली. आणि अखेर आईने आपल्यावर विविध अपकार केले हे जाणूनही आपले नाते सामान्य ठेवण्यात मेहरुन्निसांनी यश मिळवलेले दिसते. कामाच्या जागीही त्यांच्या या गुणवैशिष्ट्याने त्यांना अंतरंगमैत्रिणी मिळवून दिल्या.

खरे तर पुस्तकाचे प्रयोजन हमीदच्या आठवणी सांगण्याचे आहे. हमीदचे चित्रण सुरू होते ते हमीद विवाहाचा जोडीदार शोधीत मेहरुन्निसापर्यंत पोचतात त्यावेळेपासून. त्यानंतरच्या १९ वर्षांत हमीदच्या व्यक्तित्वाचा वेगाने विकास झाला आहे. या कालातील घटना वर्णन करताना सहजपणे हमीद नावाचा निर्भय, निर्भीड, निःस्पृह, कृतिशील विचारवंत आपल्यासमोर उभा राहतो. व्यावहारिक चिंता त्यांनी केल्या नाहीत. परंपरावाद्यांवर उघड आणि स्पष्ट हल्ला केला. उसळणाऱ्या लाटेसारखा स्वजनांचा रोष ओढवून घेतला आणि बेफिकीरपणे त्याला ते सामोरे गेले.

जीवघेणे आजारपण. तेही असेच अचानकपणे उसळून आले. आता फक्त हमीदची एकट्याची कसोटी नव्हती. असे आजार सर्व कुटुंबाला आव्हान बनून येतात. आजारी माणूस सोसत असतो, तितकेच त्याचे प्रियजनही सोसत असतात. पण एका शरीरातून चैतन्य माघार घेत असते, दुसऱ्याच्या शरीरात ते कब्जा घेऊन बसलेले असते. दोघांमधील समरसता बिघडू लागते; तोल राखणे कठीण जाते. त्यात तो प्रियजन आजाऱ्यापेक्षाही अधिक थकून जातो.

त्यांचा मृत्यू अकल्पित नव्हता. पण तोही एक भयनाट्य बनला. हमीदच्या इच्छेनुसार अंत्यसंस्कार करण्यासाठी त्याच्या जीवनाला साजेसे आणखी एक संघर्षनाट्य घडले. आणि ते एकट्या मेहरुन्निसांना वठवावे लागले.

आणि यानंतर हमीदचा वसा मेहरुन्निसांनी पदरात बांधला. नेमके काय घडले? मेहरुन्निसा आणि हमीद यांच्या विचारांत सुरुवातीला अंतर होतेच. हमीदची चळवळ वाढत गेली तेव्हा हे अंतरही वाढत गेले. शिवाय विचारानुसारी आचार करावयाचा या हमीदच्या आग्रहाने मेहरुन्निसांवर बदलण्यासाठी दडपणही वाढत गेले. उर्दूऐवजी मराठी, धार्मिक कर्मकांडाचा संपूर्ण अव्हेर, स्त्रियांच्या चळवळीत सहभाग यासाठी सक्तीसारखाच आग्रह हमीदनी धरला. पण त्या आग्रहाला बळी पडण्यापूर्वी मेहरुन्निसांनी या आग्रहांचा रास्तपणा पटवून घेतला. यासाठी दोघांनाही परिश्रम करावे लागले – मात्र मेहरुन्निसांना जास्त. या परिवर्तनाला बळ होते दोघांमधील आस्थापूर्ण नात्याचे, जे बरेचसे पारस्परिक होते.

हमीद पती म्हणून संपर्कात आले नसते तर मेहरुन्निसांनी हे परिवर्तन स्वीकारले असते का? सांघिक प्रक्रियेच्या ओघात कोणत्याही खटा-पटाशिवाय हे घडते. खरे तर अशा वेळी पत्नीला माघार घेऊन पतीची सरशी होऊ द्यावी लागते. आणि हे घडताना बाई मनात कुठेतरी दुःखी, कधी कडवट, कधी कायमची नाउमेद बनून राहते. अनेक नामवंतांच्या दांपत्यजीवनात हे घडताना दिसते. गांधी-कस्तुरबांमध्ये हे घडले, रे. टिळक पतिपत्नींत हे घडले. मेहरुन्निसांच्याही मनात निषेध उमटला, नाराजी, रागही उमटला; या आपल्या प्रतिक्रिया त्यांना स्पष्टपणे जाणवल्याही. पण प्राप्त परिस्थितीचा सहज स्वीकार, सहज समायोजन मात्र होत गेले. याचे कारण, बहुधा, मानवी जीवनाच्या उद्दिष्टांची आपल्या पातळीवर मेहरुन्निसांकडे असलेली स्पष्टता, आणि त्या जीवनावरची सामान्य माणसाकडे असते ती अतूट निष्ठा. हा नाहीतर दुसरा संसार उभा करू, इथे जमली नाही तर दुसरीकडे मात करू ही ईर्षा त्यांच्या मनात जागली नाही. आपण एकत्रच जगायचेय, तारू सतत वल्हवत पाण्यावर ठेवायचेय ही प्रेरणा अचल राहिली. त्यामुळे आपण आवंढा घेऊन काय गिळलंय यापेक्षा तोंडात शेवटी काय घोळवलंय याचीच चव बाकी राहिली.

मेहरुन्निसांचे निसर्गानुसारी व्यक्तिमत्त्व तर हमीदचे आदर्शानुसारी. सहजीवन चालू राहिले असते तर यातील आंतर्विरोध तीव्र होत गेला असता का? आदर्शवादी माणसाच्या वागण्याला टोक येण्याची शक्यता असते. पण मेहरुन्निसाला परमप्रिय होते सुस्थिर स्नेहमय कौटुंबिक जीवन. दोघांमध्ये त्या अल्पावधीत तरी तीव्र संघर्ष झाला नाही. कारण दलवाईंना घरटे आणि आकाश दोन्ही प्रिय होती. खाणेपिणे, सिनेमा, फिरणे, संगीत, सगळ्याचा शौक होता. आणि आपली आकाशाची तीव्र ओढ त्यांनी सुरुवातीलाच आणि वारंवार निक्षून स्पष्ट केली होती. मेहरुन्निसांनी लग्न करताना मान्य केलेली 'अट' होती ती!

पुष्कळदाच लग्नावेळच्या असलेल्या अटी पाळणे माणसांना कठीण जाते. त्या वेळी अटीचा अर्थ पुरेसा समजलेला नसतो - आपले मन पुरते समजलेले नसते – परिस्थितीचे दडपण लग्न ठरण्याच्या बाजूने अधिक असते – शब्द देताना जबाबदारीने देण्याची पद्धत नसल्याने विचार न करताच अट कबूल केलेली असते इत्यादी.

जीवन गतिमान असते. खुंटा पकडून राहण्यातच सामान्य माणसाचे सामर्थ्य असते. 'कार्यकर्त्याची बायको' तगून राहते ती बहुधा याच सामर्थ्याने. पण तिचे दांपत्यजीवन सहजीवन बनण्यासाठी मात्र दोघांमध्ये अन्य ताकदींची आवश्यकता असते. मेहरुन्निसां-

सारखी सरधोपट आयुष्याच्या अपेक्षेने संसारात आलेली मुलगी, हमीद घरट्यात रमत नाहीत म्हणून त्यांच्या आकाशात सहभागी होते आणि 'दोन ध्रुवावर दोघे' चा धोका टळतो.

दलवाईंच्या मृत्यूनंतर सार्वजनिक जीवनात मेहरुन्निसा सहज उमलत गेल्या. परिपक्व झाल्या. पतीचा क्रूस त्यांनी खांद्यावर घेतला, पण पतीच्या प्रकाशात चमकायचा प्रयत्न त्यांनी केला नाही. दलवाई असतानाच त्या त्यांच्या आग्रहावरून चळवळीच्या संपर्कात आल्या. आपल्या स्तरावर चळवळ त्यांना उमगत गेली. दलवाईंच्या स्तरावर जाण्याचा त्यांनी प्रयत्न केला नाही. त्यांच्या हयातीत नाही, मागेही नाही. आपली उमज आपल्याच – स्त्रीच्या पद्धतीनेच – त्यांनी जोपासली, व्यक्त केली. मेहरुन्निसांचे चळवळीचे आकलनही त्यामुळे अस्सल आहे, स्वतःचे आहे.

मेहरुन्निसांनी दलवाईंच्या आकाशात सामील होणे हा या कथेचा उत्कर्षबिंदू नाही. त्यांच्या मनात रेंगाळत राहिलेली कृतार्थतेची भावना हा तो बिंदू होय. मात्र या दोन्ही बिंदूंच्या मुळाशी एकच गोष्ट आहे, ती म्हणजे या पतिपत्नीत निर्माण झालेले नाते. हे नाते कसे विकसले? हमीदचा त्यात वाटा किती?

कृतार्थ सहजीवनासाठी आम्ही अनेक गोष्टींची आवश्यकता मानू लागलो आहोत. इथे त्यांतले काय आहे? हमीद मेहरुन्निसांचा समानधर्मा आहे का? हमीदना घरट्याची आवश्यकता होती, पण त्यासाठी ते आकाशाचा संकोच करायला तयार होते का? हमीदचा स्त्रियांविषयी – विशेषतः समवयस्क स्त्रियांविषयी – दृष्टिकोण सामान्यतः पुरुषांचा असतो त्यापेक्षा अधिक प्रगल्भ होता का? मेहरुन्निसांनी स्वतः प्रयत्न करण्यापूर्वी आपले विचार मेहरुन्निसांपर्यंत पोचवावे, त्यांनी ते स्वतंत्रपणे स्वीकारावे यासाठी हमीदनी काही परिश्रम केले का? या प्रश्नांची उत्तरे नकारार्थीच द्यावी लागतील. याउलट, प्राप्त परिस्थितीत व समजुतीच्या चौकटीत संसारात होणारे मनोभंग मेहरुन्निसांच्याही वाट्याला आले आहेत. पत्नीबरोबर जेवण्यात रस नसणे, मुलांकडेही दुर्लक्ष करून एकट्याने खाणे, पत्नीच्या हौशी लक्षात न घेणे, मतभेद असताना संसारात आपलेच मत रेटणे (मुलींना होस्टेलवर ठेवण्याबाबत) इ.

अनेक कार्यकर्त्यांच्या बायका आपल्याला सर्वार्थाने गाडून घेऊन त्यावर नवऱ्याचे कर्तृत्व पोसत असतात. पुष्कळदा त्या पूर्वाश्रमीच्या कार्यकर्त्या असल्याने आपल्या संसाराला आपले 'सामाजिक कार्य'ही मानीत असतात. पण नवरे (कार्यकर्ते) मात्र पुष्कळदा एका शारीरिक गुंतवणुकीव्यतिरिक्त, आर्थिक तर नाहीच पण भावनिक गुंतवणूकही त्या संसारात करीत नाहीत. ते लट्टू असतात आपल्या सार्वजनिक जीवनावर, त्यातील यशावर व त्या अनुषंगाने मिळालेल्या बाहेरच्या चमकदार माणसांवर. अगदी संगत-सोबत-करमणूकही ते या 'इतरां'बरोबरच करतात. दलवाईंनी असे केले नसावे. मेहरुन्निसांना आपल्याबरोबर बरोबरीने बाहेर येण्यास प्रोत्साहन दिले नसेल, पण ती येऊ पाहताच मागेही खेचले नाही. संसार, मुले, नोकरीत ती गुरफटलीय म्हणून तिच्याकडे दुर्लक्ष केलेले नाही. तिचे आपल्या जीवनातील मोल प्रथमपासून अखेरपर्यंत ओळखले हे दलवाईंचे वेगळेपण आणि हेच त्यांचे मेहरुन्निसांच्या कृतार्थतेत योगदान.

याउलट उपेक्षा झाली म्हणत, मेहरुन्निसा क्षणेक्षणी 'हुतात्मा' होत नाहीत. समजून घेतात. हमीदची चूक झाली म्हणून स्वतः चिडत नाहीत. दुःखी होत नाहीत. काट मारतात आणि पुढे जातात. सामान्य माणसाने दुसऱ्या माणसाचे सामान्यपण समजून पुढे जावे तसे.

परस्परसंबंधात काहीजण पालकाचे रूप धारण करतात. अवस्थेनुसार माणसांची रूपे बदलली तरी अनेक प्रसंगांत पुन्हा-पुन्हा येऊ पाहणारे एक रूप असतेच. परस्परसंबंधातील दुसरे रूप बालकाचे. पालकाच्या आणि बालकाच्या रूपाच्या वेगवेगळ्या तऱ्हा असतात. हमीद-मेहरुन्निसा समवयस्क, समशिक्षित, बऱ्याच अर्थाने समकक्ष; पण त्यांच्या संबंधांनी बहुतांशी रूप घेतलेय ते पालक-बालकाचे. एक पालकरूप असते शिस्तप्रिय पालकाचे. स्त्रीने संसारात हे रूप घेतले की तिची प्रतिमा होते हेडमास्तरणीची. पुरुषाने हे रूप घेतले की तो बनतो कर्ता पुरुष – पारंपरिक भूमिकेत फिट्ट बसणारा.

बालकाच्या रूपाच्याही तऱ्हा असतात. त्यात एक असते सदैव लाड-कोडाच्या अपेक्षेत असणारे. समोरच्याने शाबासकी द्यावी म्हणून वाटेल ते करणारे आणि मिळाली नाही की आणि तेवढ्यासाठीच विन्मुख होणारे. स्त्रीने हे रूप घेतले की तिला म्हणावे प्रेयसी. जन्मभर दांपत्यजीवनात केवळ हीच भूमिका करण्याचा अट्टहास करणाऱ्या स्त्रीला म्हणूया अखंड प्रेयसी – अखंड सौभाग्यवतीच्या चालीवर. *आहे मनोहर तरी*मध्ये हेडमास्तरीण दिसते, *बंध-अनुबंध* मध्ये अखंड प्रेयसी. आणि मेहरुन्निसा? त्याही बालक आहेत पण वेगळ्या तऱ्हेच्या. बालमंदिरात जाताना आपल्या छोट्या भावंडाला सांभाळून नेणारी आणि बालमंदिरात पोचल्यावर 'बाई'वर आपल्या विस्फारित डोळ्यांनी प्रशंसेचा वर्षाव करीत मुलांत मिसळून डोलणारी, छोटी ताई.

हमीदनी ताकाला जाताना भांडे लपवले नाही. लग्न करण्याची आपल्या मनातली खरी कारणे जाणलीही आणि रुबाबात सांगितली. स्वतःभोवती आयुष्य गुंफून त्यात एक बायको, आपण म्हणू तेथे, बसविण्याचे पुरुषी थाटाचे स्वप्न. मेहरुन्निसांनीही स्वतःचे मन साफ जाणले. त्या 'पुरुषी थाटाचे' त्यांना कौतुक वाटले.







पण त्यात त्यांनी स्वतःचे टिपिकल वायकी स्वप्नही तेवढ्याच कौतुकाने गुंफले. हा आपला प्रेमविवाह नाही याचे स्पष्ट भान त्यांना होते. तरीही हा माणूस पुरुष म्हणूनही आपल्याला खुणावतोय याची नोंद त्यांनी केली. कुठेही स्वतःची फसवणूक नाही. सर्व प्रकरणात उमटणाऱ्या भावना मनःपूत म्हणून शिरोधार्य करायचा अस्सलपणा. शहाण्या वालकाची ही भूमिका त्यांनी सहजीवनभर निभावली. हमीद मात्र कधी हेडमास्तर बनले तर कधी प्रौढ सहकारी. अगदी सिनेमादेखील त्यांनी पत्नीला 'शिकवला'. वायको डबा नेते की नाही यावर लक्ष ठेवले. तिला इतर कुटुंबीयांनी मान दिला पाहिजे हे इतरांना वजावले. संसार चालवायचा मेहरुन्निसांच्या पैशाने पण मेहरुन्निसांबरोवर हौसमौज मात्र खास हमीदच्या पैशांनी. शेवटच्या आजारपणात हमीद घायकुतीला आले. त्याच्या अनेक कारणांतील एक म्हणजे त्यांचे 'कर्तेपण हरविणे'. 'तुझ्यामुळे मी आहे' हे म्हणाला हमीदमधला 'प्रौढ सहकारी'.

नवऱ्याची मैत्रीण आणि बायकोचा मित्र ही दोन पात्रे आधुनिकांच्या संसारात आलेली दिसतात. (असली नसली तरी प्रकाशक आत्मकथनात तरी ती आणायला लावतात.) नवरा मित्र होत नाहीय, किंवा बायको सखी वनत नाहीय या खंतेतून वा कल्पनेतून जेव्हा ही पात्रे संसारात प्रवेशतात, तेव्हा अपरिहार्यपणे दुसऱ्याच्या वैवाहिक जोडीदारातील न्यूनाची परिपूर्ती करण्याचे प्रयोजन या पात्रांकडे असते. सांत्वन करण्याच्या भरात हे नवे जोडीदार एकमेकांच्या जवळ येतात, कधी-मधी घसरतातही, पण पुढे जात नाहीत. (गेले तर पुन्हा नवा मित्र-मैत्रीण शोधावी लागेल ना?) आधुनिक संसारातील या वेदनेची मग काव्ये बनतात, कादंबऱ्या होतात, कधीकधी आत्मकथनेही वनतात. अनेक अर्थांनी आधुनिक असणाऱ्या हमीद-मेहरू संसारात ही पात्रे प्रवेशत नाहीत. हमीद व मेहरू दोघांनाही स्वतंत्र सामाजिक विश्वे असूनही हे कसे टळले? मित्रत्वाची गरज हमीदच्या बाबतीत मित्रांनी आणि मेहरुन्निसांच्या बाबतीत मैत्रिणींनी पुरविली म्हणून? पण भिन्न-लिंगीयांशी होणाऱ्या मैत्रीतून मिळणाऱ्या 'बोनस' शृंगारसुखाचं काय?

हमीद-मेहरू सहजीवनाव्यतिरिक्त नोंद घ्यावी अशा काही संक्षिप्त झलकी पुस्तकात मला आढळल्या. मुस्लिम कौटुंबिक जीवनाचे चित्रण माझ्या फारसे वाचनात कधी न आल्याने असेल, पण मला त्याची अपूर्वाई वाटली. चिंपळूणच्या गरीव पण माणुसलोभी मुस्लिम समाजातील भावडा जिव्हाळा, विशेषतः सासऱ्याने सुनेच्या शिक्षितपणाचे केलेले दिलखुलास कौतुक, सुनेप्रमाणे वदलणारे सासर यांचे चित्रणही आगळे वाटले. मेहरुन्निसा म्हणतात, मला तेथे (सासरी) गेल्यावर वाटले, आपण कोणीतरी आहोत. सासुरवाशिणीला हा विरळाच अनुभव!

मेहरुन्निसांचे आजोळही तसेच. त्यातला मुलीचा सन्मान, स्त्री-शिक्षणाचा सहजस्वीकार याचा वारकाईने विचार करावासा वाटतो. हमीदच्या आईच्या कपाळावरील (हमीदच्या स्मृतीतील) आठ्या, मेहरुन्निसांच्या आईचा आक्रस्ताळेपणा, विषम-विवाहात अडकलेल्या स्त्रियांचा सल आपल्यापर्यंत पोचवतात – प्रौढ कुमारिकांचा प्रश्न सर्व समाजांत सारखाच आहे का? कमावती मुलगी म्हणून मेहरुन्निसांचे लग्न त्यांची आई टाळीत होती का? – 'माझे डोके तू चेपू नकोस, तुझी आई चेपील.' असे वडील लेकीला का म्हणतात? असे अनेक प्रश्न मनाच्या वळचणीला येऊन उभे राहतात.

पुस्तकाच्या शैलीवद्दल वोलावे का? पुस्तकाची भाषा उद्गारमय आहे. भाषेमध्ये वा धाटणीमध्ये काय नाही हे सांगायचे झाले तर मोठी यादी होईल. पण सर्वार्थाने त्या यादीवर मात करणारा एक गुण भाषेमध्ये आहे तो म्हणजे सच्चेपणा; ज्यामुळे अनुभव तुमच्याकडे पोचतो, नुसती माहिती नव्हे. अनुभवातही काय नाही? अलीकडील आत्मकथनात आढळणारा माल-मसाला नाही, कुलंगडी नाहीत. जगताना जे जाणवले नव्हते ते मागाहून कल्पनेने रंगवून घुसडलेले नाही. शैली रोखठोक पण त्यात मनाचे गरळ-मरळ कुठे ओकलेले नाही. मनच निर्मळ की हा सरिता पदकींच्या साफसफाईचा परिणाम?

पुस्तक संपवून खाली ठेवताना मनासमोर उभी राहिली एक तरुण मुलगी, पंचविशीतली. आपल्या सर्व अभिजात आणि संस्कारगत इच्छा-आकांक्षा, आवडी-निवडी, सवयी-स्वभावासह एका चाकोरीवाहेर पडू पाहणाऱ्या तरुणाशी निर्वेध मनाने लग्न करते. युगायुगांचे विवाहबंधन लेऊनही मुक्तपणे सहजीवन जगते. समकालीन आत्मकथांचे हटेल सूर, छटेल सूर, हर्षामर्षांचे वेगडी उत्सव आसपास रेंगाळताना तिच्या पायातील भरभरून पावल्याचे घुंगूर मनात नाचत राहतात.

वाचण्यापूर्वी लक्ष्मीबाई टिळक आठवत होत्या, एखादी बहिणाबाई चौधरी भेटेल अशी आशाही होती मनात. पण निराशेचे दुःख झाले नाही. कारण वहिणावाईसारखा 'सरसोतीचा स्पर्श' न होताही, एक मायबहीण भावजीवनाचे एक उत्तुंग शिखर गाठू शकली. आम्हा साध्यासुध्या स्त्रियांना तिचेच अप्रूप जास्त.

वाचून झाल्यावर, लिहिण्यापूर्वी, आवर्जून मेहरुन्निसांनाही भेटले. त्यांचे काम धोक्याचे; वौद्धिक करामतीचेहि मानले जाणारे. सुरुवातीला त्यांनी अभ्यासपूर्ण बोलायचा प्रयत्न केला. पण पुढेपुढे त्यांची मांडणी स्वरचित म्हणून तर्काने सहजासहजी काटता येणार नाही अशी झाली. एक विचारोर्मी अधिक अस्सल शहाणपण त्यांच्या मांडणीत असते. आपली, आपल्या गटाची, ताकद कमी

पडतेय याची त्यांना जाणीव आहे. आपल्याला फार कमी यश मिळतेय हे त्यांना माहीत आहे. पण मूलतः आपली भूमिकाच योग्य आहे याबद्दल त्या निःशंक आहेत. याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे मुस्लिम समाजाचा, स्वजनांचा-कुटुंबीयांचा एवढा पराकोटीचा दुर्भावनापूर्ण विरोध सहन करूनही त्या मुस्लिम समाजाशी, कुटुंबीयांशी सद्भावनेने गुंतलेल्या आहेत.

*प्रभा श्रीनिवास*

---

**उद्योगपर्व – बी.जी. शिर्के**, राजहंस प्रकाशन, पुणे, १९९६, रु. २५०/-

---

ही एका कर्तवगार, उपक्रमशील, यशस्वी उद्योजकाची कहाणी आहे. त्याचबरोबर सामाजिक जबाबदारीचे सदैव भान असलेल्या विधायक वृत्तीच्या व चिंतनशील अशा नागरिकाचीही कहाणी आहे. श्री. वा.गो. (बी.जी.) शिर्के ह्यांनी ती प्रांजलपणे, काही आडपडदा न ठेवता सांगितली आहे. भाषा साधी, सुटसुटीत, प्रवाही आहे. ह्यामुळे हे आत्मचरित्र अतिशय रंगतदार झाले आहे.

आज यशाच्या आणि मान्यतेच्या शिखरावर असलेल्या शिर्क्यांचा जन्म वाईजवळील पसरणी ह्या गावी एका गरीब शेतकरी कुटुंबात झाला. कुटुंबाला शिक्षणाची परंपरा नव्हती हे सांगावयाचेही कारण नाही. पण आता मागे वळून पाहता हे एक असाधारण, कर्तृत्वसंपन्न असे कुटुंब होते असे दिसते. आपल्या वडिलांविषयी ते लिहितात, '(त्यांना) लिहिता-वाचता अजिबात येत नव्हते..... (पण) औटकीप्रर्यंत पाढे येत... त्यांना हिशेब फार छान यायचे... (पूर्वी) पायली, अधेली, शेर, मापटी, चिपटी, कोळवी, निवळी अशी मापे असायची.. रुपयाला आठ पायल्या धान्य, तर ते कुणी... सहा आण्याचेच घ्यायचे. तर ते किती, हा हिशेब कुणाला करता यायचा नाही. पण ते आमचे वडील एका सेकंदात तोंडी सांगायचे.' शिर्के अत्यंत यशस्वी इंजिनिअर आहेत आणि त्यांचे तिन्ही मुलगे निष्णात इंजिनिअर आहेत. ह्याचे मूळ शिर्क्यांच्या स्वाभाविकपणे गणिती असलेल्या वडिलांत शोधता येते.

शिर्क्यांचे वडील बुद्धिमान तर होतेच पण उपक्रमशीलही होते. 'घोड्यांसाठी गवत विकायचे, कडबा घ्यायचा, वाईतल्या लोकांना विकायचा,... आमच्या आणि कोकणातल्या सगळ्या बैलगाड्यांत आंबे घेऊन पंढरपूरला विकायला जायचे.... जोडधंदा म्हणून नंतर वडील दूध विकायचे,शेळ्या पाळायचे इ.' शिर्के म्हणतात, 'घरी शेती जरी नावापुरंती असली तरी वडिलांच्या खटपटी व उद्योगी वृत्तीमुळे गावातील आजूबाजूच्या लोकांच्या मानाने आमच्या घरची आर्थिक परिस्थिती तशी काही फार वाईट नव्हती. भाकरतुकडा खाऊन कुटुंब सुखी-समाधानी होते.' ह्या उपक्रमशीलतेचा वारसाही शिर्के ह्यांना वडिलांपासून लाभला आणि तो त्यांनी पुढच्या पिढीकडे संक्रांत केला.

कुटुंब अशिक्षित होते तरी ह्या धाकट्या मुलाने शिकावे अशी तळमळ सर्वांना होती. 'मला मोठ्या भावाने घरी शिकविले. माझ्यापेक्षा दोन वर्षांनी मोठी एक बहीण होती. तिला व मला शिकविण्यासाठी एक पांढरा कागद घेऊन घरी त्या कागदावर ग, म, भ, न अशी अक्षरे काढून भिंतीवर चिकटविला होता.' शिर्के दुसरी पास होऊन तिसरीत गेले, नंबरही वर आला. तिसरीची पुस्तके घ्यायला मास्तरांनी एक रुपया मागितला हे त्यांच्या आईने ऐकले. ती तडक शाळेत गेली व कडोसरीचा रुपया काढून तिने मास्तरांना दिला. 'तिच्या चेहऱ्यावरचा त्या क्षणाचा आनंद व अभिमान मी अजूनही विसरू शिकत नाही.' कुटुंबातील ह्या उत्साहवर्धक वातावरणामुळे शिर्के शिकत गेले. अर्थात् त्यांची स्वतःची बुद्धिमत्ता आणि परिश्रम हेही शिक्षणातील त्यांच्या प्रगतीला बऱ्याच अंशी कारणीभूत होते.

आज शिर्क्यांच्या व्यवसायाचा व्याप आंतर्राष्ट्रीय स्तरावरचा आहे. पण ज्या पसरणी-वाई-पांचगणी- महाबळेश्वर ह्या परिसरात ते वाढले त्याच्यात त्यांची पाळेमुळे खोलवर रुजली आहेत. ह्या निसर्गसंपन्न परिसरातील निसर्गाची सर्व ऋतुंतील रूपे त्यांच्या मनात ठसली आहेत. ते शिकत गेले तरी शेतीपासून तुटले नाहीत. ते म्हणतात, 'मला... शेतकाम फार आवडे. त्यामुळे मला शेतातली सर्व कामे येतात. पेरणीपासून नांगरटीपर्यंत सर्व काही मी केले आहे.' फावल्या वेळात ते शेळ्या चरायला घेऊन जात. आजूबाजूच्या गावांतील जत्रांना जात. शिर्क्यांच्या जडणघडणीत ह्या सर्व अनुभवांचा मोठा वाटा आहे. ज्या ग्रामीण समाजात ते वाढले त्याच्यापासून ते कधी तुटले नाहीत.

ह्या परिसरातील निसर्गचक्राचा आणि त्याच्याशी जोडलेल्या शेतीच्या व्यवसायाचा जसा शिर्क्यांना लळा आहे तसा ह्या भागातील सांस्कृतिक परिसराचासुद्धा त्यांना अभिमान आहे. वाईविषयी ते

म्हणतात, 'असे वाई हे अतिशय पुढारलेले, फार हुशार लोकांचे गाव. वातावरण अतिशय शुद्ध. सांस्कृतिकदृष्ट्या वाई गाव अतिशय उच्च पातळीवर आहे.' त्रिखंड हिंडून आलेल्या ह्या बुद्धिमान आणि चोखंदळ व्यक्तीने वाईकरांना दिलेल्या शिफारसपत्राचा त्यांना अर्थात् अभिमान वाटेल. (मला स्वतःला त्यात स्थानिक आपुलकीतून निष्पन्न झालेली काही अतिशयोक्ती आहे असे वाटते. पण अशी अतिशयोक्ती स्वाभाविक आणि क्षम्य असते.)

एक गोष्ट निर्विवाद की, शिर्क्यांच्या घडणीत वाईच्या लोकांचा महत्त्वाचा सहभाग आहे. पसरणीच्या शाळेत पाचव्या इयत्तेपर्यंत शिकल्यानंतर शिर्के वाईच्या शाळा नं. १ मध्ये दाखल झाले व तेथून व्हर्न्यॅक्युलर फायनलची परीक्षा पास करून नंतर वाईच्याच द्रवीड हायस्कूलमध्ये प्रवेश करून मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. वाईकरांविषयीचे आपले चांगले अनुभव त्यांनी कृतज्ञतेने नमूद केले आहेत. 'मला माझ्या वर्गबंधूंनी व वाईकरांनी अगदी उत्कृष्ट सहकार्य व मदत केली. पुस्तके नसली किंवा संस्कृतचे मला जास्त ज्ञान नसल्याने संस्कृतची शिकवणी पाहिजे तर शास्त्रीबुवांकडे मला घेऊन जायचे. सगळ्या लोकांनी अगदी सबळ हाताने मला मदत केली... खेडेगावातील मुलगा पहिला यावा यावद्दल कुणालाही असूया नव्हती. उलट तो पहिला यावा म्हणून ते मला उत्तेजन द्यायचे. मुलांनीही कोणी दुस्वास, हेवा अजिबात केला नाही. उलट म्हणायचे, "तुला काय पाहिजे ते सांग." ' शिर्क्यांनी शालेय जीवनाच्या सर्व विभागांत – वादविवाद, खेळ, स्नेहसंमेलन – स्वतःलां झोकून दिले. ह्या जादूच्या दिवसांतील एक मजेदार आठवण त्यांनी दिली आहे. ती अशी की, स्नेहसंमेलनाच्या प्रसंगी आयुष्यात प्रथमच त्यांचा श्रीखंडाशी परिचय झाला. प्रारंभी त्यांना ते पिठलेच वाटले.

शिर्क्यांना वाईला जे उत्साहवर्धक अनुभव आले त्यांच्या संदर्भात एका काहीशा नाजूक बाबीचा उल्लेख केला पाहिजे. ब्राह्मणजाती परंपरेने विद्यार्जनाच्या, अध्ययन-अध्यापनाच्या क्षेत्रात होत्या आणि इंग्रजी शिक्षणाने नोकरीपेशात आणि आधुनिक तांत्रिक व्यवसायात ज्या नवीन संधी उपलब्ध झाल्या होत्या त्यांचा त्यांनी लाभ उठवला. मराठा आणि बहुजनसमाजातील इतर जाती परंपरेने अशिक्षित होत्या. त्यांच्यात जेव्हा जागृती आली तेव्हा आपल्या मुलाबाळांनीही आधुनिक शिक्षण घ्यावे, नोकरीपेशात, व्यवसायात प्रवेश करून कर्तबगारी दाखवावी अशी आकांक्षा, ईर्षा त्यांच्या नेत्यांच्या मनात रुजली आणि त्यातून बहुजन समाजाच्या शिक्षणासाठी एक मोठे आंदोलन विकसित झाले. ही विधायक आणि स्वागतार्ह अशी गोष्ट होती.

पण ह्या ईर्षेमध्ये ब्राह्मणांनी आतापर्यंत आपल्याला शिक्षणापासून वंचित ठेवले व प्रगतीची दारे वंद केली म्हणून त्यांच्याविषयीचा एक तीव्र राग, अपरिहार्यपणे आणि काही प्रमाणात रास्तपणे, अंतर्भूत होता. ह्यातून ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर यांच्यामध्ये कलुषित भावनेची, द्वेषाचीसुद्धा दरी निर्माण झाली आणि तिचा महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनावर विपरीत परिणाम झाला. आज पाऊणशे वर्षांनी ह्या द्वेषाची झळ खूपच कमी झाली असली तरी दुराव्याचा एक अंतःप्रवाह दोघांमधून अजूनही वाहत आहे असे म्हणता येईल.

ह्या दुराव्याचा किंवा कटुतेचा स्पर्शही शिर्के यांच्या लिखाणात किंवा मनोवृत्तीत आढळून येत नाही. ह्याचे एक कारण अर्थात त्यांच्या उमदेपणात, समंजसपणात आहे. पिढ्यान् पिढ्या चालत आलेली, स्थिर अशी ही एक सामाजिक परिस्थिती होती. तिला जबाबदार कोण ह्या प्रश्नापेक्षा तिच्यात सुधारणा कशी करावी ह्या प्रश्नाला अधिक महत्त्व आहे असा त्यांचा दृष्टिकोन दिसतो. सुधारणेला तर खूपच अवसर होता आणि ती करण्याची तातडी होती. आपल्या वडिलांच्या अंगच्या मनःशक्ती ओळखून ते म्हणतात, 'अशा लोकांना जर शिक्षणाची संधी मिळाली असती तर हे लोक खरोखरच फार पुढे गेले असते.' शिक्षणाच्या अभावी सोन्यासारखे गुण मातीमोल होतात हा प्रत्यक्ष अनुभव येऊनही शिर्क्यांची मनोवृत्ती निरामय राहिली ह्याचे दुसरे कारण मला दिसते ते असे की, शिक्षणात त्यांना तत्परतेने मदत करणारे बरेचसे लोक त्यावेळच्या परिस्थितीत अटळपणे ब्राह्मण होते. देशपांडे मास्तर, पुराणिक मास्तर, अभ्यंकर मास्तर इ. शिक्षकांविषयी त्यांनी आदराने, भक्तीने लिहिले आहे. व्ह.फा. ची परीक्षा पास झाल्यानंतर शिर्क्यांना पुढील शिक्षणासाठी ज्यांनी इंग्रजी शिकविले त्या बाळूकाका पंडितांची गोष्ट विशेष उल्लेखनीय आहे. रघुनाथ ह्या आपल्या चांभार मित्राला घेऊन शिर्के पंडितांच्या घरी गेले. "त्यालाही ते शिकवतील का?" हा प्रश्न त्यांना विचारायचा होता. पंडित माडीवर होते. त्यांच्याकडे जायचे तर स्वयंपाकघरातून जावे लागे. "रघुनाथ चांभार आहे, त्याला घेऊन घरात येऊ का, त्यालाही शिकवाल का?" हे प्रश्न ऐकून पंडित रागावले. 'त्यांनी माझा कानच धरला व म्हणाले, "गाढवा, मी पुढारलेला ब्राह्मण आहे, कोणीही आण. मला विचारलंसच का?" ' पुढे पंडितांनी काहीसे भांडण करून शिर्क्यांना द्रवीड हायस्कूलमध्ये प्रवेश मिळवून दिला.

ह्या स्वरूपाचे अनुभव शिर्क्यांना पुढेही आले. १९३६ साली द्रवीड हायस्कूलमधून ते मॅट्रिकची परीक्षा पास झाले. त्या वर्षी परीक्षेचा निकाल २८ टक्के एवढा कमी होता. कुणाच्या






तरी मार्फत ते सी.रा. तावडे यांच्याकडे गेले. तावडे तेव्हा पुण्यातील ट्रेनिंग कॉलेजचे प्राचार्य होते. तावडे यांनी तत्परतेने शिर्क्यांना मदत केली. फर्गसन कॉलेजचे प्राचार्य महाजनी ह्यांना त्यांनी चिठ्ठी दिली. महाजनींनी शिर्क्यांना प्रवेश तर दिलाच पण फ्रीशिपही देण्याचे मान्य केले. पुढे जेव्हा शिर्क्यांना अर्धीच फ्रीशिप देण्यात आली आहे अशी नोटीस लागली तेव्हा ते महाजनींकडे गेले आणि आपल्याला पूर्ण फ्रीशिप देण्याचे मान्य करण्यात आले होते ही गोष्ट त्यांनी महाजनींच्या नजरेस आणली तेव्हा महाजनींनी त्यांना तात्काळ पूर्ण फ्रीशिप देऊन टाकली. फर्गसन कॉलेजातील त्यावेळेच्या आपल्या शिक्षकांविषयी शिर्के लिहितात, 'ही सर्व मंडळी जगातील अत्युच्च शिक्षण घेऊन डी.ई. सोसायटीची सभासद व्हायची.... त्यांनी शिक्षणाचे हे पवित्र कार्य केले. अशी ही विद्वान व स्वार्थत्यागी समाजसेवी मंडळी होऊन गेली.... अशा या मंडळींनी मला मदत केली नसती, तर माझे पुढचे शिक्षणच झाले नसते.' प्राचार्य तावडे यांनी शिर्के यांना व त्यांच्या काही मित्रांना ट्रेनिंग कॉलेजच्या मेसमध्ये वाढण्याची नोकरी दिली आणि त्यांच्या जेवणाचा प्रश्न सोडविला. शिक्षणासाठी विद्यार्थ्यांनी मदत जरूर घ्यावी पण शक्य तितके स्वावलंबीही व्हावे अशी तावडे यांची शिकवण होती. शिर्के यांच्या व्यक्तिमत्त्वाची घडण होण्यात ह्या सर्व संस्कारांचा मोठा हातभार लागला आहे.

बहुजनसमाजाच्या शिक्षणाच्या संदर्भात शिर्के यांनी आपल्या अनुभवाच्या आधारे महत्त्वाचे विचार मांडले आहेत. ते म्हणतात, 'माझ्या ह्या लिखाणामध्ये वारंवार बहुजनसमाजाचा उल्लेख येतो आहे. मी स्वतः जरी असले भेदाभेद मानीत नसलो तरी काही वेळा हे उल्लेखिणे अपरिहार्य असते. बहुजनसमाज म्हणजे गरीब शेतकऱ्यांची व आर्थिकदृष्ट्या कमकुवत म्हणजे ई.बी.सी., ओ.बी.सी. कॅटेगरीत येणारी मुले. या समाजाच्या स्वभावाची व खोडीची मला अनुभवाने जाण असल्याने हे अपरिहार्यपणे लिहावे लागते. मध्यमवर्गीय समाजाला शिक्षणाची परंपरा असल्याने त्यांच्या घरातच शिक्षणाचे वातावरण असते, काहीतरी शिस्त असते. आजकाल डॉ. आंबेडकरांच्या प्रेरणेने दलित समाजातही शिक्षणाची जबरदस्त लाट आलेली आहे. परंतु मधला हा शेतकरी व तत्सम अठरापगड जाती म्हणजे कमी उत्पन्नाचा समाज मात्र अजूनही शैक्षणिक संस्कृती आत्मसात करू शकलेला नाही. हा समाज मागे राहिला, तर तो बहुसंख्य असल्याने देशच मागे राहिला म्हणायचे.' हे अगदी रास्त असे निरीक्षण आहे. त्यातील 'शैक्षणिक संस्कृती' हे परवलीचे शब्द आहेत. ह्या बहुजनसमाजात शिक्षणाचा प्रसार करण्यासाठी म्हणून काम करणाऱ्या शिक्षणसंस्थांचे एक जाळेच आज महाराष्ट्रात विकसित झाले आहे. पण शैक्षणिक संस्कृती जोपासण्यासाठी त्या फारसे काही करीत नाहीत ही खेदाची गोष्ट आहे.

अनेकांनी शिर्क्यांना मदतीचा हात दिला, त्याचे त्यांनी चीज केले. हे तर झालेच; पण शिर्क्यांचे वैशिष्ट्य असे की, आपल्या स्वभावगुणांमुळे शिर्क्यांनी अनेकांचे साहाय्य आकर्षून घेतले. कुठकुठल्या प्रसंगांतून श्रीमंत, कनवाळू पारशी गृहस्थांशी ओळख झाली किंवा ओळख काढून त्यांचा विश्वास आणि लोभ संपादन केला. त्यातून महाबळेश्वरच्या पारशी जिमखान्यात काम मिळाले. ह्या स्थानाचा उपयोग करून वडोद्याच्या महाराणी चिमणाबाई मासाहेब ह्यांना पारशी जिमखान्याच्या मानद सभासद करून घेतले. ह्या सर्व ओळखींचा शिष्यवृत्त्या इत्यादी संपादन करण्यासाठी त्यांना खूप उपयोग झाला. शिक्षण पुरे करण्यासाठी जी आर्थिक तरतूद करणे आवश्यक होते ती करण्यासाठी ह्या तरुणाने केलेल्या धडपडीची हकिगत मुळातून वाचण्यासारखी आहे.

शिर्के पहिल्या वर्षाची परीक्षा पास झाल्यानंतर पुढे कोणता अभ्यासक्रम घ्यावा ह्याची निवड करण्याची वेळ आली. त्यांनी सायन्स विषय घेऊन पुढे इंजिनिअरिंगचा अभ्यास करण्याचे ठरविले. ह्या निर्णयामागे जो विचार होता तो असा : '(इंजिनिअरच्या) कामाचा संबंध दगड, माती, जमीन, नद्या, नाले, डोंगर अशा नैसर्गिक गोष्टींशी – विकासाशी, अशी अंधूक कल्पना होती. काम बाहेर फिल्डवरचे. ऑफिसात खुर्चीवर बसून काम करण्याचे आकर्षण नव्हते. इंजिनिअर लोकांचा असा निसर्गाशी, लोकांशी... संबंध येतो, हेही मनात कुठेतरी रुजले होते.' ह्यातून शिर्क्यांचा मूळचा शेतकऱ्याचा पिंड दिसून येतो.

यथावकाश शिर्के बी.ई. (सिव्हिल) झाले. अनुभवासाठी प्रारंभी काही काळ नोकरी करून स्वतःची 'सुप्रीम कन्स्ट्रक्शन्स' ही बांधकाम कंपनी काढली. तिचे उद्घाटन मासाहेबांनी केले व शिर्क्यांना भरघोस आशीर्वाद दिला. कर्नल टॉम्सन ह्या रॉयल इंजिनिअर्सच्या कमांडरशी ओळख करून घेतली व त्याच्या साहाय्याने मिलिटरीच्या बऱ्याच कामांच्या ऑर्डर्स मिळवून ती कामे चांगल्या प्रकारे पार पाडली. सार्वजनिक बांधकाम खात्याची कामेही अंगावर घेतली, धंद्यात प्रगती केली व पुढे कोल्हापुरला अधिक मोठी कामे हातात घेऊन ती यशस्वी केली.

कोल्हापुरच्या ह्या मुक्कामात त्यांची लग्नगाठ जुळली. तीही ऐकण्यासारखी कथा आहे. त्यांचे भावी सासरे शिंदे हेही बांधकामातील व्यावसायिक. हे फार खानदानी व स्वाभिमानी गृहस्थ होते. त्यांनी आपल्या मुलींना चांगले शिक्षण दिलेले. विजया (शिर्क्यांची भावी पत्नी) कॉन्व्हेंटमध्ये शिकून मॅट्रिक झालेली. सारे कुटुंब मोठे सुधारक विचारांचे व सुशिक्षित. शिर्के



गरीब शेतकरी कुटुंबातले. पण शिर्क्यांचे सच्छील आणि त्यांची कर्तबगारी पाहून त्यांनी मुलगी देण्याचे ठरविले असणार. तरीही लग्न होण्याआधी शिंदे शिर्क्यांना म्हणाले, “मुलगी खानदानी घराण्यातील आहे. लग्न झाल्यावर तुम्हांला घरी एक स्वयंपाकी ठेवावा लागेल व सतत मोटारगाडी पण ठेवावी लागेल.” शिर्के म्हणाले, ‘एक काय, दहा कुक ठेवीन; पण घरी बायको असल्यावर स्वयंपाकी कशाला?’ शिंदे म्हणाले, ‘आमची मुलगी तुम्हांला कम्पॅनिअन-ॲडव्हाइझर म्हणून हवी आहे (सहचारिणी-सल्लागार) की स्वयंपाकीण-मोलकरीण म्हणून?’ प्रश्न मार्मिक होता. पुढे शिर्क्यांच्या पत्नीने – विजयाबाईंनी – गृहिणी आणि सचिव ह्या भूमिका किंवा ही जोड-भूमिका उत्तम रीतीने बठविली. घर असे स्वच्छ, नीटनेटके, व्यवस्थित, सुसज्ज राखले की शंतनुराव किर्लोस्करांसारख्या चोखंदळ परीक्षकांनी मुक्तकंठाने प्रशंसा केली. पण ह्यावरोबरच त्या शिर्क्यांच्या अनौपचारिक सल्लागार होत्या. आपल्या व्यवसायात शिर्के जी कामे हाती घेत त्यांचे संघटण, प्रगती, कर्मचारी वर्ग ह्यांच्यावर त्यांची बारीक नजर असे. कोण माणूस कसा आहे याचे निदान त्या बरोबर करीत. शिर्क्यांची एकेकाळी राजकारणी मंडळीत बरीच ऊठवस होती आणि राजकारणात पडण्याकडे त्यांच्या मनाचा कल होत होता. (तसे झाले असते तर आपल्या सरळ, प्रांजल स्वभावामुळे शिर्के सदैव सत्ताधारी पक्षाच्या विरोधात राहिले असते आणि एकांडे शिलेदार बनले असते असा तर्क आपण करू शकतो.) पण विजयाबाईंनी ह्या निर्णयाला निक्षून विरोध केला. तो आपला पिंड नाही, असे त्यांनी सांगितले. हा त्यांचा सल्ला शिर्क्यांनी तेव्हा मानला. आज मागे वळून पाहताना त्यांना तो योग्य सल्ला वाटतो. एका घातक मोहातून शिर्क्यांना विजयाबाईंनी वाचविले. पुढे शिर्क्यांनी सिपोरेक्सचा कारखाना काढल्यानंतर काही वर्षे जेव्हा तो प्रचंड नुकसानीत जाऊ लागला तेव्हा कारखाना बंद करावा असा सगळ्यांचा कल होऊ लागला. पण हे दिवस जातील, पुढे अभ्युदय आहे असे भाकित विजयाबाईंनी वर्तविले व त्याचा प्रत्यय शिर्क्यांना आला. विजयाबाईंना सहावे ज्ञानेन्द्रिय असावे! स्वतः शिर्क्यांचा भविष्यावर विश्वास आहे. अशा काही श्रद्धांमुळे कर्तबगार माणसे अधिकच कणखर होतात असे दिसते. पण हे सर्व करीत असताना विजयाबाई, शिर्क्यांना जेव्हा डेक्कन क्वीनने मुंबईला जावे लागे तेव्हा सकाळी त्यांच्या हातात घरच्या जेवणाचा डबा द्यायला विसरत नसत. संसार चालविणे, मुले मोठी होईपर्यंत त्यांच्या शिक्षणावर देखरेख करणे ही सर्व गृहिणीची कर्तव्ये त्यांनी उत्तम रीतीने पार पाडली. १९८० मध्ये कॅन्सरच्या दुर्धर रोगाने त्यांचे अकाली निधन झाले. देशात, अमेरिकेत सर्व प्रकारचे उपचार झाले. पण त्यांचा उपयोग झाला नाही. शिर्क्यांवर हा मोठाच आघात होता. पण स्वतःला कामात झोकून देऊन हे दुःख त्यांनी पचविले.

कोल्हापुरला लग्न झाले व शिर्के लवकरच व्यवसायासाठी पुण्यात स्थायिक झाले. प्रताप, विजय आणि अजय अशी तीन अपत्ये जन्मली. ह्या मुलांचे योग्य रीतीने संगोपन कसे करायचे हा प्रश्न पुढे आला. ह्या प्रश्नाला एक सामाजिक अंग होते. शिर्के यांचे व त्यांच्या पत्नीचे निरीक्षण असे होते की, ‘बहुजनसमाजातील अनेक धुरीण मंडळी अतिशय विद्वान होती, पुढारलेली होती, समाजसुधारक होती, गुणाने व शैक्षणिक पात्रतेच्या दृष्टीने उच्च कोटीत बसणारी होती; पण विरोधाभास असा स्पष्टपणे नजरेला येत होता की, त्यांची मुले-बाळे मात्र शैक्षणिक व सांस्कृतिकदृष्ट्या होती तेथेच होती.... याचा अर्थ या लोकांनी शैक्षणिक परंपरा पुढच्या पिढ्यांमध्ये दिली नव्हती. उलट, पुढारलेल्या समाजात पुढची पिढी अगोदरच्या पिढीच्या तुलनेत पुढे जात होती.’ हा फरक का पडतो ह्याचा शिर्के पतिपत्नींना झालेला उलगडा असा की, पुढारलेल्या समाजात ‘घरात एक विशिष्ट प्रकारची सांस्कृतिक व शैक्षणिक शिस्त असते. सकाळ-संध्याकाळ मुले नीट वागतात की नाही, योग्य तेवढा अभ्यास करतात की नाही यावर प्रेमळ पण करडी नजर असते. शाळा-कॉलेजांच्या व्यतिरिक्त बाहेर जायचे असेल तर मुले परवानगी घेऊन, निदान सांगून जातात. ते एक वळण लावलेले असते.... अजूनही ज्यांची मुले चांगली निघतात त्यांच्या घरी मुलांना हे वळण असते.’ मध्यमवर्गीय कुटुंबांत ही पारंपरिक शिस्त अजून कितपत पाळली जाते देव जाणे, पण मुलांच्या निकोप वाढीच्या दृष्टीने ही अत्यंत उपयुक्त अशी शिस्त आहे यात शंका नाही. शिर्के पतिपत्नींनी ही शिस्त आपल्या कुटुंबात मुलांच्या वाढीच्या वयात जाणीवपूर्वक बाणवली. शिर्के म्हणतात, ‘तेव्हा आम्ही विचारपूर्वक निर्णय घेतला की, आमची दोन मुले वाढत असताना पुण्याबाहेर काम घ्यायचे नाही. मुलांना नीट शिकवायचे. नेहमी त्यांच्याजवळ असायचे... यात मुलांच्या आईची भूमिकाही फार महत्त्वाची आहे.... या बाबतीत सगळा पुढाकार, या कल्पना, हे विषय मुलांना शिकवायचे, त्यांना आपण हे असे वाढवू आणि अशा तऱ्हेने स्वतंत्र मतवादी व स्वाभिमानी पहिल्यापासून बनवू ही आईची भूमिका होती आणि स्वाभाविकच माझीही तशीच होती.’

ह्या प्रयत्नांना उत्कृष्ट फळे आली. थोरले दोन मुलगे, प्रताप व विजय हे इंजिनिअर झाले. धाकटा मुलगा अजय ह्याला बी.कॉम्. ला घातले तरी स्वतः अभ्यास करून इंजिनिअरिंगच्या अनेक क्षेत्रांत तो निष्णात झाला. सर्वांचे स्वतंत्र व्यवसाय आहेत.

सर्व मुले स्वतंत्र विचाराची आहेत. स्वतःचे निर्णय स्वतः घेतात. 'आम्ही जवळजवळ एकाच ठिकाणी ऑफिसात बसतो. पण आम्ही एकमेकांस कधीही विचारीत नाही. – "मी असे करू, का तसे?" उलट मीच त्यांना विचारीत असतो.'

बहुजनसमाजात शिक्षणाचा प्रसार व्हावा हा शिर्क्यांच्या अत्यंत जिव्हाळ्याचा विषय आहे. श्री शिवाजी मराठा हायस्कूल, डेक्कन मराठा स्कॉलरशिप एज्युकेशन बोर्ड इ. संस्थांच्या संचालक मंडळावर ते होते. त्यांच्या पत्नी ह्या कर्वे स्त्री शिक्षण संस्था ह्या संस्थेच्या उपाध्यक्षा होत्या. त्यांच्या अकाली मृत्यूनंतर संस्थेच्या धुरिणांनी शिर्के यांना, त्यांना न विचारता, संस्थेचे अध्यक्ष केले. शिर्के यांच्या कारकीर्दीत संस्थेने मुलींचे इंजिनिअरिंग कॉलेज काढले. हे विना-अनुदान असून उत्तम रीतीने चाललेले आहे आणि वर्षाला बत्तीस हजार रुपये फी घेण्याची न्यायालयीन परवानगी असूनही हे कॉलेज केवळ वीस हजार रुपये एवढीच फी घेत आहे. यावरून तथाकथित शिक्षणमहर्षींनी शिक्षणाचा कसा बाजार केला आहे हे सिद्ध होत आहे, असे शिर्के म्हणतात.

ह्या संदर्भात आरक्षणाविषयीची शिर्के यांची मते उल्लेखनीय आहेत. जो समाज परंपरेमुळे शैक्षणिक व सामाजिकदृष्ट्या मागासलेला आहे त्यातील मुला-मुलींसाठी शिक्षणाच्या क्षेत्रात आरक्षण अवश्य हवे. मात्र ह्यात आर्थिकदृष्ट्या मागासलेल्या वर्गाचाही अंतर्भाव केला पाहिजे असे त्यांचे मत आहे. 'अशी दुरुस्ती झाली असती, तर आज चाळीस वर्षांनंतर देशात ह्या विषयावर जे रामायण-महाभारत घडत आहे ते काहीही झाले नसते. सर्वांना समान न्याय मिळाला असता. जातिधर्माचा हा नाशिवंत विचार बोकाळला नसता.' शिक्षणाच्या क्षेत्रात आरक्षण जरूर हवे असा आग्रह धरत असताना 'अशा राखीव जागा नोकरीत नसाव्यात असे माझे पहिल्यापासून ठाम मत आहे' असे ते म्हणतात. ह्याचे त्यांनी दिलेले कारण असे की, 'कार्यक्षमता उच्च दर्जाची असल्याशिवाय जागतिक स्पर्धेत आपला टिकाव राहणार नाही.'

लग्नानंतर पुण्याला परतल्यावर श्री. शिर्के यांनी बांधकामाची अनेक कामे केली. विशेषतः कारखान्यांच्या अनेक इमारती त्यांनी बांधल्या. शिर्क्यांची कामाची शिस्त, उत्साह आणि नेकी पाहून शंतनुराव किर्लोस्कर प्रभावित झाले. ह्यातून त्यांना किर्लोस्करांची अनेक कामे तर मिळालीच पण शंतनुरावांशी त्यांचे जवळिकीचे वैयक्तिक स्नेहसंबंधही जुळून आले. शिर्क्यांच्या कामाच्या गुणवत्तेमुळे त्यांचा व्यावसायिक लौकिक वाढत होता. सँडविक एशियाचे कार्यकारी संचालक डिजाँग ह्यांनी आपण होऊन आपल्या कारखान्याच्या विस्ताराचे काम त्यांच्यावर सोपविले. डिजाँगची आणि शिर्क्यांची दोस्ती जुळून आली. डिजाँग ह्यांनी त्यांचा 'सिपोरेक्स' ह्या नावाच्या बांधकाम सामग्रीशी परिचय करून दिला. त्याने शिर्क्यांच्या जीवनात क्रांती झाली.

शिर्के बांधकामाच्या कॉन्ट्रॅक्टचा व्यवसाय करीत होते आणि त्यात त्यांचा चांगल्या प्रकारे जम बसला होता हे खरे असले तरी हे आत्मचरित्र वाचणाराला हे जाणवते की, त्यांचा खरा पिंड हा निर्मितीशील उद्योजकाचा आहे आणि ह्या प्रेरणेमागे एक सामाजिक दृष्टीही आहे. व्यापारी प्रामाणिक असू शकतात आणि समाजाला आवश्यक असलेल्या वस्तूंचा पुरवठा करून ते एक सामाजिक कार्य पार पाडतही असतात. परंतु व्यापाऱ्याची दृष्टी नफ्यावर असते. ह्यात तत्त्वतः काहीच गैर नाही. पण व्यापारी काही घडवीत नसतो. उद्योजक काही घडवीत असतो. तो जे घडवितो, निर्माण करतो ते अखेरीस विकण्यासाठीच असते. त्यालाही नफा हवा असतो. त्याला होणारा नफा ही त्याच्या यशस्वितेची एक कसोटी असते. पण तो घडवीत असलेल्या वस्तूंची गुणवत्ता हीसुद्धा त्याच्या वैज्ञानिक-तंत्रज्ञानाची, कौशल्याची, नियोजनाची, सौंदर्यदृष्टीची कसोटी असते. व्यवसायाची सर्व सामाजिक अंगे सांभाळत असतानाच काही निर्माण करण्यात अंतर्भूत असलेल्या आव्हानाला तो तोंड देत असतो आणि निर्मितीचा आनंद त्याला लाभत असतो. सिपोरेक्सशी परिचय झाल्यावर शिर्क्यांना आपले खरे कार्यक्षेत्र मिळाले आणि जीवनाचे खरे 'मिशन'ही मिळाले.

इमारतीसाठी जे बांधकामाचे साहित्य लागते – भिंतीच्या विटा, फरशी, छप्पराचे भाग, स्लॅब्ज् इ. – ते कोणत्या विशिष्ट रासायनिक घडणीचे असेल, त्याचे आकारमान, वजन काय असेल, उष्णतेची वाहकता काय असेल ते अगोदरच निश्चित करून त्याची कारखान्यात आवश्यक त्या प्रमाणात निर्मिती करणे आणि अशा पूर्वरचित साहित्याचा वापर करून योग्य त्या डिझाइन्सच्या इमारती बांधणे हे सिपोरेक्सचे उद्दिष्ट आहे. अशा साहित्यालाही सिपोरेक्स म्हणतात. शिर्क्यांनी स्वीडन, फ्रान्स, जर्मनी इ. देशांत दौरे करून सिपोरेक्सची वैज्ञानिक-तांत्रिक माहिती करून घेतली, ह्या विषयाचा अभ्यास केला आणि आपल्या देशासाठी ही पद्धती उपयुक्त आहे असा निर्णय झाल्यानंतर, आपले हवामान, वाहतुकीची स्थिती, राहणीमान इ. ध्यानात घेता युरोपमध्ये निर्माण होणाऱ्या सिपोरेक्स साहित्याला भारतीय परिस्थितीशी जुळवून घेण्यासाठी त्यात कोणते बदल केले पाहिजेत हे मुक्रर केले व असे साहित्य निर्माण करण्यासाठी सिपोरेक्स (स्वीडन) च्या सहयोगाने पुण्यात कारखाने सुरू केले. कारखान्यांसाठी जमीन, लायसेन्स, महाराष्ट्र सरकारचा सहभाग, औद्योगिक विकासासाठी व विशेषतः [illegible] उद्योगांना साहाय्य

अनुक्रमणिका

करण्यासाठी भारत सरकारने आय.डी.बी.आय. सारख्या ज्या वित्तसंस्था स्थापन केल्या आहेत त्यांच्यापासून भांडवल-पुरवठा इ. गोष्टी प्राप्त करून घेण्यात त्यांना ज्या अनंत अडचणी आल्या त्यांची 'चित्तरकथा' त्यांनी तपशिलात जाऊन रंगतदार रीतीने सांगितली आहे. ही एखाद्या कादंबरीसारखी रोमहर्षक कथा आहे असे त्यांनी स्वतः म्हटले आहे व ते शब्दशः खरे आहे. ह्या एकंदर निवेदनात तांत्रिक भाग बराच आहे व त्यात मी अनभिज्ञ असल्यामुळे ह्या संघर्षकथेत शिर्क्यांची बाजू कितपत योग्य आहे ह्याचा निवाडा मी करू शकत नाही. पण एक तटस्थ वाचक म्हणून शिर्क्यांनी पारदर्शक प्रांजलपणे आणि पोटतिडिकेने केलेले निवेदन वाचून माझे मत काय झाले हे येथे मांडतो.

शिर्क्यांना जो विरोध झाला त्याचा एक भाग म्हणजे गतानुगतिकत्वामुळे (कॉन्झर्वेटिझम) झालेला विरोध. पारंपरिक पद्धतीने म्हणजे इमारतीचे विटा, रेती, सिमेंट, फरशा इ. साहित्य भूखंडावर आणून इमारत बांधण्यात सामग्रीचा बऱ्याच प्रमाणात अपव्यय होतो, इमारत-कामाची गुणवत्ता अनिश्चित राहते व एकंदर खर्च किती होईल ह्याचा अंदाज अस्पष्ट राहतो. पूर्वरचित सामग्रीचा वापर करून बांधलेल्या इमारतीच्या संदर्भात असा अपव्यय होत नाही. ह्या सामग्रीची गुणवत्ता भारतीय मानक संस्थेने प्रमाणित केलेली असते. सबंध इमारत वापरासाठी योग्य अशा स्थितीत बांधून मिळण्यासाठी किती खर्च येईल हे निश्चित असते आणि इमारत निश्चित मर्यादेत समशीतोष्ण राहील अशी खात्री असते. इमारत टिकाऊ असते व खर्च तुलनेने कमी येतो. असे असतानाही केवळ गतानुगतिकत्वामुळे, काही नवीन करण्याच्या धास्तीमुळे सिपोरेक्सला प्रामाणिकपणे पण दुराग्रहाने विरोध करण्यात येतो. हा विरोध अनुभवामुळे हळूहळू मावळत जाईल व जात आहे.

पण शिर्क्यांचा दावा असा आहे (व त्यात मला तथ्य दिसते) की, बराचसा प्रखर विरोध हा, पारंपरिक पद्धतीने बांधकाम करण्यात सरकारी अधिकारी व कंत्राटदार ह्यांचे जे आर्थिक हितसंबंध असतात त्यांच्यामुळे होतो. ह्याविषयी शिर्क्यांनी ह्या पुस्तकात अनेक ठिकाणी मोठ्या पोटतिडिकीने लिहिले आहे. ते म्हणतात, '... दोनशे वर्षांपूर्वी ब्रिटिशांनी बांधकाम व्यवसायात त्या वेळच्या क्षुल्लक कामांसाठी व निराळ्या उद्देशांसाठी... देशाची लूट करण्यासाठी घालून दिलेली पक्षपाती – निविदा नोटीस व कालबाह्य एकतर्फी कॉन्ट्रक्ट – पद्धती अनेक आपत्तींना जन्म देते. या पद्धतीत प्रामुख्याने कामाची गुणवत्ता ठरविण्याची सर्वस्वी चुकीची म्हणजे व्यक्तिनिष्ठ पद्धत आहे. शिवाय या पद्धतीमुळे नवीन बांधकाम शास्त्र-तंत्र-यंत्र व मंत्रास मज्जाव होऊन त्यांच्या वापरास आपोआपच बंदी झाली आहे. कारण या एकतंत्री व्यक्तिनिष्ठ पद्धतीत फक्त लांड्यालबाड्याच निर्माण होतात, त्या फोफावतात, पसरतात व भ्रष्टाचारास लागणाऱ्या प्रचंड काळ्या पैशाची फार मोठ्या प्रमाणात बिल्डर (इ.)... निर्मिती करतात... ज्यांनी म्हणजे अभियंते यांनी इतर शास्त्रज्ञांप्रमाणे या नवीन पथदर्शक शास्त्र-तंत्राचा प्रसार करावयाचा तेच याच्याविरुद्ध आहेत. कारण या पद्धतीमुळे कुणीही कशासही जबाबदार नसल्याने ही पद्धतच... भ्रष्टाचाराचे संरक्षण करते.'

ह्या रुजलेल्या हितसंबंधांनी सिपोरेक्सला किती प्रकारे विरोध केला ह्याची शिर्के यांनी सांगितलेली कहाणी एखाद्या डिटेक्टिव्ह कथेसारखी मनोरंजक आहे. सामाजिक नीतिविषयी आस्था असलेल्यांना ही कहाणी अर्थात दुःखदायक आहे. पण सुदैवाने ती शोकपर्यवसायी नाही. सिपोरेक्स सामग्रीचे उत्पादन सुरू झाले पण माल खपला नाही, पडून राहू लागला. कारखाने प्रचंड नुकसानीत जाऊ लागले. कारखाने बंद करण्याची पाळी आली. पण वर उल्लेख केल्याप्रमाणे विजयाबाईंनी कारखाना बंद करायला विरोध केला. दुबई आणि मध्यपूर्वेतील अनेक देशांत शिर्क्यांनी व विशेषतः प्रताप ह्या त्यांच्या थोरल्या मुलाने कोट्यवधी रुपयांची कामे केली. '...कोट्यवधी रुपयांच्या नुकसानीतून बाहेर तर आलोच पण आम्हांलाही करमुक्त कोट्यवधी रुपये मिळाले.' जर त्यांना योग्य वागणूक मिळाली व कामे करण्यासाठी योग्य परिस्थिती मिळाली तर मराठी अधिकारीवर्ग आणि कामगारवर्ग प्रचंड कामे यशस्वीपणे पार पाडू शकतो हा सुखद आश्वासक अनुभव शिर्क्यांना आला. या कामगारांतील बरेचसे कामगार पसरणीचे होते आणि त्यांना मिळालेल्या वेतनातून पसरणीचा आर्थिक कायापालट झाला ही गोष्टही येथे विशेषेकरून नमूद केली पाहिजे. अटकेवर झेंडे फडकविण्याऱ्या मराठ्यांच्या एका वंशजाने आधुनिक युगाला साजेशा पद्धतीने परदेशात आपल्या यशाचे झेंडे रोवले. महाराष्ट्रात म्हाडा आणि सिडको ह्या यंत्रणांतील अधिकारीवर्गाने सिपोरेक्सला अनेक प्रकारे विरोध केला खरा, पण शिर्के-सिपोरेक्स उद्योगसमूह आज स्थिरस्थावर आणि वर्धिष्णू आहे. 'बी.जी. शिर्के कंपनीच्या सबंध महाराष्ट्र, कर्नाटक व आंध्र प्रदेश या तीन मोठ्या प्रांतांत मुख्य ठिकाणी शाखा असून प्रचंड प्रमाणावर आमच्या या नवीन शास्त्र-तंत्र-यंत्र-मंत्राने अनेक प्रकल्प चालू आहेत.... जानेवारी १९९५ च्या .... वर्षात कंपनीकडे रुपये तीनशे कोटींवर बुकिंग आहे आणि हे थोड्याच दिवसांत रुपये सहाशे ते नऊशे कोटी रुपयांवर जाईल, असा माझा विश्वास आहे... कंपनीकडे जवळजवळ नऊ हजार कामगार, दोन हजार सर्व तऱ्हेचा अधिकारी वर्ग, सहा कारखाने आहेत... अशा रीतीने कंपनीचा उत्तम जम बसलेला आहे.' पुण्याजवळ




श्री शिवछत्रपती क्रीडानगरीचे काम शिर्क्यांनी पार पाडले ह्याचा त्यांना सार्थ अभिमान आहे. ते म्हणतात, '... हा जागतिक विक्रम आहे... ही अशी एकुलती एक क्रीडानगरी सर्व जगात आहे की, ऑलिम्पिक दर्जाचे नव्वद टक्क्यांच्या वर आयटेम्स या क्रीडानगरीत एकाच ठिकाणी आहेत.' १६ जानेवारी १९९४ रोजी हिचे राष्ट्रपतींच्या हस्ते उद्घाटन झाले तेव्हा त्यांच्या हस्ते 'बांधकाम... विक्रमी वेळात पूर्ण केल्याबद्दल' शिर्क्यांना एक स्मृतिचिन्ह देण्यात आले. हा शिर्क्यांच्या आयुष्यातील कृतार्थतेचा क्षण होता. एकंदरीत शिर्के काही लढाया हरले असले तरी त्यांनी युद्ध जिंकले आहे.

आज शिर्के कृतकृत्य आहेत. संपत्ती आणि व्यावसायिक प्रतिष्ठा त्यांना लाभली आहे आणि व्यावसायिक यशाची गमके म्हणून या गोष्टींनाही महत्त्व आहे. पण आपल्या गरीब देशातील बहुसंख्य लोकांच्या घरबांधणीचा प्रश्न सोडविण्याची वैज्ञानिक-तंत्रात्मक पद्धती आपण शोधून काढली आहे आणि व्यवहारात ती यशस्वी करून दाखविली आहे हे श्रेयही त्यांचे आहे. मुले आपल्या कर्तृत्वाने चमकत आहेत हेही ते पाहत आहेत. खेडेगावातील अशिक्षित कुटुंबातून आलेल्या व्यक्तीने प्रतिकूल परिस्थितीवर मात करून एवढे यश संपादन करावे ही विस्मयकारक गोष्ट आहे. पण ह्या अमाप कर्तृत्वाचा ताठा शिर्के यांच्या वागणुकीत अजिबात जाणवत नाही. चारचौघांत ते चारचौघांसारखे वागतात ही त्यांच्याशी परिचय असलेल्या व्यक्तींच्या दृष्टीने अधिकच विस्मयकारक गोष्ट आहे.

*मे.पुं. रेगे*

---

**मराठवाडा साहित्य संमेलनांची अध्यक्षीय भाषणे**, भाग पहिला, संपादक – नरेंद्र चपळगावकर, मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद, १९९६, रु. १००/-.

---

श्री. नरेन्द्र चपळगावकर यांनी संपादित केलेला *मराठवाडा साहित्य संमेलनांची अध्यक्षीय भाषणे : भाग पहिला* हा ग्रंथ अनेक दृष्टींनी महत्त्वाचा आहे. *मराठी साहित्य संमेलनाची अध्यक्षीय भाषणे,* खंड पहिला, दुसरा व तिसरा (संपादक : भीमराव कुलकर्णी) इत्यादी ग्रंथ प्रसिद्ध आहेत. खरे तर प्रादेशिक व विभागीय साहित्य संमेलने, विविध व्याख्यानमाला यांतील अध्यक्षीय भाषणे काही प्रमाणात उपलब्ध असतात; पण ती व्याख्याने या ग्रंथाप्रमाणे उपलब्ध झाली पाहिजेत. वाङ्मयाचा इतिहास, वाङ्मयीन प्रवाह, युगधर्म यांवर असे ग्रंथ काही प्रमाणात अर्थपूर्ण प्रकाश टाकतात. त्याही दृष्टीने प्रस्तुत ग्रंथ महत्त्वाचा आहे. या ग्रंथाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे मराठवाडा विभाग निजामाच्या संस्थानी आधिपत्याखाली होता. या दडपशाहीच्या युगात येथील समाजधुरिणांनी व सामान्यजनांनी मराठीचा ज्ञानदीप सतत तेवत ठेवला. त्या शौर्याची ही कथा आहे.

या ग्रंथात एकंदर दहा भाषणे ग्रथित करण्यात आलेली आहेत. स्वातंत्र्यपूर्व कालखंड (३), स्वातंत्र्योत्तर ते महाराष्ट्र राज्य निर्मितीपर्यंतचा कालखंड (५) व महाराष्ट्र राज्यनिर्मितीनंतरचा कालखंड (२) अशा आधुनिक कालखंडातील महत्त्वाच्या टप्प्यांतील ही भाषणे आहेत. नांदेड, औरंगाबाद, परभणी, लातूर, परळी वैजनाथ, उदगीर, बीड अशा मराठवाड्यातील प्रायः महत्त्वाच्या मोठ्या शहरी ही संमेलने पार पडलेली आहेत. पुणे, मुंबई या सांस्कृतिक केंद्रांपासून दूर असल्याने या विभागाची सांस्कृतिक प्रगती उर्वरित महाराष्ट्राच्या तुलनेने कमी झालेली असली तरी 'आत्मनः आत्मानम् उद्धरेत्' या न्यायाने अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत आपली अस्मिता जपण्याचा, परंपरा जोपासण्याचा जो प्रयत्न या कालखंडात झाला तो सर्वथैव गौरवास्पद व अनुकरणीय असाच आहे.

या दहा संमेलनांचे अध्यक्ष सर्वश्री बाबासाहेब खापर्डे, म. म. दत्तो वामन पोतदार, ग. त्र्यं. माडखोलकर, बाबासाहेब परांजपे, सेतु माधवराव पगडी, दिवाकर कृष्ण, ना. गो. नांदापूरकर, दे. ल. महाजन, न. शे. पोहनेरकर व विश्वेश्वर कानोले हे होते. या सारस्वतकारांच्या भाषणांतील विचारांचा मागोवा घेतला तर साहित्यिक व सांस्कृतिक प्रश्न हे कसे परस्परपूरक व परस्परजीवी असतात हे लक्षात येते.

श्री. बाबासाहेब खापर्डे यांनी जीवनाच्या गतीचे भान निर्देशित करीत असताना दृश्य-अदृश्य जगाचे विवेचन केले आहे आणि कलेची स्वरूपवैशिष्ट्ये सोदाहरण विशद केलेली आहेत. कलह तसेच साम्य यांतून होणारी कलानिर्मिती, निसर्ग-कलावंत संबंध, अक्षर साहित्याची उजळणी, संस्कृत-इंग्रजी वचनांचे समर्पक उपयोजन ही त्यांच्या भाषणाची काही महत्त्वाची वैशिष्ट्ये. कलह

अनुक्रमणिका

आणि तादात्म्य यांतून कलानिर्मिती होते याचे स्पष्टीकरण करताना प्रगतीच्या मार्गावर झगडा हा कोणत्या तरी सात्म्याचा मार्गदर्शक, वाटाड्या असतो व कलह आणि तादात्म्य ही एकाच प्रक्रियेची दोन टोके आहेत असे ते म्हणतात. शोकांतिका पाश्चात्त्यांकडे आहे आणि आपणाकडे का नाही, याचे विवेचन करताना जगण्याची पद्धती व परिस्थिती यांतील दोन्ही समाजांतील भिन्नता याकडे ते अंगुलिनिर्देश करतात. पाश्चात्त्य टीका वाचून आपले होणारे लेखन, या लेखनातील अभिरुचिहीनता याविषयीचा निषेध नोंदवतात. लेखकांनी शुद्ध शक्तीचे शब्द योजावेत. भविष्यकाळात मराठी तिच्या वंशजांना समजावयाची असेल तर मराठीची शुद्धता टिकवली पाहिजे. तीनचार भाषांतील शब्दांचे उपयोजन करणे घातक आहे. सारांश, वाचक व लेखक यांनी अक्षरसाहित्याची अपेक्षा व निर्मिती यांकडे लक्ष देणे अगत्याचे आहे. हा विचार श्री. खापर्डे यांनी आत्मीयतेने मांडलेला आहे.

म. म. दत्तो वामन पोतदार यांची आवाहनात्मक भूमिका आहे. त्यांची भाषा काव्यमय व आवेशपूर्ण. साहित्यसंमेलने ही भाषाविषयक विविध उपक्रम, ग्रंथालये, वाचनालये, व्याख्यानमाला, साहित्यमंडळे यांस पूरक आहेत. संस्कृतनिष्ठा ही ज्ञाननिष्ठा, अनेक भाषांचा परिचय आवश्यक, मागच्या संमेलनांतील ठरावांचे स्मरण, निजामाची स्तुती, जगभरच्या भाषांतील ज्ञानभांडार मराठीत आणावे ही व्यक्त केलेली अपेक्षा आणि हे सारे मोठ्या खुबीनें, युक्तीने संस्कृत, उर्दू, मराठी काव्यपंक्तींची समर्पक उदाहरणे देत देत पोतदारांनी आपले विचार मांडलेले आहेत.

श्री. ग. त्र्यं. माडखोलकरांनी आपल्या भाषणात विश्व-साहित्याचा व्यापकपणा व निजामाचा संकुचितपणा विशद केला आहे. अन्यायाविषयीची चीड त्यांच्या भाषणातून व्यक्त होते. निजामाच्या राज्यात मातृभाषांची पद्धतशीर पायमल्ली होते आहे, असे प्रतिपादन करून, मराठी, कानडी, तेलगू या तिन्ही सुभ्यांना प्रादेशिक स्वायत्तता देण्याची त्यांनी मागणी केली आहे. अन्याय्य शिक्षण धोरण बदलण्याच्या, मुद्रण-प्रकाशन यांवरील निर्बंध उठविण्याच्या निकडीवरील भर, मराठवाडा ही महाराष्ट्राची आदिभूमी याची आठवण करून देणे ही त्यांच्या भाषणाची काही वैशिष्ट्ये. प्रत्येक साक्षर हा लेखक किंवा प्रकाशक होऊ शकला नाही तरी वाचक होऊ शकतो; आणि वाचक हाच कोणत्याही भाषेचा स्वाभाविक प्रचारक व वाङ्मयाचा पुरस्कर्ता असतो (पृ. ४३) हा महत्त्वाचा विचार त्यांनी मांडला. तसेच प्रत्यक्ष कार्यक्रमांची रूपरेषाच दिली. श्री. माडखोलकरांनी अन्यायाचे स्वरूप विशद करता करता ज्यांच्यावर अन्याय होतो आहे त्यांना त्यांच्या शक्तीची जाणीवही करून दिली.

श्री. बाबासाहेब परांजपे यांच्या भाषणांतून कृतिप्रवणतेचा उत्कट भाव दृग्गोचर होतो. स्वातंत्र्यपूर्वकाळात शिक्षण, साहित्य-संशोधन यांत दीपसदृश तेजस्वी व्यक्ती होत्या. ही संख्या वाढावी म्हणून या स्वातंत्र्योत्तर काळात शिक्षकांनी अथक प्रयत्न करावेत. मराठवाड्यातील महाविद्यालये महाराष्ट्रातील विद्यापीठांना जोडण्याची योजना, महिलाशिक्षण, शिक्षणासाठी विविध सोयी-सवलतींची अपेक्षा, जिद्दीने शिक्षण घेणाऱ्या मुलांचा गौरव, सीमेवरील गावांतील मराठीचे अध्यापन, अभ्यासक्रम यांचे आयोजन, साहित्याविषयीचे लोकांतील औदासीन्य घालविण्याचे प्रयत्न, नव-समाजनिर्मितीत सामूहिक श्रम या मूल्याचा स्वीकार, नव्या सांस्कृतिक, सामाजिक उभारणीसाठी साहित्यिकांकडून योगदानाची अपेक्षा हे विचार त्यांच्या भाषणातून स्पष्ट होतात. प्राप्त परिस्थितीचे नेमके आकलन, समाजजीवनाची डोळस निरीक्षणे, कळीच्या प्रश्नांचा अचूक वेध व सांस्कृतिक, सामाजिक जीवनउभारणी-विषयीच्या अग्रक्रमांविषयीची निःसंदिग्धता या व्याख्यानातून लक्षात येते. तसेच श्री. परांजपे यांच्या कार्यकर्तृत्वाचा आणि त्यांच्या मराठवाडा विकासध्यासाचा प्रत्यय येतो.

श्री. सेतुमाधवराव पगडी यांनी हैदराबादेतील स्थित्यंतराचा आढावा घेतलेला आहे. त्यांच्या मते इ.स. १७२४ ते १८०० मराठ्यांचे दक्षिणेत वजन होते. इ.स. १८०० ते १८७० येथील जीवन खुरटे होते. १८७० पासून नवयुगाचे दर्शन घडले. शिक्षणासाठी मराठवाड्यातील मुले पुण्या-मुंबईकडे गेली. इ.स. १९२० पासून विविध क्षेत्रांत अनेक व्यक्ती चमकल्या. श्री. पगडी हे सरकारी अधिकारी होते. प्रौढ शिक्षण केंद्रे, वाचनालये उघडण्याचे त्यांनी लोकांना आवाहन केले. सरकारी प्रोत्साहनाचा लाभ घ्यावा, किनवट, राजुरा भागातील आदिवासींच्या शिक्षणावर भर द्यावा असे आवाहन त्यांनी केले. त्याचप्रमाणे मराठीच्या उपासकांनी करावयाच्या कामाची नऊकलमी रूपरेषाही त्यांनी दिली. श्री. पगडी यांनी सरकारी अधिकारी राहूनही साहित्यसेवा केली. त्यांच्या विचारास आचाराची जोड असल्याने ते विचार अर्थपूर्ण वाटतात.

श्री. दिवाकर कृष्णांनी पूर्वाध्यक्षांच्या विचारांचा मागोवा घेतलेला आहे. महाराष्ट्र अखंड, भाषा हा जीवनरस, शिक्षणप्रसाराची निकड, मराठी माध्यमाचा स्वीकार हे विचार त्यांच्या भाषणांतून दृग्गोचर होतात. तसेच कांत, बी. रघुनाथ या प्रतिभाशाली साहित्यिकांच्या मार्गाने सांप्रतच्या साहित्यिकांनी जावयास हवे याचाही ते निर्देश करतात. मानवी मनोव्यापारातील आनंदकणांचे चिरंतनी-करण आणि साधारणीकरण म्हणजे कला अशी कलेची नेमकी व्याख्याही त्यांनी मांडली. ज्ञानेश्वरादी संतकवींचा व्रतस्थपणा,

तपश्चर्या अनुकरणीय आहे. आपल्या कार्याचा संकल्प व वेग ठरविताना आधुनिक जगात प्रसारमाध्यमे, संवादमाध्यमे किती प्रगत झाली आहेत हेही आपण लक्षात घ्यावयास हवे, असे ते आवर्जून सांगतात. वाचक व लेखक यांच्या उत्थानाची निकड, परंपरेचा साक्षेपाने विचार करण्याची गरज व त्यात भर घालण्यासाठी बद्धपरिकर होण्याची आवश्यकता त्यांनी मोठ्या तळमळीने मांडलेली आहे.

श्री. नांदापूरकरांचे भाषण म्हणजे लोकसाहित्याच्या-लोकवाङ्मयाच्या अभ्यासाचे बीजभाषणच होय. लोकशाही व लोकवाङ्मय यांचे विवेचन करताना श्री. नांदापूरकर लोकवाङ्मयाचे माहात्म्य पटवून देतात. या लोकवाङ्मयविचारात समाजातील बऱ्यावाईट अंगांचे चित्रण, काव्यात्मता यांचा सविस्तर विचार येतो. शृंगार, वात्सल्य, विनोद, कल्पनाविलास, रचनाचातुर्य या अंगाने या साहित्याकडे पाहण्याची ते दृष्टी देतात. ओवी या काव्यरचना प्रकाराची स्त्रीधन, सांस्कृतिक महत्त्व, सरलता, सहजता, संस्मरणीयता, सुभाषितसदृशरचना ही वैशिष्ट्ये मांडतात. लोक साहित्यातील प्रयोगविचार, वाक्प्रचार यांचेही विवेचन येते. मराठवाडा तसेच महाराष्ट्राच्या सांस्कृतिक उत्थापनाविषयीचा विचार येतो. उर्वरित महाराष्ट्राच्या बरोबरीचा मराठवाडा होईल आणि 'एकदा बरोबरीचे झाल्यानंतर मग कोणी मागतही नाही आणि कोणी देतही नाही. त्यातही विशेष म्हणजे दातृत्वशील आणि कर्तृत्वसंपन्न अशा मराठवाड्याला ती वृत्ती मानवणारी नाही. ती त्याच्या प्रकृतिधर्माच्या विरुद्ध आहे' (पृ. ११६) हा 'बरोबरीचा' या शब्दातील नेमका आशय प्रकट करणारा विचार येथे येतो. काळाप्रमाणे या भाषणात विचारांची विविधता येते. विचारक्षितिजे विस्तारतात. श्री. नांदापूरकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद नभोवाणी केंद्र, 'प्रतिष्ठान' स्थिर होण्याची गरज याचीही नोंद घेतात.

श्री. दे. ल. महाजन यांनी १९५६ साली प्रसिद्ध झालेल्या महत्त्वाच्या तीन ग्रंथांचा निर्देश केला आहे. ह.भ.प. धुंडामहाराज देगलूरकर यांचा हरिपाठ अभंगांवरील तात्त्विक, भक्तिपूर्ण व रसाळ विवेचन करणारा ७०० पृष्ठांचा ग्रंथ, दासोपंतांच्या पंचीकरणाचे श्री. न. शे. पोहनेरकरांनी परिश्रमपूर्वक संपादन केले तो ग्रंथ, डॉ. नांदापूरकरांचा मोरोपंत व मुक्तेश्वर यांची तुलना करणारा ग्रंथ यांचे विवेचन केलेले आहे. मूल्यभावांना चैतन्यतत्त्वाचा आधार देणे आणि या मूल्यांवर साहित्यसमीक्षेचा निकष तयार करणे हे टीकाशास्त्राचे कर्तव्य आहे, हे श्री. महाजन यांनी आवर्जून सांगितले.

श्री. न. शे. पोहनेरकरांनी अस्मिता जागविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या भाषणात भूतकाळाचा जागर जसा आहे, तसा नावीन्याचा स्वीकारही आहे. मराठवाड्यातील साहित्यिक संस्था, संशोधनाची कामे, श्री तुळजा, रेणुका या प्रेरणास्थानांचा विचार, संशोधन जतन करून ठेवणे ही सर्वांची जबाबदारी हे विचार त्यांनी मांडले आहेत.

श्री. विश्वेश्वर अंबादास कानोले यांनी निजामाच्या मराठ्यांकडून झालेल्या पराभवांची समर्पक शब्दांत मांडणी केलेली आहे. तसेच गोवा मुक्तिसंग्रामाचे विवेचन केलेले आहे. आजही हैद्राबाद येथील अल्पसंख्य मराठी भाषिकांच्या प्रश्नांकडे लक्ष देण्याची आवश्यकता प्रतिपादिली आहे. मराठवाड्यातील संशोधन कामाचा आढावा घेतला आहे. इतिहाससंशोधकाचे काम हे मार्गदर्शकाचे काम, मराठीची विविध मार्गांनी सेवा करणे हे कर्तव्य हे विचार त्यांच्या विवेचनात येतात.

या ग्रंथास श्री. नरेन्द्र चपळगावकर यांनी परिश्रमपूर्वक प्रस्तावना लिहिली आहे. भाषणांचा केवळ परिचय करून देणे या रूढ मार्गाने जाणारी ही प्रस्तावना नाही; तर मराठवाडा प्राकृतिक दर्शन, विविध ग्रंथ-नियतकालिके, वाङ्मयीन चळवळी यांचे जन्मसोहळे, त्यांचे खडतर कार्य, छोट्या-मोठ्या साहित्यिकांची साहित्यसेवा, साडेसहाशे वर्षांचे पारतंत्र्य, छत्रपतींच्या उदयाने उजळलेला उर्वरित महाराष्ट्र व त्या काळात दडपशाहीच्या अंधारयुगात चाचपडणारा, धडपडणारा मराठवाडा यांचे वेधक चित्र ते रेखाटतात.

औरंगाबाद समाचार (१८८२), गणेश वाचनालय, परभणी (१९०१), विवेकवर्धिनी संस्था, हैद्राबाद (१९०७), नूतन विद्यालय, गुलबर्गा (१९०८), डेक्कन लिटररी असोसिएशन, हैद्राबाद (१९१४), सरस्वतीभुवन विद्यालय (१९१५) या आणि इतर महत्त्वाच्या संस्था, नियतकालिके यांची माहिती येते. नियतकालिकांची नावे बदलावी लागणे, संपादकांना पडणारे कष्ट, त्यातूनही आशावादी, भावात्मक विचार मांडण्याची त्यांची वृत्ती यातून स्पष्ट होते. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या परीक्षा, विदर्भ साहित्य संघाशी जोडले जाणे, विविध साहित्यिकांच्या वाङ्मयीन कार्याचा परिचय, प्रस्तुत ग्रंथातील संमेलनाध्यक्षांच्या विचारांचा मागोवा, परिषदेच्या संवर्धनातील विविध क्षेत्रांतील, विविध स्तरांवरील कार्यकर्त्यांचे योगदान यांचे सुरेख वर्णन येथे येते.

ही दहा भाषणे मराठवाडा साहित्य परिषदेच्या १९३७ ते १९९२ या उण्यापुऱ्या पंचावन्न वर्षांचा इतिहास आपणापुढे ठेवतात. या भाषणांतील दहाही संमेलनाध्यक्षांनी व्रतस्थ वृत्तीने, तळमळीने, मराठीचे दारिद्र्य नष्ट करण्याच्या हेतूने लेखक-वाचकांना, संपादक-प्रकाशकांना सजग व सतर्क करण्याचा प्रयत्न केल्याचे जाणवते. या संमेलनाध्यक्षांनी व संपादकांनी [illegible] विवेचनातून मराठीची

आदिभूमी असणाऱ्या मराठवाड्याच्या सांस्कृतिक भूतवर्तमानाचा वेध घेतला आहे. साहित्य आणि समाजजीवन यांच्यातील गुंतागुंतीचा, परस्परांवर प्रभाव टाकणारा अनुबंधच साकार झाला आहे. संमेलनाध्यक्षांची छायाचित्रे, सुवक छपाई आणि "मराठवाडा साहित्य परिषद स्थापन करणाऱ्या, तिचे संवर्धन करणाऱ्या, तिच्या विविध उपक्रमांसाठी परिश्रम करणाऱ्या सर्व ज्ञात-अज्ञात कार्यकर्त्यांस" ही अन्वर्थक अर्पणपत्रिका यामुळे ग्रंथ अधिकच आकर्षक झाला आहे.

मराठी साहित्यविश्वात मराठवाड्यातील साहित्यिकांनी दिलेले लक्षणीय योगदान, समीक्षेत घातलेली मोलाची भर, साहित्यिक उपक्रम व चळवळी यांकडे पाहण्याची अनुपम उत्साहाची व गांभीर्याची वृत्ती यापाठीमागे कोणती कारणे असावीत याचा जेव्हा आपण विचार करू लागतो त्या वेळी त्याची काही उत्तरे आपणांस या ग्रंथातून खचितच मिळतात, असे म्हणावेसे वाटते.

*पंडित टापरे*

---

**साती ग्रंथ : स्वरूप आणि समीक्षा** - कृ.पं. देशपांडे, सन पब्लिकेशन्स, पुणे, १९८९, रु. ८०/-

---

महानुभाव पंथाने मराठीच्या प्रारंभिक काळात विपुल आणि विविध वाङ्मयप्रकारांत लेखन करून मराठी वाङ्मय समृद्ध केले. 'साती ग्रंथ' ही या पंथातील सात ग्रंथांसाठी वापरलेली संज्ञा आहे. विशेष म्हणजे यात श्री गोविंदप्रभू, श्री चक्रधर या अवतारी पुरुषांच्या किंवा नागदेवांसारख्या आचार्यांच्या जीवनावरील चरित्रग्रंथांचा समावेश नाही. रुक्मिणी स्वयंवरावरील संतोष-मुनी कृष्णदासांची रचना पंथामध्ये पारायणासाठी मान्यता पावली आहे. तोही ग्रंथ यात नाही. तथापि या 'साती ग्रंथा'तील सात काव्यग्रंथांच्या संहिता एकत्र असतात. त्यात नरेंद्र, भास्कर आणि दामोदरपंडित यांची आख्यानकाव्ये, तसेच अन्य कवींचे क्षेत्रमाहात्म्य-स्थलवर्णनपर ग्रंथ आणि भाष्यग्रंथ समाविष्ट आहेत. त्यांत विषयांचे तसेच काव्यशैली, रचनापद्धती यांचेही वैविध्य आहे. 'साती ग्रंथ' या संज्ञेने रूढ झालेल्या या ग्रंथांचा एकत्रित विचार प्रस्तुत प्रबंधात केला आहे. या साती ग्रंथांच्या कर्त्यांतील काहींना अवतारी पुरुषांचे संनिधान लाभले होते; कोणी पंथांचे आचार्य होते तर कोणी समकालीन आचार्यांच्या सहवासात आले होते. कृष्णभक्ती हे या पंथाचे वैशिष्ट्य असल्यामुळे कृष्णकथेवरील ग्रंथांचा समावेश त्यात स्वाभाविकपणेच झाला. श्री दत्तात्रय आणि श्री गोविंद-प्रभु यांच्याशी निगडित स्थलवर्णनेही त्यात आली. या दृष्टीने पाहिल्यास 'साती ग्रंथां'चे कवी आणि त्यांचे काव्य यांच्याविषयी असलेला आदरभाव त्यांना एकत्रित ठेवण्यास कारणीभूत झाला असावा.

या सातही ग्रंथांच्या संपादित आवृत्त्या डॉ. वि.भि. कोलते यांनी प्रसिद्ध केल्या आहेत. डॉ. तुळपुळे, डॉ. ढेरे यांनीही काही संपादने केली आहेत. तथापि या सर्व ग्रंथांचा एकत्रित तौलनिक आणि वाङ्मयीन समीक्षात्मक विचार झालेला नव्हता. तो डॉ. कृ.पं. देशपांडे यांनी प्रथमच केला आहे. त्यावद्दल त्यांचे अभिनंदन करावयास हवे. आपला प्रबंध परिष्कृत स्वरूपात *साती ग्रंथ : स्वरूप आणि समीक्षा* या नावाने डॉ. देशपांडे यांनी ग्रंथरूपाने प्रसिद्ध केला आहे. त्यामुळे या ग्रंथांच्या अभ्यासकांची मोठीच सोय झाली आहे. प्रस्तुत ग्रंथास सुप्रसिद्ध संशोधक डॉ. रा. चिं. ढेरे यांची प्रस्तावना लाभली आहे.

डॉ. देशपांडे यांनी पहिल्या प्रकरणात 'साती ग्रंथ' आणि त्यांचे निर्माते यांचा परिचय करून दिला आहे. त्यात या ग्रंथांच्या कर्त्यांची चरित्रविषयक माहिती आणि रचनाकाळ यांची चर्चा आली आहे. दुसऱ्या प्रकरणात महाकाव्य, आख्यानकाव्य यांच्या चर्चेच्या अनुषंगाने 'साती ग्रंथां'चा थोडक्यात विचार करण्यात आला आहे. पुढील सात प्रकरणांत प्रत्येक ग्रंथाची विस्तृत समीक्षा आहे. शेवटच्या प्रकरणात साती ग्रंथांचे तुलनात्मक निरीक्षण आहे. विशिष्ट संशोधनपद्धती आणि विशिष्ट दृष्टिकोणातून या साती ग्रंथांचा सामग्र्याने विचार करण्यात आल्याचे दिसते.

महानुभावीय नरेंद्र, भास्कर, दामोदरपंडित आदी कवींपुढे संस्कृत महाकाव्यांचे आदर्श होते. त्यांची रचनापद्धती आणि काव्यात्मकता त्यांच्या चांगल्या परिचयाची होती. त्या धाटणीची रचना व वर्णने करण्याचा प्रयत्न याही कवींनी आपल्या काव्यांतून केलेला आहे. तशी क्षमता त्यांच्या ठिकाणी होती, असेही म्हणावयास हरकत नाही. तथापि हे सारे कवी 'महाकवींच्या पंथु' वरून वाटचाल करीत असले तरी त्याचा अंतिम टप्पा त्यांना गाठता आला नाही असेच म्हणावे लागेल. कारण महाकाव्याला कवेत घेण्याइतपत त्यांच्या काव्यविषयांचा आवाका नाही. काही समीक्षक नरेंद्रास मराठीतील महाकवी म्हणत असले तरी सर्वार्थाने व सर्वांगाने एकही महाकाव्य मराठीत लिहिले गेले नाही. पुढील काळातील 'सामराज' या कवीने आपल्या *रुक्मिणीहरण* या काव्यात महाकाव्य लक्षणांचा सांगाडा उभा केला असला तरी

त्याचा कथाभाग अगदीच क्षीण स्वरूपाचा आहे. या पंथीय कवींपुढे रसिकरंजन आणि संसारमोचन हे उद्दिष्ट होते. त्यांचा समन्वय यापुढील काळातीलही संतकवींनी आपल्या काव्यात केलेला दिसतो.

संस्कृत महाकाव्याची लक्षणे आणि त्यांची परंपरा यांचे विवेचन प्रबंधलेखनात ठीक असले तरी प्रस्तुत कवींच्या काव्यविवेचनाच्या संदर्भात अनावश्यक असल्याने गाळता आले असते. या कवींनी महाकाव्याची बाह्य लक्षणे स्वीकारली असली आणि काही अंशी अनुसरली असली तरी आराध्यदैवत आणि भक्तिभाव यांच्याभोवतीच त्यांचे लेखन केंद्रित झाल्यामुळे त्याला स्वाभाविकच मर्यादा पडल्या आहेत. दामोदरपंडित प्रतिभासंपन्न नव्हता आणि महाकाव्य रचण्याची त्याची क्षमता नव्हती हे डॉ. देशपांडे यांचे मत योग्यच आहे. नरेंद्र व भास्कर यांच्या काव्यांना महाकाव्य म्हणणे कठीण असल्याचेही त्यांनी मान्य केले आहे. मात्र या कवींनी आपल्या काव्यात भक्तिरसाचा आविष्कार करून नवे परिमाण प्राप्त करून दिले आहे. मधुराभक्ती ही एक विवक्षित साधनापद्धती आहे. महाराष्ट्रात या साधनापद्धतीचा अवलंब श्री गुलाबराव महाराजांशिवाय अन्य कोणी केला नाही हे डॉ. देशपांडे यांचे मत विवाद्य आहे.

नरेंद्र आणि भास्कर यांचा पिंड कवीचा असला तरी ते तत्वचिंतक नव्हते. त्यामुळे महाकाव्याची तात्त्विक बैठक त्यांना उभारता आली नाही. *रुक्मिणीस्वयंवर* आणि *शिशुपालवध* या काव्यांत प्रमाणबद्ध कथावांधणीचा अभाव आहे. शिवाय शृंगार व अन्य वर्णनांच्या ओघात कथाभाग खंडित होतो. "समाजात एकेश्वरवाद व सामाजिक एकोपा वाढून समाज एकसंध आणि बलशाली होण्यास मदत होणार होती. या विचाराने मोहित होऊन नरेंद्राने *रुक्मिणी स्वयंवर* हे महाकाव्य लिहिले असावे", हे डॉ. द. भि. कुलकर्णी यांचे उद्धृत केलेले विधान अतिव्याप्त व अति ताणलेले वाटते. नरेंद्र-भास्करांपेक्षा दामोदरपंडिताच्या काव्यप्रकृतीतील भेद लेखकांनी चांगल्या प्रकारे विशद केला आहे. त्याच्या लेखनाचा आदर्श पुराणांचा होता.

प्रबंधातील विवेचनात संदर्भग्रंथातील पूरक विचारांचे उतारे दिले आहेत. त्यांचे स्वतंत्र विवेचन आवश्यक होते. श्रीधर हा आख्यानकवी होता काय, *हरिविजय*, *पांडवप्रताप*, *रामविजय* या ग्रंथांना आख्यानके म्हणता येईल काय, ओवीबद्ध आख्याने व श्लोकबद्ध आख्याने यांत नेमका फरक कोणता या संदर्भात विवेचन व्हावयास हवे होते. स्थलवर्णनपर काव्ये हे महानुभाव साहित्याचे वैशिष्ट्य आहे. त्यांच्या मागे विशिष्ट रचना-प्रयोजन होते. *ऋद्धिपुरमाहात्म्य*, *ऋद्धिपुरवर्णन*, *डोमेग्रामवर्णन* इ. असे अनेक ग्रंथ आहेत. परमेश्वराशी संबंधित सर्व स्थळे महानुभावीयांना वंदनीय असतात. अन्य धर्मपंथांतही तीर्थक्षेत्रांचे महत्त्व वर्णिले आहे. तथापि महानुभाव कवींनी तीर्थक्षेत्रांच्या स्थानमाहात्म्यात वेगळेपण आणले आहे. नृसिंहादी अन्य दैवतांना महानुभाव अवताराहून त्यांनी गौण स्थान दिले. स्थानवर्णनाच्या निमित्ताने या कवींनी मुख्यत्वेकरून आपल्या आराध्यदैवताचेच वर्णन केले आहे. 'सह्याद्रि वर्णना'ऐवजी *सह्याद्रि माहात्म्य* हे ग्रंथनाम लेखकाने स्वीकारले ते योग्य वाटते. नरेंद्राच्या *रुक्मिणीस्वयंवरा*त कृष्णरुक्मिणीविवाहापूर्वीच येणारे त्यांच्या भावी जीवनातील प्रसंगाचे वर्णन कालविपर्यासाचे आहे. पण कवीची भूमिका भक्ताची आहे. कृष्ण हा परमेश्वर असल्याने त्याच्या थोरवीचे वर्णन करताना अन्य विचार त्याच्या दृष्टीने गौण ठरतात. दामोदरपंडिताच्या *वछाहरणा* मध्येही *अघासुरवध* आणि *वछाहरण* ही दोन आख्याने श्रीकृष्णाचे श्रेष्ठत्व आणि परमेश्वरी रूप बिंबवणारी आहेत, ते पंथीय दृष्ट्या योग्यच होय. हे सर्व कवी आपले लेखन भक्ताच्या भूमिकेतून करीत असल्यामुळे स्वतःकडे गौणत्व घेऊन परमेश्वराकडे काव्यकर्तृत्व देण्याची त्यांची प्रवृत्ती असते. *ऋद्धिपूरवर्णना*त गोविंदप्रभूविषयक भावपूर्ण आठवणींशी निगडित स्थळांच्या वर्णनामुळे त्याला आगळेपणा प्राप्त झाला आहे.

'साती ग्रंथां'चा तुलनात्मक विचार लेखकाने शेवटच्या प्रकरणात केला आहे तो महत्त्वाचा आहे. त्यातून या सर्व कवींची काव्यविषयक भूमिका, रचनापद्धती, वर्णनशैली, अलंकारविचार आणि त्यांचे अंतरंग ही सर्व स्पष्ट होत जातात. समकालीन ग्रंथ म्हणून *ज्ञानेश्वरी* आणि *साती ग्रंथ* यांचा तत्कालीन काव्यसंकेत, शैली, भाषा, शब्दप्रयोग, काव्यदृष्टी यांचा तुलनात्मक विचारही उद्‌बोधक ठरला असता असे वाटते. प्रबंधात लेखकाने अन्य समीक्षकांची मते आणि उतारे भरपूर दिले आहेत. तथापि त्यांनी त्याला ग्रंथरूप देताना उतारे गाळले असते तर बरे झाले असते. 'साती ग्रंथ'विषयक सर्व उपलब्ध समीक्षाविचारांचा लेखकाने परामर्श घेतला आहे. शिवाय प्रत्येक ग्रंथाचे सूक्ष्म अध्ययन करून त्यातील काव्यसौंदर्य, रचनापद्धती यांचे साधार आणि प्रवाही विवेचन केले आहे. महानुभाव साहित्याच्या अभ्यासकांना हा ग्रंथ उपयुक्त आणि संग्राह्य वाटेल.

*वसंत स. जोशी*








# सर्व धर्म अध्ययन केंद्र

## हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन

मे.पुं. रेगे

(पृष्ठे ११६; किंमत रु. २५.००)

## भेदविलोपन : एक आकलन

डॉ. अशोक केळकर

('मिस्टिसिझम' आणि 'मिस्टिक अनुभव' यांची नवी, विचारप्रवर्तक मांडणी.
पृष्ठे ३८; किंमत रु. २०.००)

## बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार

प.ल. वैद्य

(या विषयावरील एका मौलिक परंतु दुर्मिळ ग्रंथाचे पुनर्मुद्रण. किंमत रु. ३०.००)

## धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार

दि.के. बेडेकर

(आवृत्ती दुसरी)

(पृष्ठे ६४ + ८; किंमत रु. २०.००)

## इहवाद आणि सर्वधर्म समभाव

मे.पुं. रेगे

(डेमी आकाराची २०० पृष्ठे, किंमत रु. ५०/-)

*संपर्कासाठी पत्ता :* सचिव

**प्राज्ञपाठशाळा मंडळ**

३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)

अनुक्रमणिका









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष


शॉपिंग व कमर्शिअल कॉम्प्लेक्स 'रियाद', सौदी अरेबिया

# वैशिष्ट्यपूर्ण व खास ध्येय असलेला एक उद्योग समूह

दूरदृष्टीच्या, द्रष्ट्या व्यक्तीने, म्हणजेच श्री. बी. जी. शिर्के यांनी शिर्के-सिपोरेक्स उद्योग समूहाची स्थापना केली. जेव्हा त्याची सुरूवात केली तेव्हाच, त्यांनी या उद्योग समूहाच्या संपूर्ण ध्येयाची आखणी केलेली होती. स्थापत्य-बांधकाम शास्त्राचे संपूर्णतः औद्योगिकरण करून तंत्रज्ञानाच्या दृष्टीने सर्वोत्कृष्ट व किफायतशीर किंमत असलेल्या दर्जेदार उत्पादनांव्दारे देशाच्या इमारत बांधकाम साहित्याची (मटेरिअल्सची) गरज भागविणे हेच उद्दिष्ट होते.

**आमचे मनुष्यबळ हीच आमची शक्ती :**

आम्ही स्थापत्य शास्त्रज्ञ, अभियंते, रचनाकार, रासायनिक, तांत्रिक, व्यवस्थापन आणि वित्त या सारख्या विविध क्षेत्रातील व्यवसायिक व कामगार मिळून नऊ हजाराहून अधिक व्यक्तींची नेमणूक केलेली असून त्यांच्या प्रशिक्षणाची व्यवस्था केली आहे. पुण्याजवळील मुंढवा येथील आमच्या ५३ एकराच्या प्लॉटमध्ये अत्याधुनिक संशोधन व विकासाच्या सोयी असलेले ९ अत्याधुनिक संपूर्ण सुसज्ज असे एकात्मिक कारखाने आहेत.

**आमची वैशिष्ट्ये :**

अत्याधुनिक पद्धतीने अति जलद गतीने, सर्वांना परवडण्याजोगी उच्च दर्जाची सर्व सोयी-सुविधा असलेली उपनगरे तयार करण्याचे आमचे ध्येय आहे. यासाठी आम्ही अशा मजबूत, त्वरीत उत्पादन करता येण्याजोग्या व परवडण्याजोग्या इमारत बांधकाम साहित्यांची अत्याधुनिक शास्त्र-तंत्राने निर्मिती करतो. बऱ्याच उत्पादनास भारतीय मानक संस्थेचा गुणवत्ता दर्जाप्रत ठरविण्याचा शिक्कामोर्तब आहे. तसेच बी. जी. शिर्के कन्स्ट्रक्शन टेक्नॉलॉजी लि. आय. एस. ओ. ९००१ व सिपोरेक्स इंडिया लि. आय. एस. ओ. ९००२ प्रमाणित कंपन्या आहेत. शिवाय सिपोरेक्स उत्पादनास भारतीय मानक संस्थेचा आय. एस. आय. शिक्कामोर्तब पण आहे. त्यामुळे आमची कामाची सर्वांगिण दर्जाप्रत, गती व किंमत सर्वांना परवडणारी असते. म्हणून देशात-परदेशात सर्वत्र आमच्या मालास मोठ्या प्रमाणावर मागणी आहे.

**आमचे सहभाग :**

आमचा स्वीडनच्या इंटरनॅशनेला सिपोरेक्स-अेबी, स्वीडन यांचेशी सहभाग आहे. तसेच आमच्या विविध उत्पादने व तंत्रज्ञानासाठी.


सेंट्रल ॲथलेटिक स्टेडियम श्री शिवछत्रपती क्रीडा नगरी, बालेवाडी, पुणे

अग्रगण्य कंपन्यांशी खालीलप्रमाणे तांत्रिक-सहकार्य आहे.
एल्बा, जर्मनी - ऑटोमेटिक वे-बॅचिंग व मिक्सिंग प्लॅन्टस, पोटेन एस.ए. फ्रान्स - टॉवर क्रेन्स (१ ते ५० टनांची क्षमता, उंची १०० मीटर्स पर्यंत), प्युराक स्वीडन - वेस्ट वॉटर ट्रीटमेन्ट प्लॅन्टस्, रीड सिस्टीमस्, यु. एस. ए. - प्रगत जीआयसी ग्रेन स्टोरेज सायलो सिस्टिमस्

**आमचे मानाचे तुरे :**

● स्थापत्य-बांधकाम शास्त्राचे संपूर्ण औद्योगिकरण ● प्रिफॅब साहित्य ● टर्नकी लंपसम-एक रकमी वट्ट ठेका पध्दती ● एकाच छताखाली आरंभापासून ते पूर्णत्वापर्यंतच्या सर्व महत्वाच्या सेवा ● आधुनिक धान्य साठवणूक व त्यांचे संरक्षण, हाताळणी इ. कोठारांची निर्मिती, उभारणी व स्थापना (इन्स्टॉलेशन) ● ३०० दिवसात क्रीडा नगरीचे बांधकाम-एक जागतीक विक्रम.

**भविष्य-काळातील आमच्या योजना :**

स्थापत्य व बांधकाम शास्त्राच्या औद्योगिकरणाचा सर्वत्र प्रसार-प्रचार. प्रत्येकास निवारा मिळवून देण्याचा प्रयत्न. भारतातील जंगले व नैसर्गिक साधन-संपत्तीचे रक्षण व पर्यावरणाचे संतुलन साधणे इ. इ. महत्वाच्या कामात कार्यरत असलेली शिर्के-सिपोरेक्स ही एक अग्रगण्य संस्था आहे. आमच्या तंत्रज्ञानाने व क्षमतेने गुणवत्तेत वस्तुनिष्ठ दर्जा राखणे हे आमचे ध्येय. उद्याच्या भारताचा एक अंगभूत व अविभाज्य घटक म्हणून नावारूपास येण्याच्या आशेने व आत्मविश्वासाने आम्ही मार्गप्रतिक्षा करीत आहोत.




**SHIRKE शिर्के सिपोरेक्स उद्योग समूह SIPOREX**

७२-७६, मुंढवा इंडस्ट्रिअल इस्टेट, पुणे : ४११ ०३६. फोन : ६७०१५१, ६७०७५५. फॅक्स : (०२१२) ६७१६१२, ६७०३१९
मुंबई : २६२४५७४/६७०३१९, २६२४८९४. बॅंगलोर : २२७७३६०, २२७७३६१. दिल्ली : ६४६४०७६, ६४६२३०८.
हैद्राबाद : ८४१७३८, ८४६५०८. नागपूर : ५३३५१९.




अनुक्रमणिका